# निवेदन

मागील पिढीतील प्रसिद्ध सस्कृत विद्वान् म म. वासुदेवशास्त्री अभ्यकर याचे नाव व कार्य सस्कृत विद्येच्या अभ्यासकाना पूर्ण परिचयाचे आहे. पुणे येथे सस्कृतपाठशाळेत व फर्ग्युसन कॉलेजमध्ये त्याच्याकडून सस्कृतचे शिक्षण घेतलेले शेकडो विद्यार्थी महाराष्ट्रात व महाराष्ट्राच्या बाहेर आहेत त्याची शिष्यप्रशिष्य-परपरा विद्येच्या क्षेत्रात मोठी कामगिरी पार पाडीत आहे त्यानी लिहिलेले व्याकरण, न्याय, वेदान्त इत्यादि शास्त्रातील स्वतत्र सस्कृत ग्रथ तसच अनेक ग्रथावरील सुबोध व मार्मिक टीका ह्यामुळे भारतातच नव्हे तर परदेशातहि सस्कृतच्या अभ्यासूना ते सुपरिचित आहत

म म वासुदेवशास्त्री याची जन्मशताब्दी साजरी करावी ह्या उद्देशाने त्याचे शिष्यप्रशिष्य, सहकारी आणि हितचिंतक यानी जन्मशताब्दी महोत्सव समिति स्थापन केली कै म म वासुदेवशास्त्री याच्या सबधी आदरभाव व्यक्त करावा व त्याचबरोबर नवीन पिढीला त्याच्या कार्याचा परिचय करून द्यावा ह्या उद्देशान समितीने काही सकल्प केले, त्यापैकी त्याचे जीवन व कार्य ह्याचा परिचय करून देण्याचा सकल्प ह्या पुस्तक प्रकाशनाने पुरा होत आहे याबद्दल समितीला समाधान वाटत आहे

हे चरित्रपुस्तक तयार करण्यासाठी समितीने डॉ स वि सहस्रबुद्धे व प्रा. म दा साठे याना विनती केली प्रा साठे यानी शास्त्रीबोवाचे जवळ व्याकरणशास्त्राचे अध्ययन केले आहे डा सहस्रबुद्ध व प्रा साठ ह्या उभयतानी परिश्रमपूर्वक चरित्रपुस्तक तयार केले शास्त्रीबोवाचे चिरजीव प्रा वा वा अभ्यकर यानी पुस्तकात समाविष्ट करण्यासाठी अनेक छायाचित्रें दिली, पुस्तकाचे मुखपृष्ठ चित्रकार श्री सुधाकर खासगीवाले यानी तयार करून दिले पुस्तकाची व चित्राची छपाई

केसरी मुद्रणालयाने त्वरेनें करून दिली ह्या सहकार्याबद्दल समितीतर्फे मी सर्वांचे आभार मानतों.

ह्या चरित्रपुस्तकामुळे मराठी वाचकांना संस्कृतविद्यापरंपरेतील एका महापंडिताचा योग्य प्रकारें परिचय होईल अशी दृढ आशा वाटते. समितीच्या कार्यासाठी ज्यांनी द्रव्यसाहाय्य दिलें, त्यांचे समितीच्या वतीने आभार मानणें आवश्यक आहे. महाराष्ट्रराज्यसरकारने समितीच्या कार्यासाठी रुपये दोन हजाराची देणगी दिली, ह्याबद्दल समिति राज्यसरकारची अतिशय ऋणी आहे.

म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकरजन्मशताब्दी महोत्सव समिति,
पुणें, दि. १७ नोव्हेंबर १९६३

र. पु. परांजपे
अध्यक्ष

# लेखकांचें मनोगत

कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांचा चरित्रग्रंथ पूर्ण करून वाचकांच्या हातीं देतांना आम्हांला एक अननुभूत समाधान वाटत आहे, हें नमूद करणें आवश्यक आहे.

वस्तुत: 'गुणी गुणं वेत्ति' या न्यायानें व्याकरणवेदान्तादि प्राचीन शास्त्रांवरील शास्त्रीबुवांच्या ग्रंथाचें मर्म जाणणाऱ्या त्यांच्याच तोडीच्या एखाद्या पण्डितानें हें चरित्रलेखनाचें कार्य करणें योग्य ठरलें असतें. तथापि सुमारें आठ महिन्यापूर्वी शास्त्रीबुवांचे ज्येष्ठ चिरंजीव ग. म. प्रा. काशीनाथपंत यांनी 'शास्त्रीबुवांचें चरित्र' लिहिण्याची आम्हांस विनंति केली, त्या वेळीं त्यास नकार देणें आम्हांस खरोखर अशक्य झालें, कारण त्यांचा व आमचा अनेक वर्षांचा दृढ स्नेहसंबंध आहे--शेवटीं शास्त्रीबुवांविषयीं आमच्या मनांत असलेल्या नितान्त आदरामुळें आम्ही या कार्यास प्रवृत्त झालों. इतक्यांत सार्वजनिक रीतीनें शास्त्रीबुवांचा जन्मशताब्दी-महोत्सव साजरा करण्यासाठीं एक 'महोत्सव-समिति' स्थापन झाली आणि तिनेंहि हें चरित्र-लेखनाचें काम आमच्याकडे सोपविल्यामुळें आम्ही या कामास प्रारंभ करून तें तडीस नेलें.

सामान्य वाचकाच्या दृष्टीनें पाहिलें असतां, एखाद्या राजकारणी अथवा बहुविध कार्यें करणाऱ्या व्यक्तीच्या आयुष्यांत कितीतरी रोमांचकारक प्रसंग असल्यामुळें, त्या व्यक्तीचें चरित्र एखाद्या कथा-कादंबरीप्रमाणें मनोवेधक उतरतें, शास्त्रीबुवांच्या एकमार्गी जीवनांत असें कांहीं नसल्यामुळें सामान्य वाचकास त्यांचें चरित्र कितपत रोचक वाटेल, अशीहि शंका या कार्यास प्रारंभ करतांना आमच्या मनांत निर्माण झाल्याशिवाय राहिली नाहीं. तथापि शास्त्रीबुवांच्या चरित्राची अधिक बारकाईनें माहिती मिळवूं लागल्यानंतर ही शंका फार नाहींशी झाली! कारण वयाच्या सातव्या वर्षी पोरके झालेले शास्त्रीबुवा 'महामहोपाध्याय' अथवा 'गुरूणां गुरु' झाले व त्यांच्या असामान्य वाङ्मयीन कार्यामुळें अखिल भारतांतील संस्कृतप्रेमी लोकांस वंदनीय ठरले, ही त्यांच्या चरित्राची मुख्य घटनाच किती रोमांचकारक आहे! वयाच्या ६५ ते ७५ या दहा वर्षांत शास्त्रीबुवांनीं व्याकरण-महाभाष्याच्या अनुवादाचें जें लोकोत्तर प्रचंड कार्य केलें,तें तर त्यांच्या फार व्यक्तित्त्वाचें सर्वश्रेष्ठ भूषण ठरेल!--पुढील चरित्रग्रंथांत हा सर्व कथाभाग आल्यामुळें त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. तथापि आयुष्याच्या शेवटच्या उच्छ्वासापर्यंत निष्ठापूर्वक अखंड ज्ञानोपासना करणाऱ्या शास्त्रीबुवांचें स्मरण होतांच त्यांच्या व्यक्तिमत्त्वांतील या कांहीं विशेषांचा उल्लेख केल्याशिवाय आम्हांस राहवत नाहीं.

चरित्रलेखनाचें हें कार्य पूर्ण होईपर्यंत शास्त्रीबुवांच्या विद्याविनयसंपन्न सान्नि-ध्याचाच जणू आम्हास लाभ घडून एक अननुभूत समाधान प्राप्त झालें, अशी वस्तुस्थिति आहे म्हणूनच प्रा काशीनाथपंतांनी शास्त्रीबुवांच्या चरित्र–लेखनाची अमूल्य संधि देऊन आम्हास उपकृत करून ठेवले आहे, असेंच आता आम्हास म्हणावेंसे वाटतें

तसेंच वेळोवेळी शास्त्रीबुवांच्या चरित्रामधील सर्व प्रकारची माहिती पुरविल्याबद्दल प्रा काशीनाथपंतांचे आम्ही अतिशय ऋणी आहोत त्यांच्या कुटुंबीयांनीहि माहिती पुरविण्याच्या बाबतीत आम्हास जें साहाय्य केलें, त्याबद्दल आम्ही त्या सर्वांचे अत्यंत आभारी आहोत फर्ग्युसन कॉलेज, दैनिक 'केसरी' इत्यादि संस्थांतील ग्रंथपालांनी आम्हास अमूल्य साहाय्य केलें शास्त्रीबुवांच्या अनेक शिष्यवर पंडितांनी आठवणी व मुलाखती देऊन आम्हास बहुमोल मदत केली या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत

'म म वासुदेवशास्त्री अभ्यंकर जन्मशताब्दी-महोत्सव समिती'ने हा आमचा ग्रंथ प्रसिद्ध केला, याबद्दल त्यास अत्यंत हार्दिक धन्यवाद!

दि १।११।६३

स वि सहस्रबुद्धे
म दा साठे

अनुक्रम :



म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर जन्मशताब्दी समितीनें पुणे विद्यापीठास अर्पण केलेल्या तैलचित्राचें छायाचित्र

चित्रकार :— श्री. जि. भि. दीक्षित.

# १ : एक अपूर्व समारंभ

तो एक अपूर्व समारंभ होता त्याचे वर्णन किती करावे! महाराष्ट्रातील तत्कालीन सर्वश्रेष्ठ लोकमान्य पुढारी साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर हे त्या समारंभाचे कार्याध्यक्ष होते आणि त्या वेळच्या मुंबई राज्याचे पंतप्रधान श्री बाळासाहेब खेर हे अध्यक्षस्थानी विराजमान झालेले दिसत होते दि २१ ऑगस्ट १९३८ रोजी फर्ग्युसन कॉलेजच्या भव्य सभागृहात हा समारंभ चालू होता महाराष्ट्रातील कितीतरी नामवंत संस्कृत शास्त्री, पंडित, प्राध्यापक विद्यार्थी व विविध क्षेत्रातील सुविद्य लोक तेथे बहुसंख्येने उपस्थित होते

— अन् ती सत्कार्य व्यक्ति कोण होती? तर जुन्या संस्कृत शास्त्रामध्ये असामान्य पाण्डित्य संपादन केलेले एक वृद्ध शास्त्री! म म वासुदेवशास्त्री अभ्यंकर हे त्यांचे नाव त्यांच्या वयाला ७५ वर्षे पूर्ण झाल्यामुळे त्यांचे शेकडो विद्यार्थी व चहाते मंडळी यांच्यातर्फे हा सत्कारसमारंभ साजरा होत होता

म म वासुदेवशास्त्री म्हणजे मूर्तिमंत ज्ञानमय तप! वयाच्या पाचव्या वर्षापासून सत्तर वर्षे अखंडितपणे अध्ययन, अध्यापन व लेखन या त्रिविध साधनांनी आपले ज्ञानसत्र त्यांनी चालू ठेवले होते त्यांच्या हाताखाली तयार झालेले त्यांचे कितीतरी शिष्य शास्त्री व प्राध्यापक म्हणून महाराष्ट्रात व महाराष्ट्राबाहेरहि काम करीत होते म्हणूनच ते 'गुरूंचे गुरु' अथवा 'प्राध्यापकांचे प्राध्यापक' म्हणून ओळखले जात होते न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे व डॉ रामकृष्णपंत भांडारकर यांच्यासारखे महाराष्ट्रातील तत्कालीन समाजधुरीणहि धर्मशास्त्राच्या बाबतीत त्यांची सल्लामसलत घेत असत अर्थातच हा समारंभ म्हणजे 'विद्वान् सर्वत्र पूज्यते' या सिद्धान्ताचे प्रत्यक्ष उदाहरण होते, असे म्हणण्यास हरकत नाही

अन् अशा अद्वितीय पाण्डित्याला साजेशीच विनम्रता शास्त्रीबुवांच्या अंगी होती जणु तो त्यांचा जन्मजात गुण होता लहानापासून थोरापर्यंत त्यांच्या सान्निध्यात येणारा कोणीहि मनुष्य त्यांच्या विनम्रतेने भारून जाई व एकदम तो त्यांचा भक्त बने! तो सत्कार-समारंभ हे त्या भक्तिभावाचे दृश्य स्वरूप होते म्हणूनच कार्याध्यक्ष तात्यासाहेब केळकर यांनी आपल्या प्रारंभीच्या भाषणात त्या समारंभाचे 'अपूर्व' असेच वर्णन केले होते

विद्या व विनय यांच्या जोडीला अलौकिक गुरुभक्ति, दीर्घोद्योग, वक्तशीरपणा इत्यादि कितीतरी प्रशंसनीय गुणांनी शास्त्रीबुवांचे व्यक्तिमत्त्व सुसंपन्न झाले होते त्या त्यांच्या वंदनीय व्यक्तिमत्त्वाची ओळख करून घेण्यासाठीच आता आपण त्यांच्या चरित्राकडे वळणार आहोत

* * *

# २ : श्रेष्ठ वारसा

म म वासुदेवशास्त्री याचे घराणे मूळचे कोकणातले रत्नागिरी जिल्ह्यात गणपतिपुळें गावाजवळचे मालगुड हें त्याच्या पूर्वजाचे निवासस्थान अभ्यकर हे तथील ग्रामोपाध्ये होते शास्त्रीबुवाचे एक पूर्वज रामभट्ट काशीनाथभट्ट अभ्यकर हे सुमार दोनशें वर्षापूर्वी देशावर आले व भोरचे श्रीमत पतसचीव याच्या मुलुखातील नागनाथाचे आववडें या गावी राहू लागले रामभटजीबाबा याच्याबरोबर या वेळीं त्याचे धाकटे बधु लक्ष्मणभट्ट व तिघे मुलगे महादेव, काशीनाथ आणि बाळकृष्ण हेहि होते त्यापैकी काशीनाथभट्ट नाना हे वासुदेवशास्त्र्याचे पणजे हात

काशीनाथभट्ट नाना याना सात पुत्र होते, त्यापैकी ज्येष्ठ जनार्दनशास्त्री व कनिष्ठ भास्करशास्त्री होत भास्करशास्त्री हेच वासुदेवशास्त्र्याचे आजे(पितामह) होत जनार्दनशास्त्र्याचे नातु (पौत्र) जनार्दनभट्ट तथा जनूकाका(जन्म इ स १८२६) ह अर्थातच वासुदेवशास्त्र्याचे चुलत चुलत बधु होत जनूकाका सन १८८६ मध्ये कोकणातील आपले मूळ गाव मालगुड येथे गेले होते तेथून आल्यानतर आपल्या वाडवडिलाची व पुत्रपौत्रादिकाची माहिती व वशावळ त्यानी लिहून ठेविली आहे (श्रावण शु ११ शके १८०८) ह कुटुबवृत्तकथन हेच वासुदेवशास्त्र्याच्या पूर्वजाची माहिती मिळविण्याचे जुन साधन होय तोडी मिळालेल्या माहितीवरून जनूकाकानी ही हकीकत लिहिली असली पाहिजे ह उघडच आहे वासुदेवशास्त्र्याचे थोरले चिरजीव म म प्रा काशीनाथपत यानी वासुदेवशास्त्र्याच्या व्याकरणमहाभाष्य मराठी भाषातराचे सहा खड प्रसिद्ध झाल्यानतर त्यास प्रस्तावना म्हणून लिहिलेला सातवा खड प्रसिद्ध झाला आहे, त्यामध्ये आपले वडील,मातोश्री आजी जनूकाकाचे नातू व्यकूशास्त्री इत्यादि कुटुबीयाकडून समजलेल्या माहितीच्या आधारे आपल्या पूर्वजाचा इतिहास त्यानी दिला आहे, तोहि विचारात घेणें इष्ट आहे

जनूकाका व वासुदेवशास्त्री या दोघाचेहि पणजोबा जे काशीनाथभट्ट नाना अभ्यकर, त्याना वाईचे सरदार रास्ते याच्याकडून केजळ व धन्होर येथील २०० रु ची इनाम जमीन केव्हा मिळाली आणि त्यानतर थोडयाच अवधीत भोर येथील पतसचिवाकडून भोरजवळ असलेल्या एका गावी १०० रु ची इनाम जमीन केव्हा मिळाली ह निश्चित सागता येत नाही तथापि वाईचे सरदार रास्ते व भोरचे श्रीमत पतसचिव याच्या घराण्याची जी ऐतिहासिक माहिती प्रसिद्ध झालेली आह तिच्या आधारे या प्रश्नाचा बराचसा समाधानकारक उलगडा करता येतो

तत्कालीन काही प्रतिकूल राजकीय घडामोडीमुळे भोरच्या पतसचिवाचे सर्व उत्पन्न सातारच्या गादीकडून जप्त करण्यात आले होते आणि त परत कधी

मिळेल, असा प्रश्न पतसचिवाकडून आववडें येथे राहात असलेले रामभट्टबाबा अभ्यंकर (काशीनाथभट्ट नाना याचे वडील) यास करण्यात आला त्यानी तें "आजपासून वीस दिवसाच्या आत परत मिळेल" असे सागितले होते व खरोखर सतराव्या दिवशीच ते उत्पन्न त्यास परत मिळाले तेव्हा पतसचिव यानी सतुष्ट होऊन रामभट्टबाबास काही उत्पन्न देऊ केले, परतु विरक्त वृत्तीच्या बाबानी त्यास नकार दिला पुढे बाबा वाईस[1] जाऊन राहू लागल्यावर त्याचे चिरजीव काशीनाथभट्ट नाना याची विद्वत्ता ध्यानात घेऊन तेथील सरदार अनतरावदादा रास्ते यानी त्यास केजळ व कन्होर येथील २०० रु ची जमीन इनाम दिली व हें वर्तमान समजल्यानतर भोरच्या पतसचिवानीहि बाबाना द्यावयाची भोरजवळची १०० रु ची जमीन नानासच सन्मानपूर्वक इनाम दिली—अशी हकीकत जनूरावानी आपल्या कुटुबवृत्तात दिली असून, सन १७०७ मध्ये श्रीशाहूमहाराज गादीवर आल्यानतर व त्याच वर्षी नोव्हेबर महिन्यात भोर सस्थानचे मूळ पुरुष शकराजी नारायण पतसचिव यानी सन्यासोत्तर जलसमाधि घेतल्यानतर, थोड्याच काळात वरील घडामोडी घडून आल्या असाहि म्हटले आहे

परतु वरील वृत्तान्तात उल्लेखिलेले सरदार अनतरावदादा रास्ते याचे नाव रास्ते घराण्याच्या इतिहासात कोठेच सापडत नाही ज्यानी लाखो रुपये खर्च करून वाई येथे विस्तीर्ण घाट, देवळें व वाडे बाधले व वाई गावास अपूर्व सौंदर्य प्राप्त करून दिले, ते वाईचे सरदार आनदराव रास्ते इतिहासात अतिशय कर्तबगार म्हणून सुप्रसिद्ध आहेत 'अनत' व 'आनद' ही नावे कित्येकदा एकमेकाचे पर्याय म्हणून वापरलेली आढळतात म्हणून काशीनाथभट्ट नाना यास कजळ—कन्होर येथील जमीन देणारे सरदार रास्ते म्हणजे आनदरावच होत असे म्हटले पाहिजे सन १७९९ मध्ये आनदराव मरण पावले असे इतिहासात नमूद केलेलें आहे परतु त्याच्या जन्मतिथीसबधी कोणताच उल्लेख आढळत नाही शाहूमहाराजाच्या कारकीर्दीत वाईस घर बाधून राहिलेले सरदार भिकाजी शामजी रास्ते, याचे आनदराव हे पाचवे अपत्य होत भिकाजी शामजी याचे ज्येष्ठ अपत्य म्हणजे त्याच्या कन्या गोपिकाबाई या होत गोपिकाबाईचा विवाह श्रीमत पेशवे नानासाहेब याच्याशीं झाला व या विशेष आप्तसबधामुळे पुढे पेशवाईत वाईच्या रास्ते घराण्यास मोठी ऊर्जितावस्था प्राप्त झाली अर्थातच गोपिकाबाई या आनद-रावाच्या ज्येष्ठ भगिनी होत १७६१ साली झालेल्या पानिपतच्या तिसऱ्या युद्धात त्याचा ज्येष्ठ पुत्र विश्वासराव सुमारे वीस वर्षांचा होता हे सर्वश्रुत आहेच, म्हणजे त्या वेळी गोपिकाबाईचे वय सुमारे ३६ वर्षांचे व आनदरावाचे

१ नाशिक येथील अभ्यकर कुटुबाचे उपाध्याय वे नारायणभट घैसास याच्याकडे रामभ वाईस राहत असल्याची नाद आहे

१
सुमारें २८ वर्षांचे असावे म्हणजे अदमासे सन १७३३ ह आनंदरावाचें जन्मसाल ठरतें आनंदरावानी सन १७७८ मध्ये वाई येथील देवालयाची व्यवस्था व ब्राह्मणकुटुंबाचा योगक्षेम, यासाठी वजळ गाव व धामणा डागर श्रीमत सवाई माधवराव पेशवे याच्याकडून ब्राह्मणांस इनाम करून देवविला असा इतिहासात उल्लेख आढळतो (पाहा—गो वि आपटेकृत 'श्रीक्षेत्र वाई-वर्णन पृ ४७) यावरून कजळ-वन्होरे येथील जमीन इनाम देण्याबद्दल म्हणून ज्या 'अनंतरावा' चा जनूकाका उल्लेख करतात, ते हेच आनंदराव असले पाहिजेत सन १८०२ मध्ये श्रीमंत पेशव्यांनी देव-ब्राह्मणांच्या खर्चासाठी सुमार तीन हजार रुपयांची जमीन इनाम देताना ज्या विद्वान् ब्राह्मणाचा उल्लेख केला आहे त्यामध्ये वाईतील सिद्धपुरुष अप्पा दीक्षित करंदीकर यास दरसाल १०० रु योगक्षेमार्थ द्यावेत असे म्हटले आहे (आपटेकृत श्रीक्षेत्र वाई वर्णन पृ ५०), तसेच अप्पा दीक्षित याचे पट्टशिष्य बाबूकाका लेले व काशीनाथ नाना अभ्यंकर हे मोठे विद्वान होते बाबूकाका लेले यांचे पणतू येथील (वाईतील) भाऊशास्त्री लेले (सन १८६३-१९१८) हे होत काशीनाथ नाना अभ्यंकर याचे पणतू यथे जगदीशशास्त्री म्हणून प्रसिद्ध होते" असेहि आपटेकृत वाईवर्णनात म्हटले आहे (पृ ९०) अप्पा दीक्षित करंदीकर याच्या जन्मतिथीसंबंधी कोणताच उल्लेख सदर पुस्तकात केलेला नाही तथापि म म वासुदेवशास्त्री हे काशीनाथ नाना याचे पणतू होते व धममातंड भाऊशास्त्री लेले हे बाबूकाका लेले याचे पणतू असून वासुदेवशास्त्री व भाऊशास्त्री हे अगदी समवयस्क होते, कारण दोघांचा जन्म एकाच सालचा आहे अर्थातच काशीनाथनाना व बाबूकाका साधारणपणे समवयस्क असले पाहिजेत असे समजण्यास हरकत नाही

वरील हकीकतीवरून सन १७७८ च्या सुमारास आनंदराव रास्ते याच्याकडून काशीनाथनानास वेजळ-वन्होर येथील जमीन इनाम मिळाली असे दिसते नंतर हे वृत्त समजल्यावरून मोरच्या पतसचिवानी त्यास मोरजवळची एक जमीन दिली असे जनूकाका लिहितात हे मोरचे पतसचिव शंकराजी नारायण याचे चिरंजीव नारो शंकर (सन १७०५ ते १७३७) हे असणें शक्य नाही, कारण ते सन १७३७ मध्येच दिवगत झाले होते अर्थातच जनूकाकाच्या माहितीप्रमाणे सन १७७७ च्या सुमारास मोर संस्थानाधिपतीकडून काशीनाथनाना यास जमीन मिळाली असे सिद्ध होत नाही नारो शंकर याचे दत्तकपुत्र चिमणाजी नारायण सन १७३७ ते ५७ पर्यंत गादीवर होते, त्यानंतर त्यांचे चिरंजीव सदाशिव चिमणाजी सन १७५८-८७पर्यंत गादीवर होते (पाहा— ऐतिहासिक घराण्याच्या वंशावळी' संपादक गो स सरदेसाई, पृ ८६) अर्थातच या सदाशिव चिमणाजीकडून काशीनाथ नानास इनाम जमीन मिळाली असावी

काशीनाथ नाना वाईस राहत असल्यामुळे तेथील इतर विद्वान् ब्राह्मणांबरोबर त्यासहि सरदार आनंदराव रास्त यानी इनाम जमीन दिली असेल यात मुळीच आश्चर्य नाही, परंतु भोरच्या पंतसचिवानी त्यास उत्पन्न देण्याचे कारण काय? त्या बाबतीत म म काशीनाथपंत याच्याकडून खुलासा मिळतो तो असा —

उतार वयात जणू वानप्रस्थाश्रम पतकरून रामभट्टबाबा एकटेच पत्नीसह भोरजवळ आंबवडे मुक्कामी अग्निहोत्र घेऊन विरक्त वृत्तीने राहत असत आणि काशीनाथ नाना इत्यादि त्याचे मुलगे आपल्या परिवारासह वाईस राहत असत सन १७७३ मध्ये नारायणराव पेशव्याच्या वधानंतर जेव्हा बारभाई व राघोबादादा असे दोन पक्ष मराठशाहीत निर्माण होऊन भयंकर अदाधुंदी माजली, त्या वेळी भोरच पंतसचीव सदाशिव चिमणाजी यास बारभाईंनी राजद्रोहाच्या संशयावरून कैद केले त्या वेळी सचिवाच्या पत्नी आंबवड्यास रामभट्ट बाबाच्या दर्शनास गेल्या असता त्यानी बाबास " आमच्यावर पडावे सरकारच्या अवकृपेने आलेले संकट केव्हा दूर होईल? असा प्रश्न केला आणि सचिवाच्या कैदेची हकीकत सांगितली तेव्हा बाबानी त्यास 'सौभाग्यवती भव ' असा आशीर्वाद देऊन 'जगदंबेच्या कृपेने पधरावीस दिवसातच आपण या संकटातून मुक्त व्हाल ' असे सांगितले लवकरच पेशव्याचे कारभारी नाना फडनवीस यानी कैदेत असलेल्या सचिवास आपणासमोर चौकशीसाठी बोलाविले सचिव भीतीने थरथर कापतच फडणिसासमोर जाऊन उभे राहिले! परंतु नाना फडणीस त्यास म्हणाले, ' आपल्या प्रामाणिकपणाविषयी उगीचच संशय घेऊन आपणास कैद केलेले दिसते! आपली तावडतोब मुक्तता करण्यात येत आहे सचिवास कायमचे वश करण्यासाठी नानानी मुत्सद्देगिरी लढवून अशा प्रकारे त्याच्यावर विश्वास दाखवून त्यास एकदम मुक्त केले, असे काहीचे म्हणणे आहे असो, सचिवाची मुक्तता तर झालीच आणि रामभट्टबाबानी सांगितलेल्या मुदतीच्या आतच सचिव मुक्त झाले! म्हणून सचिवानी संतुष्ट होऊन बाबास काही कायमचे उत्पन्न करून देण्याचे ठरविले, परंतु विरक्त वृत्तीच्या बाबानी या गोष्टीस नकार दिला पुढे काशीनाथ नानास सरदार रास्त्यानी जमीन दिल्याचे समजल्यानतर सचिवानीहि रामभट्टबाबास द्यावयाची भोरजवळची १०० रु ची जमीन काशीनाथनानास इनाम दिली व अशा प्रकारे बाबाच्या ऋणातून मुक्त होण्याचा त्यानी प्रयत्न केला

वाईस राहत असलेल्या काशीनाथ नानास भोरकरानी जी जमीन इनाम दिली तिचे कारण अभ्यंकरकुटुंबात परंपरेने माहीत असलेली वरील घटनाच असली पाहिजे, असो

रामभट्टबाबा हे उत्तम वैदिक व श्रौतकर्मनिष्णात याज्ञिक होते कोकणात अग्निहोत्र चालून निर्वाह होणे अशक्य झाले व मुलाबाळांचे विद्याभ्यास नीट होईना म्हणून ते देशावर येऊन आववडें येथें राहू लागले असें जनूकाकांनी म्हटले आहे पेशव्यांच्या काळात अशीं किती तरी घराणीं आपला भाग्योदय करून घेण्यासाठी देशावर येऊन राहिली होती पुढे आववडें येथेहि प्रपंच नीट चालेना म्हणून त्या वेळी मुख्यत सरदार रास्ते यांच्यामुळे नावारूपास आलेलें श्रीक्षेत्र वाई,येथे जाऊन ते स्थिर झाले. तथापि उतारवयात बहुधा ते एकटेच आववड्यास विरक्त वृत्तीने राहत असत असे दिसतें त्याचे पुत्रपौत्र वाईसच राहत होते

रामभट्ट बाबा यांच्या पुत्रांपैकी काशीनाथभट्ट नाना हे विद्वान् म्हणून विख्यात होते "काशीनाथभट्ट नाना श्रौतस्मार्तकर्मांत अत्यंत निष्णात होते. गुजरातेत डाकोर येथे श्री रणछोडजीच्या मूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेच्या वेळीं त्यांना आदराने निमंत्रण देऊन नेण्यात आले होते असं ऐकिवात आहे" असे म म. काशीनाथपंत यांनी व्याकरण महाभाष्याच्या प्रस्तावनाखंडात नमूद केले आहे. —म म वासुदेवशास्त्र्यांच्या ठिकाणी असलेल्या निर्मळचारित्र्यसंपन्नता, विद्वत्ता व विरक्तपणा या गुणांचे बीज कोकणातून देशावर आलेल्या या त्यांच्या आद्य पूर्वजाच्या व्यक्तिमत्त्वात आपणास दिसून येतें

कुलदेवता

श्रीयोगेश्वरी ही अभ्यंकरांची मुख्य कुलदेवता तिचे ध्यान जनूकाकांनी पुढीलप्रमाणे दिले आहे —

देवी भक्तजनप्रिया सुवदना खड्ग च पात्रं तथा
स्वर्णालङ्कृतलाङ्गलं च मुसलं हस्ते दधाना श्रियम् ।
विद्युत्कोटिरवीन्दुकान्तिममला दन्तासुरोन्मूलिनी
ब्रह्मेन्द्राद्यभिवन्दिता च वरदा योगेश्वरी तां भजे ।।

मालगूड येथे अभ्यंकर घराण्यांच्या एकदर नऊ कुलदेवता आहेत, त्या जनूकाकांनी पुढील श्लोकात दिल्या आहेत —

ॐकारेशं प्रणम्याहं मारुगुण्डपुरस्थितान्
रामेश्वरं सोमनाथ खळानाथमीश्वरम् ।
वरदा चण्डिका भाना योगिनी कालिकामिति
सर्वकार्यसमृद्ध्यर्थं प्रार्थयामि कुलाधिपान् ।।

**भास्करशास्त्री**

काशीनाथभट्ट नाना याचे सर्वांत धाकटे चिरंजीव भास्करशास्त्री हे वासुदेवशास्त्र्यांचे आजोबा (पितामह) होत न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे, लोकमान्य बाळ गंगाधर टिळक, साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर यासारख्या महापुरुषामुळे त्यांच्या कुलाची नावे भारतात सुविख्यात होऊन त्यास प्रतिष्ठा प्राप्त झाली, असे प्रा. श्री म माटे यांनी एके ठिकाणी म्हटले आहे त्याचप्रमाणे भास्करशास्त्री यांच्यामुळे 'अभ्यंकर' हे कुलनाम सुविख्यात झाले साम्प्रत सर्व भारत देशभर ठिकठिकाणचे प्रसिद्ध शास्त्री व पंडित हे राघवेंद्राचार्य (गजेंद्रगडकर), भास्करशास्त्री (अभ्यंकर) नीळकंठशास्त्री (भट) व बालसरस्वती (रानडे) यांच्या शिष्य परंपरेत येतात " असे म्हटले जाते त्यापैकी बालसरस्वती हे भास्करशास्त्र्यांच्याच एका शिष्याचे प्रशिष्य होते यावरून भास्करशास्त्र्यांच्या विद्वत्तेची व कर्तबगारीची कल्पना येईल त्यांच्यामुळेच वैयाकरणकुलाची एक थोर अध्ययन-अध्यापन परंपरा आपल्या मागे आहे व तिचे रक्षण करणे आपले पवित्र कर्तव्य आहे अशी वासुदेवशास्त्र्यांस सतत जाणीव होती १९३८ च्या अपूर्व सत्कारसमारंभाच्या वेळी त्यांनी जे उत्तरादाखल भाषण केले, त्यामध्ये त्यांनी म्हटले आहे मी जें काही व्याकरण वेदान्त, धर्मशास्त्र मीमांसाशास्त्र वगैरे शास्त्रातील ग्रंथसपादनाचे व नवीन ग्रंथ लिहिण्याचे काम केले, ते करण्यात मी माझे कुलात परंपरागत आलेले अध्यापनाचें कर्तव्यच बजावले असे मी मानतो " (फर्ग्यु श्रॆ सप्टेंबर १९३८) म्हणून वासुदेवशास्त्र्यांस स्फूर्ति देणारी विभूति, याहि दृष्टीने भास्करशास्त्र्यांच्या चरित्राचे अवलोकन करणे उचित ठरेल

भास्करशास्त्र्यांचा जन्म सन १७८३मध्ये झाला त्यांचे परमशिष्य रामशास्त्री गोडबोले यांनी आपल्या नित्यपाठात म्हणण्यासाठी जें गुरुवंदनपर श्लोकाष्टक तयार केले होते, त्यामध्ये त्यांच्या देहयष्टीचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे – '*पण्डितवर्य भास्करशास्त्री यांचा देह उंच, वर्ण गहू, हात गुडघ्यापर्यंत पोचतील* असे दीर्घ बाहू, विशाल कपाळ व डोळे किंचित् तांबूस असून एका कानावर तीळ होता वृद्ध असूनहि त्यांच्या देहावर वृद्धत्वाची फारशी लक्षणें आढळत नसत' [२]

२ ईषद्रक्ते नयने विमलं भालं दीर्घं बिभ्रतमजरम् ।
वर्णे तिलकं पण्डितवर्यं वन्दे सद्गुरुभास्कररायम् ॥२॥
उन्नतकायं जानुविलम्बिपाणिं पाटलवर्णमयं च ।
सारज्ञं पण्डितवर्यं वन्दे सद्गुरुभास्कररायम् ॥६॥

(प्रस्तावना भाग, पृ ४२)

"अनुकुर्वाण शिवरूप त परमात्मान गजननमियम् ।
शान्तिसमुद्र पण्डितवर्यं वन्दे सद्गुरुभास्कररायम् ॥४॥
विद्यापीठ जितरिपुषट्क ससारार्णवभयहीन तम् ।
शुद्धाचरण पण्डितवर्यं वन्दे सद्गुरुभास्कररायम् ॥५॥"

भास्करशास्त्र्याना सहा वडील भाऊ असल्यामुळे वाई येथे त्याचा आप्तपरिवार फार मोठा होता सातारा हे जिल्ह्याचे ठिकाण, व ते वाईपासून अवघ्या वीस मैलावर असल्यामुळे भास्करशास्त्र्यावडे आप्तमडळीची जा-ये पुष्कळ असे याशिवाय आश्रित व अतिथि-अभ्यागताचेहि स्वागत नित्य होत असे त्यामुळे दरमहा ५० रुपये ही भास्करशास्त्र्याची प्राप्ति त्या वेळच्या राहणीच्या मानाने जरी पुष्कळ चागली असली, तरी सर्व खर्च भागून शिल्लक कधीच उरत नसे भास्करशास्त्र्याना तीन कन्या व वैजनाथ आणि महादेव असे दोन पुत्र होते त्यापैकी वैजनाथ हे शास्त्री असून महादेव हे वैदिक होते वैजनाथ-शास्त्री यास पुत्र नव्हता महादेवभट्ट यास प्रथम पत्नीपासून मोरेश्वर नावाचा एक मुलगा होता तो सवा महिन्याचा असतानाच ती पत्नी निवतली म्हणून त्यानी दुसरा विवाह केला त्याच्या द्वितीय पत्नीचे नाव दुर्गाकाकू असे होते भास्करशास्त्री वारले तेव्हा मोरेश्वरपत सुमारे २०-२२ वर्षांचे होते, त्या वेळी ते नोकरीधद्यानिमित्त सातारा सोडून गेले दुर्गाकाकूस दामोदर, रघुनाथ व वासुदेव असे तिघे मुलगे होते त्यापैकी सर्वांत धाकटे हेच म म वासुदेवशास्त्री होत त्याच्याच चरित्राचें आपणास पुढे विशेष अवलोकन करावयाचें आहे

दुर्दैवाने भास्करशास्त्र्याच्या वृद्धापकाळी वैजनाथशास्त्री व महादेवभट्ट हे त्याचे दोन्ही मुलगे अनुक्रमें सन १८५८ व १८६४ मध्ये मृत्युमुखी पडले। वडिलाच्या मृत्यूच्या वेळी वासुदेवशास्त्र्याचे वय अवघें दीड वर्षाचे होत। भास्करशास्त्र्याच्या दुःखास पारावार उरला नाही। स्वत चा वृद्धापकाळ चालेला व नातवडें अगदीच लहान। त्या नातवडाचे शिक्षण कसे पूर्ण होणार, अशा चितेनें त्यास ग्रासून टाकले होत तरी अगी बाणलेल्या विरक्त वृत्तीने त्या भयकर पुत्रशोकावर व चिंतेवर मात करण्याचा प्रयत्न करीत त्यानी आपल्या दिनचर्येत, अध्यापनात व अनुष्ठानात कधी खड पडू दिला नाही या त्याच्या असामान्य विरक्तीमुळेच त्यास 'सन्यास घ्या' अशी विनती करण्यात आली होती, परतु 'माझी नातवडें लहान आहेत, त्याचा विद्याभ्यास व्हावयाचा आहे मला सन्यास घेता येणार नाही' अशा स्पष्ट शब्दानी त्यानी त्या विनतीस नकार दिला वैराग्यावरहि मात करणारे हे अपत्यप्रेम किती हृदयस्पर्शी आहे।

—*१३ जानेवारी १८७१ रोजीं (पौष वद्य ७, शके १७९२) उत्तरायणारंभ झाल्या*नंतर (त्या काळी १२ जानेवारी हाच मकरसंक्रमणाचा दिवस होता दर एकाहत्तर वर्षांनी हा दिवस चोवीस तासांनी पुढे जातो, हें सुज्ञास विदित आहेच ) पूर्ण शुद्धीवर असताना, ' अतिसारेण मरणं साधूनामपि दुर्लभम् ' असे आप्तेष्टांना सांगून ईश्वराचे नामस्मरण करता करता भास्करशास्त्र्यांनी वयाच्या ८७ व्या वर्षी देहत्याग केला या वेळी वासुदेवशास्त्र्यांचे वय केवळ सात वर्षांचें होतें, परंतु पुढे जाणतपणी या आपल्या अत्यंत थोर पितामहांनी सुरू केलेले अध्ययनाध्यापनाचें व्रत सतत चालू ठेवण्याचें त्यांनी मनाशी ठरविलें असल्यास, त्यात आश्चर्य कसलें?

आपल्या आयुष्यातील अखेरच्या काळात एके दिवशी भास्करशास्त्री आपल्या पश्चात् आपल्या नातवांना कोण शिकविणार, अशा चिंतेत मग्न असताना, त्यांचे पट्टशिष्य रामशास्त्री गोडबोले यांनी त्यांच्या पायावर हात ठेवून म्हटले, ' मी प्रपंच न करता फक्त येथे राहून या मुलांना शिकवीन! " (प्रस्तावना खंड, पृ १७ ) *महर्षि रामशास्त्र्यांनी केवळ भावनेच्या भरात आपल्या गुरुजींना दिलेले हे एक* सामान्य आश्वासन नसून, जिवाचा धडा करून त्यांनी केलेली ती भीष्मप्रतिज्ञा होती! थोड्याच दिवसानंतर या प्रतिज्ञेचा पुनरुच्चार करण्याची त्यांच्यावर पाळी आली भास्करशास्त्र्यांच्या मृत्यूच्या दहाव्या दिवशी त्यांच्या पिंडास कावळा शिवेना ! तेव्हा रामशास्त्र्यांनी "मी आपल्या घरी येऊन नातवडांचें शिक्षण पूर्ण करीन" असा आपल्या प्रतिज्ञेचा पुन्हा उच्चार करताच तावडतोब त्या पिंडास कावळा शिवला! "[६] "पुढे वसल्याहि अडचणी आल्या तरी दूर करून ते (रामशास्त्री) *सातारा येथेच राहिले व त्यांनी आपल्या गुरुजींच्या नातवांना विद्या शिकविली* ते नातू म्हणजे मी व आमचे बंधु (सातारा येथे राहणारे श्री रघुनाथशास्त्री) हे होत आम्हाला विद्याभ्यासासाठी घर सोडावे लागले नाही " असं स्वत वासुदेवशास्त्र्यांनी म्हटले आहे (प्रस्तावना खंड, पृ १७) खरोखर धन्य ते गुरुवर्य आणि धन्य ते शिष्योत्तम ! वासुदेवशास्त्र्यांकडे चालत आलेला घराण्याचा वारसा हा असा श्रेष्ठ व खरोखर बहुजन्मदुर्लभ होता!

* * *

---

६ *अभ्यंकर-कुटुंबात ही आख्यायिका सर्वांस सुपरिचित आहे*

# ३ : बालपण

वासुदेवशास्त्र्यांचा जन्म दि ४ ऑगस्ट १८६३ (शके १७८५, अधिक श्रावण कृष्ण ६ ) या दिवशी सातारा येथे झाला त्यांच्या वडिलांचे नाव महादेवभट्ट व मातुश्रींचे नाव दुर्गाबाकू असे होते त्यांचे चुलते वैजनाथशास्त्री दिवगत होऊन पाच वर्षे झाली होती ती एक दुर्घटना सोडल्यास, शास्त्रीबुवांच्या जन्मकाळी त्यांच्या घरची परिस्थिति समाधानकारक होती असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही त्यांचे आजोबा भास्करशास्त्री यास दरमहा ५० रुपये निवृत्ति वेतन असल्यामुळे घरात आर्थिक अडचण मुळीच नव्हती आप्तमंडळी, मुलेबाळे, आश्रित, अतिथि-अभ्यागत व विद्यार्थिगण यांनी घर गजबजून गेले असल्यामुळे एकदर वातावरण प्रसन्नतेचे व सुखासमाधानाचे होते

पण शास्त्रीबुवा दीड वर्षांचे झाले नाहीत तोच एकाएकी त्याचे वडील महादेवभट्ट वारले आणि घरावर एकदम दु खाची अवकळा पसरली। आजोबा भास्करशास्त्री हेच घरातील कर्ते पुरुष, परतु ८० च्या पुढे वय गेल्यामुळे ते अगदी पिकले पान झाले होते। वृत्तीने विरक्त असले तरी या वृद्धापकाळी दोन्ही कर्ते पुत्र दिवगत झाल्यामुळे त्यांची कबरच खचली। विशेषत आपल्या नातवडांचे शिक्षण कसे पूर्ण होणार या चितेने त्यास ग्रासून टाकले। तथापि मोठ्या धैर्याने आपला अध्यापनाचा नित्यक्रम त्यांनी तसाच चालू ठेवला होता

वासुदेवशास्त्र्यांची स्मरणशक्ति खरोखर अपूर्व असल्यामुळे घरामध्ये नित्य अध्ययन करीत असलेल्या विद्यार्थ्यांची घोकपट्टी ऐकून ऐकून वयाच्या पाचव्या वर्षी 'श्री' हे मुळाक्षर काढता येण्यापूर्वीच रूपावली व समासचक्र त्यास तोडपाठ झाली होती, असे डॉ वा गो परांजपे यांनी म्हटले आहे[१]

लवकरच सातारा येथील एका मराठी शाळेत त्यांचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले आणि घरच्या पाठशाळेत त्यांनी 'अमरकोशा' चे पाठ घेण्यास सुरवात केली आश्चर्याची गोष्ट अशी की वयाच्या सातव्या वर्षी संपूर्ण अमरकोश आणि पाणिनीय व्याकरणसूत्रांची अष्टाध्यायी ते तोंडपाठ म्हणू लागले।

- दरम्यान एकाएकी दुधात मिठाचा खडा पडून घरातील सर्व प्रसन्न वातावरण उद्ध्वस्त झाले। भास्करशास्त्री दिवगत होताच घरामधील आप्तमडळी, आश्रित इत्यादि एकदम दिसेनासे झाले। श्रीमतीस दूर सारून, दारिद्र्याने

१ As a boy of five he did not know how to write 'श्री' when he knew by heart, because he lived in the midst of students, the रूपावली and समासचक्र' – The Literary Career of Vasudeoshastri Abhyankar, by prof V G Paranjpe (फर्ग्यु मे जुलै १९२८)

सर्व पराचा तावा घेतला मातु श्री दुर्गाकाकूस दुःख करीत बसण्यासहि फुरसत नव्हता ! आपण व आपली अल्पवयी मुले याचा चरितार्थ कसा चालणार हाच मुख्य प्रश्न त्यास भेडसावू लागला या वेळी त्याचे ज्येष्ठ चिरंजीव दामोदरपंत पधरा वर्षांचे, द्वितीय चिरंजीव रघुनाथशास्त्री नऊ वर्षांचे आणि कनिष्ठ चिरंजीव वासुदेवशास्त्री अवघे सात वर्षांचे होते आतापर्यंत श्वशुराच्या कृपाछत्राखाली घरातील २०-२५ माणसांच्या प्रपचाचा गाडा त्यांनी मोठ्या नेकीने चालविला होता, परतु आता मासिक प्राप्ति एकदम शून्यावर येऊन बसल्यामुळे सर्व नाड्या आखडण्याचीच वेळ येऊन ठेपली ! मोठा प्रपच व विरक्त वृत्ति यामुळे भास्कर-शास्त्र्यांच्या हातून द्रव्यसंचय घडणं जवळजवळ अशक्य होतं आपले नातू वासुदेव-शास्त्री यांच्या व्रतबंधनासाठीच केवळ, त्यांनी १५० रुपये बाजूस काढून ठेविल्या-मुळे तेवढी काय ती आर्थिक पुंजी दुर्गाकाकूंच्या जवळ होती एवढ्यात सुदैवाने भास्करशास्त्र्यांनी ज्या एका गृहस्थास हातावर १५० रुपये उसने दिले होते, त्यांनी ती कठीण परिस्थिति ध्यानात घेऊन ती सर्वच्या सर्व रक्कम परत केली ! दुर्गाकाकूस अथवा कोणासहि ही गोष्ट माहीत नसल्यामुळे त्या गृहस्थाचा हा प्रामाणिकपणा खरोखर प्रशंसनीय म्हटला पाहिजे त्या एकदर तीनशे रुपयांपैकी केवळ ५० रुपये खर्च करून दुर्गाकाकूंनी वासुदेवशास्त्र्यांची मुंज उरकली आणि आपले बधु पाडळी येथील श्री गणेश लक्ष्मण गद्रे यांच्या मदतीच्या आधारावर त्या अत्यंत बिकट परिस्थितीत प्रपचाचा गाडा हाकण्यास प्रारंभ केला

या आपत्तीमुळ दुर्गाकाकूंचे तिन्ही मुलगे वयाने लहान असले, तरी समजुतीने एकदम प्रौढ बनले ! काही वर्षांनंतर दामोदरपंतानी सरकारी नोकरीस आवश्यक अशी इग्रजी पाचव्या इयत्तेची परीक्षा उत्तीर्ण झाली असल्या मुळे नोकरी पतकरली व त्यास दरमहा दहा रुपये पगार मिळू लागला त्यातीलच ७|८ रुपये दरमहा प्रपचखर्चासाठी ते आपल्या मातुश्रीकडे सातारा येथे पाठवू लागले त्या वेळी दुर्गाकाकूस ते ७|८ रुपये किती बहुमोलाचे वाटले असतील !

रघुनाथशास्त्री व वासुदेवशास्त्री यांनी महर्षि रामशास्त्री गोडबोले यांच्या जवळ आपले व्याकरणशास्त्राचे अध्ययन मोठ्या नेटाने सुरू केले ! गुरुजींना (आपल्या पितामहांना) साक्ष ठेवून केलेल्या प्रतिज्ञेनुसार केवळ आपल्या शिक्षणासाठी आपल्या घरी दिवसभर राहून आपणास अत्यंत मनापासून विद्यादान करणाऱ्या त्या सद्धर्मरत आद्य आचार्यांचा या दोघा बधूस त्या वेळी केवढा आधार वाटला असेल ! आपल्या डमरूमधून चौदा वर्णसूत्रांचे बोल काढणाऱ्या शिवाचेच ते जणू अवतार आहेत असे त्यास भासले असल्यास कोणासहि आश्चर्य वाटण्याचे कारण नाही ! [२]

रामशास्त्र्याच्या महर्षितुल्य व्यक्तिमत्त्वाचा वासुदेवशास्त्र्याच्या मनावर एवढा दृढ परिणाम झाला होता की, पुढे उतारवयातहि रामशास्त्र्याचा उल्लेख करताना आपल्या डोळ्यात येणारे कृतज्ञतेचे अश्रु आवरून धरणें त्यास अशक्य होई, असें प्रा चिं रा देवधर यानी वासुदेवशास्त्र्याच्या मृत्युलेखात म्हटले आहे ३ अशा प्रकारें वयाच्या सातव्या वर्षीच वासुदेवशास्त्र्याचें शास्त्राध्ययन सुरू झालें व जरी लौकिक दृष्टया त्या वेळी त्याचें बालपण कायम असले, तरी वृत्तीमध्ये अकाली निर्माण झालेल्या प्रौढपणामुळे वस्तुत वयाच्या सातव्या वर्षीच त्याचे निरागस बालपण सपले होतें आणि जणू प्रौढ विद्यार्थिदशेंत त्यानी प्रवेश केला होता। ज्या गतीने, कसोटीने व समजसपणाने आपले यापुढील विद्याध्ययन त्यानी सपविल, त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते

* * *

२ माधल्करशास्त्र्यानी रामशास्त्र्याचें वर्णन 'त्र्यक्ष (शिव) साक्षात्' असेंच केले आहे (याच पुस्तकातील पृ १६ पाहा)

3 'It was his guru Ramashastri who undertook the task of conducting the pathashala at Satara and of looking to the education of Vasudeoshastri, a task which he performed with such thorough zeal and devotion that the late Vasudeoshastri could ill conceal the tears of gratitude that moistened his eyes whenever he had occasion to refer to his guru'

# ४ : महर्षि रामशास्त्री गोडबोले

वयाच्या सातव्या वर्षी खरोखर पोरके झालेले वासुदेवशास्त्री 'महाराष्ट्राचे पतंजलि' अथवा 'विद्वन्मुकुटरत्न' कसे झाले? ज्याच्या सामान्य शिक्षणाचीसुद्धा त्यांच्या आजोबास (भास्करशास्त्र्यांस) घोर चिंता लागून राहिली होती, ते इतक्या महत्पदास कसे पोचले? सहृदयांनी आश्चर्यचकित करून सोडणारा हा प्रश्न आहे, परंतु त्याचें उत्तर देणे फारसे कठीण नाही 'थोर लोक कसे निर्माण होतात?' या प्रश्नाचे लोकमान्य टिळकांनी दिलेले पुढील उत्तर प्रसिद्ध आहे – "जन्मजात सद्गुण व पोषक परिस्थिति यामुळे थोर लोक निर्माण होतात" म्हणजे बुद्धिमत्ता, धैर्य, सुजनत्व यासारखे जन्मजात थोर सद्गुण तर अंगी पाहिजेतच, कारण "सत्कवि निसर्गत जन्मास येतात त्यास घडविता येत नाही" या अर्थाचे आंग्लवचन थोर व्यक्तींच्या बाबतींतहि खरे आहे, परंतु त्या जन्मजात गुणास पोषक अशी परिस्थिति असणेंहि आवश्यक आहे ती तशी असल तरच त्या थोर सद्गुणाचा विकास होऊन मनुष्याच्या हातून कर्तबगारी घडू लागते व शेवटी तो थोरपणास चढतो भीष्मप्रतिज्ञ महर्षि रामशास्त्र्या-सारख्या आदर्श सद्गुरूचा नित्य सहवास, त्यांनी आपल्या पितामहाची पाठशाळा चालू ठेविली आहे अशी जाणीव, थोर साध्वी अशा मातुश्री, अत्यंत थोर चारित्र्यसंपन्न दोघे वडील बंधु व घरच्याच पाठशाळेंत अध्ययन करणारे बुद्धिमान् विद्यार्थी–ही परिस्थिति वासुदेवशास्त्र्यांसारख्या कुशाग्रबुद्धिमंत कर्तव्यदक्ष व सत्प्रवृत्त विद्यार्थ्यास अत्यंत पोषक व महत्पदास चढविण्यास समर्थ ठरली नसती तरच नवल! या परिस्थितीमुळे त्यांच्या ठिकाणी असलेल्या जन्मजात गुणाचा विकास होऊन ते महत्पदास चढले यात शंका नाही विशेषत साक्षात महर्षि असलेल्या सद्गुरूचा लाभ, हे तर अनेक जन्मातील सुकृताचें फळ होय व हे त्यांच्या थोरवीचें एक प्रमुख कारण आहे असे म्हटले पाहिजे १९३८ साली झालेल्या सत्कारसमारंभाच्या वेळी उत्तरादाखल भाषण करतांना स्वत वासुदेवशास्त्र्यांनी जे पुढील उद्गार काढले, त्यावरून हीच गोष्ट सिद्ध होते –

"--- --- या ठिकाणी माझ्या अंत करणात निवास करणाऱ्या परमपूज्य सद्गुरुचरणांचाच आपण सत्कार करीत आहात हे माझें शरीर म्हणजे या उत्सवासाठी योजलेली केवळ एक प्रतिमा आहे शिष्यमंडळी आपल्या सद्गुरूच्या पादुका मस्तकी धारण करतात, परंतु याचे मूळ कारण म्हणजे शिष्यमंडळीस सद्गुरुविषयी वाटणारा केवळ पूज्यभाव, हेच समजले पाहिजे, कारण सर्वसामान्य पादत्राणांची कधीच कोणी पूजा करीत नाही, परंतु थोरांचा आश्रय लाभल्यामुळे त्या पादुकांस पूजनीयता प्राप्त होते" वासुदेवशास्त्र्यांच्या चरित्रात महर्षि

रामशास्त्र्यांस केवढें महत्त्वाचें-नव्हेतर अद्वितीय-स्थान आहे हें या उद्गारावरून[1] आता आपल्या ध्यानात येईल

रामशास्त्री हे मूळचे संगममाहुली येथे राहणारे हे ठिकाण साताऱ्यापासून चार मैलावर कृष्णाकाठीं आहे रामशास्त्र्यांचे घराणे वैदिकाचे होते त्यांना पाच भाऊ होते ज्येष्ठ बंधूचे नाव विनायकभट्ट व कनिष्ठ बंधूचे नाव गोविंदभट्ट असे होतें सर्व बंधूमध्ये रामशास्त्र्यांचा क्रमांक पाचवा होता त्यांचा जन्म सन १८३७ मध्ये झाला ते विद्याभ्यासासाठी साताऱ्यास भास्करशास्त्री यांच्याजवळ येऊन राहिले " त्यांची शरीरयष्टि फार उंचहि नव्हती व स्थूलहि नव्हती मध्यम मानाची लहानशीच मूर्ति होती, मात्र ती अत्यंत बळकट, काटक, निरोगी आणि तेजस्वी होती वर्ण निमगोरा होता " असे वासुदेवशास्त्र्यांनी त्यांचें वर्णन केले आहे. (प्रस्तावना सद्ध पृ १८) त्यांचे प्रशिष्य शंकरशास्त्री मारुलकर यांनी त्यांचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे —

' नेत्रे नीले स्मितयुतमुखं यस्य वाणी प्रसन्ना
नैव स्थूलो न च न च कृशः श्यामलो यस्य देहः ।
धीमान् शास्त्रप्रवचनपटुः शान्तमूर्तिर्विरागः
स्पष्टं साक्षादिव विजयते सद्गुरू रामशास्त्री ॥"

प्रा काशीनाथपंत यांनी त्यांचें वर्णन 'शमिवत् सुसौम्य' असे केलें आहे विठ्ठलशास्त्री धारूरकर, रघुनाथशास्त्री अभ्यंकर, वासुदेवशास्त्री अभ्यंकर, श्रीधरशास्त्री ईत्यादि सारखे विद्वद्वर म्हणून कीर्ति मिळविणारे शिष्य त्यांनी तयार केले यावरून त्यांच्या असामान्य विद्वत्तेची सहज कल्पना येईल, परंतु विद्वत्ता हें त्यांचें खरं वैशिष्ट्य नव्हे—त्यांचें खरं वैशिष्ट्य म्हणजे त्यांची अद्वितीय गुरुभक्ति[1] गुरुजींच्या निधनानंतर आपली भीष्मप्रतिज्ञा खरी करून दाखविताना त्यांच्या गुरुभक्तीची खरीखुरी कसोटी झाली।

---

१ हृदयस्था गुरो पादा मस्तिष्कस्थैश्च सुस्थिरम् ।
उत्साहमूर्तिविशेया केवलं शास्त्रानुरक्तिम् ॥
आचार्यपादुका यस्य निरता भक्तासहि ।
वीर्यं तु तत्र विशेष भक्तित्वं हि नेयत्ता ॥
ज्ञानात् गर्वनाशाच्च सेव्या इव स्वरूपत ।
नि तु यशादिता पूर्ण महत्तमाद्यया यत ॥"
(धर्म्य सं नव्हेंबर १९३८)

गुरुजीच्या पश्चात् थोडीथोडकी नव्हे, तर ३६ वर्षे (१८७१ ते १९०६) अखंडितपणे त्यांनी अत्यंत निष्ठेने गुरुजींच्या पाठशाळेंत अध्यापनकार्य केले त्या वेळच्या त्यांच्या दिनचर्येचें शास्त्रीबुवानी पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे – "आमरणान्त शीतजलाचें स्नान असे प्रथम प्रथम दररोज व नंतर एक दिवसाआड ते (रामशास्त्री) सातान्याहून दोन कोस पायी माहुलीस जाऊन कृष्णास्नान करून विद्यार्थ्यांना पढविण्यासाठी परत येत असत व दररोज तीनशें नमस्कार घालून संध्यावंदन, देवपूजा, सप्तशतीपाठ वगैरे नित्य आन्हिकक्रमाला सुरवात करीत त्यांचेजवळ नेहमी २५ पक्षा अधिक विद्यार्थी शास्त्राध्ययनासाठी राहत असत त्या सर्वांना योग्यतेप्रमाणे मुळापासून भाष्यान्त ग्रंथाचे पाठ ते सांगत असत अशा रीतीने दररोज अहोरात्र मिळून कमीत कमी ७ पासून ८ तासपर्यंत आन्हिक कर्मानुष्ठान व काही कमी पण तितकेच तास वेदान्तव्याकरणादि शास्त्रांचे अध्यापन, याप्रमाणे अविच्छिन्न जवळजवळ चार तपपर्यंत ज्यांची खडतर तपश्चर्या झाली, ते महर्षिसमान नव्हेत, तर महर्षिच आहेत अशी कोणाची भावना झाल्यास त्यांत काय वावगें आहे? न्यायमूर्ति रानडे हे रामशास्त्र्यांना महर्षि असें म्हणत हे लोकप्रसिद्ध आहे" (प्रस्तावना खंड, पृ १८)

महर्षि रामशास्त्र्यांनी आपले प्रतिज्ञापालनाचे कार्य किती अनन्यनिष्ठेने बजावले, हे खरोखर पाहण्यासारखें आहे गुरुजींच्या पाठशाळेंत अध्ययनाध्यापन करण्यातच त्यांनी आपलं सर्व आयुष्य वेचले त्या पाठशाळेंत विनावेतन अध्यापन केले जात असल्यामुळे व पाठशाळेस कोठूनहि अनुदान वगैरे मिळत नसल्यामुळे पाठशाळेकडून त्यांस कोणतीच द्रव्यप्राप्ति होणे शक्य नव्हतं तरीसुद्धा चरितार्थासाठी त्यांनी याज्ञिकीसारखा कोणताहि व्यवसाय केला नाही, की आपल्या कुटुंबीयाचीहि कधी फारशी काळजी केली नाही विद्वान् म्हणून काही संस्थानिकाकडून अथवा क्वचित् काही धनिकाकडून जो वार्षिक बिदागी अथवा शास्त्री म्हणून किरकोळ दक्षिणा मिळत असेल, तीच त्यांची आर्थिक प्राप्ति! आणि तरीसुद्धा त्यांच्या चित्ताची समता–स्थिरवृत्ति–कधी ढळली नाही

घरी चालून आलेल्या मोठमोठ्या नोकऱ्यांसहि त्यांनी अत्यंत सौजन्यपूर्वक नकार दिला! या त्यांच्या स्वार्थत्यागाचें वासुदेवशास्त्र्यांनी पुढीलप्रमाणें वर्णन केलं आहे – "एकदा मी व माझे बंधु रघुनाथशास्त्री सातारा येथे आमचे घरातील ओटीवर गुरुवर्य रामशास्त्री याजकडे कौस्तुभ, शेखर वगैरेवरील ग्रंथाचा पाठ घेत असता श्रीमंत सरकार पंत प्रतिनिधि संस्थान औंध, याचेकडून रा अण्णासाहेब गोडबोले (संस्थानचे त्या वेळचे अधिकारी कारभारी) हे गुरुवर्य रामशास्त्री यां-याकडे आले आणि त्यांनी श्रीमंतांचा निरोप सांगितला, तो असा – 'श्रीमंत पंत प्रतिनिधि सा यांचे मनात आपली आजन्म सेवा करावी अशी इच्छा आहे. आपल्या

स्नानसंध्यादि अनुष्ठान, अध्ययनाध्यापन, छात्रवर्ग आणि प्रपंच यासंबंधी योगक्षेमाची आपल्या इच्छेप्रमाणे योग्य ती सर्व व्यवस्था संस्थानातून होईल तेव्हा आपण औंधास राहण्यास यावें आणि आपल्या सेवेचा लाभ आम्हाला घडवावा' आपल्याला ही विनंती करण्यासाठी श्रीमंतांनी मला आपणाकडे पाठविलें आहे व आपणाला नेण्यासाठी श्रीमन्तांनी आपली खास घोडयाची गाडीहि मजबरोबर दिली आहे गुरुवर्य रामशास्त्री यांनी हें सर्व स्वस्थ चित्ताने ऐकून घेतलें व नंतर कुशल प्रश्न व शिष्टसमाचरण झाल्यावर, 'विचार करून उद्या काय तें मी आपणास कळवितो असे रा अण्णासाहेब यास सांगितलें. त्याचप्रमाणे विद्याखात्यातील एक अधिकारी रा नारायण वि-गु बापट यांनी समक्ष शास्त्र्यांस जाऊन गुरुवर्य रामशास्त्री यांना मुंबईयेथील एल्फिन्स्टन कॉलेजातील रिकाम्या झालेल्या जागेवर येण्याविषयी विनंती केली आणि 'आपणाकडे घरीच विद्यार्थी वगैरे येत जातील. त्यामुळे आपल्याला कॉलेजात जाण्यायेण्याची तसदी न पडून आपल्या स्नानसंध्यादि अनुष्ठानालाहि व्यत्यय येणार नाही' असें सांगितलें त्यानाहि वरीलप्रमाणेच, 'विचार करून उद्या काय तें कळवितो' असें उत्तर दिलें, परंतु तर्थे ते गेले नाहीत वे शा स राजारामशास्त्री बोडस ह्यांना त्या जागेवर नेमले गेले त्याप्रमाणे आणखीहि एकदोन उदाहरणें सांगता येतील, परंतु विस्तार होईल म्हणून आटपतें घेतो" (प्रस्तावनाखंड, पृ १७)–प्रतिज्ञापालनाचा केवढा हा दृढनिश्चय! स्वत वरून जगाची पारख करणाऱ्या सामान्य मनुष्याला आधुनिक काळातील या अलौकिक गुरुभक्तीची अथवा प्रतिज्ञापालनाची यथार्थ कल्पना येणे शक्य नाही या गोष्टीवर त्याचा विश्वासच बसणार नाही! परंतु ही संपूर्ण वस्तुस्थिति आहे संपत्ति तर राहोच, पण विद्वान् म्हणून कीर्ति मिळविण्याचीहि रामशास्त्र्यांनी कधी अभिलाष धरला नाही! आमरण अज्ञात राहून, अखंड धर्माचरण सांभाळून विद्यार्थ्यांस पढविण्याचें कार्य ते करीत राहिले' ज्यांनी जन्मात आगगाडीला पाय लावला नाही असे जर कोणी असतील तर ते एक गुरुवर्य शास्त्रीबावाच होत' असें त्यांच्याविषयी वासुदेवशास्त्र्यांनी म्हटलें आहे (प्र ख पृ १८) – इतर कडक धर्माचरण ते पाळीत असत रोज सूर्यनमस्कार, शंकरास एकादशनी पार्थिवपूजा व सप्तशतीचा पाठ हे त्यांचे रोजचे आन्हिक कधीच चुकले नाही

रामशास्त्र्यांची अध्यापनपद्धतिहि विशेष उल्लेखनीय आहे आपल्या गुरुजीजवळ "व्याकरण, न्याय वगैरे शास्त्रांचें अध्ययन त्यांनी इतकें पूर्णतेने केलें होतें की शिष्यांना पढविताना ते कधीहि आपणाजवळ पोथी घेत नसत रात्रीच्या वेळी शिष्यांना बोलावून त्यांच्याकडून ते पूर्वपक्ष उत्तरपक्ष वगैरे स्वरूपाने एकमेकांशी चर्चा करून विषय तयार करवून घेत" (प्र ख पृ ३९) रामशास्त्री वृद्धपणी न्यायमाळा देवदर्शनास जात असता त्यांच्याबरोबर नेहमी एकदोन शिष्य असत व

त्याहि वेळाचा सदुपयोग करण्यासाठी ते त्या शिष्यांस वाटेने जातां जाताच पडविलेल्या विषयाची विवरणिका देत असत.या बाबतीत प्रा. काशीनाथपंत यांनी आपला एक अनुभव नमूद करून ठेवला आहे; तो असा की वयाच्या नवव्या वर्षी रूपावली, समासचक्र व रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गातील काही श्लोक एवढेच संस्कृत विषयाचे ज्ञान असताना, पश्चरा दिवस सध्याकाळी रामशास्त्र्यांच्या बरोबर देवदर्शनास जाण्याचा योग त्यांस (काशीनाथपंतास) आला होता; त्या वेळी रामशास्त्र्यांनी त्यांच्याकडून तोंडी सूत्रवृत्तीसहित 'राम' शब्दाची सर्व विभक्तींची रूपें व 'नू' पासूनची सर्व लकाराची रूपें तयार करून घेतली ! अशा प्रकारे पुस्तकाशिवाय व्याकरणशास्त्राचा हा पहिला धडा महर्षि रामशास्त्र्यांकडून मिळण्याचें भाग्य आपणास लाभले, याची आपणांस वारंवार आठवण येते, असेहि काशीनाथपंतांनी त्या ठिकाणी म्हटले आहे (पाहा–प्र. सं. पृ. ३९)–अध्यापनकुशल सद्गुरु व बुद्धिमान् सच्छिष्य, असा मणिकाचनयोग आला असता किती श्रेष्ठ शुभ फळ मिळतें, याचाहि प्रत्यय या उदाहरणावरून आपणास येतो. रामशास्त्री आपल्या शिष्यवर्गांना व्याकरणासारख्या गहन विषयाचेहि पाठ देताना आपल्या विनोदपटुत्वामुळे हसवीत व विषय सुलभ करून समजावून देत, हाहि त्यांचा एक विशेष ध्यानात ठेवण्यासारखा आहे.

व्यावहारिक बाबतीत अनेकांनी अनेक प्रश्न विचारले असता रामशास्त्री स्वयस्फूर्तीने त्यास उत्तरादाखल जें सांगत, ते खरें होत असे, असा आपला अनुभव वासुदेवशास्त्र्यांनी नमूद करून ठेवला आहे. (पाहा–प्र. स पृ १८) हा त्यांच्या तप सामर्थ्याचाच प्रभाव म्हटला पाहिजे.

१९१३ साली वयाच्या ७६ व्या वर्षी महर्षि रामशास्त्री दिवंगत झाले. त्यांना मरणहि मोठें भाग्याचें आले; कारण मरणाच्या दिवशी नित्याप्रमाणे पार्थिवपूजा संपवून त्यांनी सप्तशतीचा पाठ सुरू केला तोंच एकाएकी हृदयक्रिया बंद पडून ते कैलासवासी झाले !

'सत्य हे कल्पितापेक्षा अद्भुत असते'[2] हें वचनसुद्धा एक अद्भुत सत्य असून त्याचा प्रत्यय अनेक अलौकिक मानवी व्यक्तींच्या कर्तबगारीकडे पाहिल्यानंतर आपणास आल्याशिवाय राहत नाही अलौकिक गुरुभक्ति, विद्वत्ता, तप.सामर्थ्य इत्यादि सद्गुणांनी संपन्न असलेले महर्षि रामशास्त्री याचे व्यक्तिमत्त्व पाहिल्यानंतर तें खरोखरच एक मानवी चमत्कार होते असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति खास ठरणार नाही.वासुदेवशास्त्र्यांस अशा सद्गुरूचा लाभ झाला, हे त्यांचे केवढें भाग्य !

* * *

2. Truth is stranger than fiction.

# ५ : विद्याध्ययन

"स्वतंत्र बुद्धीचे विद्वान् कसे निर्माण होतील आणि शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार होऊनहि त्याचा दर्जा उच्च कसा राहील-त्यासाठी कोणत्या अध्यापनपद्धतीचा अवलंब केला पाहिजे-असा दुहेरी प्रश्न सध्या शिक्षणशास्त्रज्ञास अस्वस्थ करून सोडीत आहे, त्या दृष्टीने म म वासुदेवशास्त्र्यास लाभलेले शिक्षण व त्यांचे वाङ्मयीन कार्य यांचे सूक्ष्म अवलोकन करणे अत्यंत उपयुक्त ठरेल" असा अर्थाचे डॉ वा गो-परांजपे यांनी वासुदेवशास्त्र्यासंबंधीच्या आपल्या लेखात जे विधान केले आहे[१] ते अगदी यथार्थ आहे. शिक्षणशास्त्राच्या दृष्टीनेहि वासुदेवशास्त्र्यांच्या चरित्राकडे पाहणे अतिशय उद्बोधक ठरेल

१९३८ सालच्या सत्कारप्रसंगी आपल्या भाषणात वासुदेवशास्त्र्यांनी असे म्हटले आहे -"शेवटच्या क्षणापर्यंत कोणताहि अडथळा न येता आपल्या हातून विद्येची उपासना व्हावी, अशी माझ्या मनाची आकांक्षा आहे"[२] हे त्यांचे उद्गार इतके सत्यपूर्ण आहेत की,त्यांच्या एकंदर जीवनाकडे पाहिले असता वयाच्या ७५व्या वर्षापर्यंतच नव्हे, तर त्यानंतरहि त्यांची अखंड ज्ञानोपासना चालू होती, ही गोष्ट अगदी स्पष्टपणे आपल्या ध्यानात येते, कारण 'मायापरिशुद्धि' हा ग्रंथ वयाच्या ७६ व्या वर्षी १९३९ साली त्यांनी लिहिला व त्याच वेळी तो प्रसिद्धहि झाला त्यानंतर अखेरपर्यंत साधनामोद व मोक्षामोद या अपूर्ण राहिलेल्या संकल्पित ग्रंथाचे चिंतन व टिपण करण्याचे त्यांचे काम चालू होते व्याकरणमहाभाष्याच्या मराठी भाषांतराची प्रस्तावना तर त्यांनी मृत्यूपूर्वी सुमार सहा महिने संपविली ती संपूर्ण जशीच्या तशी प्रा काशीनाथपंतांनी प्रस्तावना खंडात छापली आहे (पाहा-प्र स पृ ७१ ते ९९) वयाच्या सातव्या वर्षी ज्ञानोपासना हे आपल्या आयुष्याचे

१ "The literary training and the literary achievements of M M Vasudeoshastri Abhyankar would be well worth a detailed study on account of the two-fold problem that agitates the minds of the educationists of to-day, how could literary training be made more productive of original scholarship? What methods of teaching are calculated to produce the best results?" (पर्यु श्री जून १९३८)

२ "उत्तमाप्ध्यामपर्यंत विद्यादेव्या उपासना।
स्यादनविघ्ना मेनाप्येवमर्थयते मन ॥"
(पर्यु श्री. सप्टे १९३८)

ध्येय म्हणून त्यांनी कदाचित् ठरविले नसेल, परंतु ज्या उत्साहाने व परिपूर्णतेने त्यांनी आपले विद्याध्ययन संपविले, त्यावरून ज्ञानार्जनाची उत्कट इच्छा अथवा तळमळ त्यांच्या ठिकाणी होती, यात मुळीच शंका नाही ही उत्कट इच्छाच विद्यार्थ्यांचे पहिले लक्षण आहे, 'विद्यार्थी' शब्दाचा अर्थच मुळी तसा आहे वासुदेवशास्त्री आजन्म विद्यार्थी होते, परंतु लौकिक अर्थाने मानारला क्षेमेपर्यंत, म्हणजे वयाच्या २७ व्या वर्षापर्यंत ते विद्यार्थी होते या काळात मुख्यत विद्यार्जनावर त्यांनी आपले सर्व लक्ष केंद्रित केलें होतें या विद्यार्थिदशेंत त्यांनी कसे विद्यार्जन केलें, हें यापुढे पाहण्यासारखें आहे

गुरुवर्य रामशास्त्री गाडवाल दररोज सकाळी माहुलीस आपले स्नानसंध्या, सूर्यनमस्कार, पूजा इत्यादि धार्मिक आह्निक उरकून पायी सुमारे नऊ वाजता मानारला येत त्यानंतर ९ ते ११ पर्यंत दोन तास ते विद्यार्थ्यांस शिकविण्याचे काम करीत व तेथेच भोजन झाल्यानंतर सामान्यत दुपारी १ ते ४ पर्यंत पुन्हा अध्यापन करीत नंतर ते माहुलीस पायी परत जात व कृष्णा नदीवर संध्या उरकून मग घरी जात सध्याकाळी देवाच्या धूपारतीनंतर अर्धा तास स्तोत्रपाठ म्हणण्याचाहि त्यांचा नियक्रम असे पुन्हा दुसऱ्या दिवशी सकाळी नऊ वाजता ते मानारला येत वासुदेवशास्त्र्यांच्या या घरच्या पाठशाळेंत सुमार २५ विद्यार्थी असत यावद्दल रामशास्त्र्यांना कोणतेंहि वेतन नव्हतं अथवा सर्व दिवस याच कामात गेल्यामुळे त्यांना आपल्या व कुटुंबीयांच्या उपजीविकेसाठी कोणता उद्योगहि करता आला नाही म्हणूनच या त्यांच्या अलौकिक त्यागाचा वासुदेवशास्त्र्यांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला असावा व स्वत चा अभ्यास कसोशीने पूर्ण करून अध्यापनाच्या बाबतीतहि गुरुजींना जास्तीत जास्त मदत करण्याचे त्यांनी ठरविलें असावें असें दिसते या काळात विशेषत वयाचीं ८ ते २० ही वर्षे, वासुदेवशास्त्र्यांची दिनचर्या सामान्यत पुढीलप्रमाणे असे –

सकाळी सहाच्या सुमारास अर्थातच इतर विद्यार्थ्यांबरोबर उठून स्नानसंध्यादि प्रात कर्म उरकून सात वाजता ते अभ्यासास बसत ७ ते ९ पर्यंत मुख्यत पाठांतर व नित्यविलेल्या विषयाची चिंतनिका असा त्यांचा अभ्यास चाले सिद्धान्तकौमुदीच्या तीन पानांची संथा सामान्यत दिलेली असे व ८ १० दिवसात हुशार मुलांची एवढीं पाने पाठ होत असत नऊ वाजता गुरुजी (रामशास्त्री) आल्यानंतर अकरा वाजेपर्यंत म्हणजे दोन तास गुरुजींच्या जवळ आपल्या सहाध्यायींबरोबर त्यांचा अभ्यास चाले भोजन व विश्रांति झाल्यावर १ ते ४ पर्यंत गुरुजींच्या जवळ त्यांचें पुन्हा अध्ययन होई या वेळी बहुधा मुख्य व्याकरण विषयाबरोबर थोडेंसें इतर विषयांचेहि अध्ययन चालत असे चार वाजता गुरुजी बाहेर पडल्यानंतर सहा वाजेपर्यंत दोन तास आपल्यापेक्षा खालच्या अभ्यासक्रमातील विद्यार्थ्यांचा अभ्यास ते घेत

व अशा प्रकार गुरुजींच्या कामात त्यास मदत करीत त्यानंतर ते देवदर्शनास जात व त्याच वेळीं त्याची स्वत ची चितनिका चालू असे रात्री भोजनोत्तर पुन्हा एक दीड तास (सुमारें ८ ते ९॥ पर्यंत ) इतर विद्यार्थ्यांचें शका निरसन इत्यादि कार्यक्रम चाले ज्यी वधी विशेषत अनध्यायाच्या दिवशीं सोंगट्या, बुद्धिबळें, गंजिफा यासारखे खेळ ते खेळत असत अशा प्रकारें सुमार पाच तास गुरुजींच्या जवळ अध्ययन, तीनचार तास स्वत चा अभ्यास व दोन तास खालच्या विद्यार्थ्यांस अध्यापन अशी एकूण १०-११ तास त्याची ज्ञानोपासना चाले या शिक्षणक्रमात गुरुजींजवळ अध्ययन, स्वाध्याय, शकानिरसनाच्या रूपाने सहाध्यायाबरोबर चर्चा व तयार झालेल्या अभ्यासक्रमाचें अध्यापन, या गोष्टीमुळे विद्यार्थ्यांचा अध्ययनविषय पक्का तयार होई, म्हणजे त्या विषयाचा सखोल अभ्यास होई व त्याचा मुख्य ग्रथ तर तोंडपाठच होई एका तरी विषयाचें सखोल व व्यापक अध्ययन होणें ही गोष्ट स्वतत्र बुद्धीचे विद्वान निर्माण होण्यास अत्यावश्यक आहे व वासुदेवशास्त्र्यांच्या बाबतींत ती नि सशयपणे घडून आली.

या सर्व दैनिक कार्यक्रमात गावातील मराठी शाळेंत जाऊन शिक्षण घेणें वासुदेवशास्त्र्यास अशक्य होतें, म्हणून आठव्या वर्षी ती शाळा त्यांनी जी सुटली, ती कायमचीच तथापि 'घरी सस्कृत शास्त्राचें अध्ययन करताकरताच त्यांनी गणित, भूगोल, इतिहास व भाषा याचें उत्तम ज्ञान मिळविलें " असें श्री काशीनाथपतानी म्हटलें आहे ( प ल पृ ४४ )

सातारा येथें रामशास्त्र्याच्या जवळ वासुदेवशास्त्र्यानी आपलें अध्ययन कसकस पूर्ण केलें, यासबधी डॉ वा गो परांजपे यानी पुढील माहिती दिली आहे [3] –

| वय | मुख्य अध्ययन | पूरक अध्ययन व इतर वाचन |
|---|---|---|
| ८–११ | सिद्धान्तकौमुदी, रघुवश सर्ग २ रा व माघ सर्ग १ ला | |
| ११–१३ | मनोरमा शब्दरत्न (कारकात) | तर्कसग्रह, दीपिका, मुक्तावली, |
| १३–१४ | शब्दकौस्तुभ(नवान्हिकी), | मयुरानाथी-पचलक्षणी, गदाधरी- |
| १४–१६ | परिभाषेन्दुशेखर | स्वलक्षण, कुवलयानद, महाभाष्य- |
| १६–२० | शब्देन्दुशेखर व लघुमजूषा यातील महत्त्वाचे भाग | नवान्हिकी व अङ्गाधिकार. |

३ फर्ग्युसन ये जुलै १९२८

| | | |
|---|---|---|
| २०–२२ | तैत्तिरीय संहिता व ब्राह्मण मुखोद्गत केले | काव्यप्रकाश पंचदशी, वेदान्त-परिभाषा ब्रह्मसूत्रशांकरभाष्य विद्यार्थ्यांना अध्यापन |
| २३–२८ | अद्वैतसिद्धि (पंचदशी) | विद्यार्थ्यांना अध्यापन लेखन– तत्त्वादर्श (परिभाषेन्दुशेखर-टीका) व गूढार्थ-प्रकाश (लघुशब्देन्दुशेखर टीका ) |

वरील कोष्टकावरून हें सहज ध्यानात येईल की वयाची ८ ते २० या काळात –संपूर्ण एक तप–वासुदेवशास्त्र्यांनी व्याकरणशास्त्रातील सर्व आकर ग्रंथांचे संपूर्ण[४] अध्ययन केलें व त्याच वेळीं काही इतर उपोद्बलक शास्त्रांचाहि अभ्यास केला आणि अशा प्रकारे त्यांच्या पाण्डित्याचा मजबूत पाया घातला गेला व्याकरणशास्त्र हें इतर सर्व शास्त्रांचे प्रवेशद्वार आहे असे म्हणतात[५] तें अगदी खरें आहे कारण त्यामुळेच पुढील सात वर्षांत त्यांनी आपली वेदसंहिता (तैत्तिरीय संहिता) ब्राह्मण-ग्रंथासह मुखोद्गत करीत असतानाच मुख्यतः काव्य व वेदान्त या शास्त्रांचे पूर्ण अध्ययन करून विशेषतः व्याकरणशास्त्रात विद्यार्थ्यांना पढविलें आणि दोन अवघड व्याकरणग्रंथांवर टीकाहि लिहिल्या! यावरून स्वतंत्र बुद्धीचे विद्वान निपजण्यासाठी विद्यार्थ्यांस व्याकरणासारख्या मूलभूत शास्त्राचें सखोल व सांगोपांग ज्ञान असणें अत्यावश्यक आहे असें सिद्ध होतें

हे विद्याध्ययन चालू असताना पहिल्या बारा वर्षांत वासुदेवशास्त्री आपल्या सहाध्यायींची चिंतनिका घेत असत त्याच वेळी त्यांच्या बुद्धिमत्तेची चमक गुरुजींना दिसून आली चिंतनिका घेताना गुरुजींनी अगोदर शिकविलेल्या पाठांचीच उजळणी करावयाची असते म्हणजे चिंतनिका घेणाऱ्या विद्यार्थ्याने गुरुजींनी शिकविलेला पाठ जसाच्या तसा आपल्या सहाध्यायींना पुन्हा शिकवून दाखविला म्हणजे पुरें असतें, परंतु वासुदेवशास्त्री चिंतनिका घेताना याच्याहि पुढे जाऊन गुरुजींनी शिकविलेल्या विषयावरील इतर ग्रंथ वाचून, नवनवीन शंका उपस्थित करून त्यांचें निरसन करीत असत त्यांपैकी ज्या शंका अतिशय कठीण वाटत त्यांचें गुरुजी

---

४ व्याकरणशास्त्राचें संपूर्ण अध्ययन याचा अर्थ सिद्धान्तकौमुदीचे पाठ करून संपूर्ण अध्ययन झाल्यानंतर मनोरमा शब्दरत्न कारकान्त झाल्यावर लघुशब्देन्दुशेखराचा थोडा भाग वाचणे, त्यानंतर परिभाषेन्दुशेखर आणि महाभाष्य नवाह्निकी व अङ्गाधिकार वाचणें, असा होतो

५ 'मुखं व्याकरणं प्रोक्तं सर्वविद्यानाम् ।' तसेच, 'पाणिनीयं च काणादं सर्वशास्त्रोपकारकम्' या उक्तींतील मर्म हेंच आहे

करून पुन्हा निरसन करून घेत असत. अतिशय बुद्धिमान् व आस्था बाळगणाऱ्या विद्यार्थ्यांसच अशी चितनिका घेणे शक्य असते व वासुदेवशास्त्री ही करामत करून दाखवीत असल्यामुळेच 'हा विद्यार्थी पुढे नाव काढील!' असे गुरुवर्य रामशास्त्री त्यांच्याविषयी बोलून दाखवीत असत.

स्वतः स्वतंत्रपणे अभ्यास करून चितनिका घेण्याच्या या पद्धतीमुळे वासुदेवशास्त्र्यांस असा फायदा झाला की अभ्यासविषयाचे त्याचें स्वतः चें ज्ञान परिपूर्ण व दृढतर झालेंच,पण पांडित्यास आवश्यक जी तर्कशुद्ध विचारसरणी अथवा युक्तिवाद, तो त्यांस आत्मसात् करून घेता आला आणि विषय शिकवितांना स्वतःच्या समर्थनार्थ दृष्टान्तादिकांचा उपयोग करण्याचीहि त्यास सवय झाली. त्यांच्या सर्व लेखनांत तर्कशुद्ध युक्तिवाद व स्वतंत्र समर्पक दृष्टान्त हे विशेष आपणास आढळतात, त्याचें मूळ कारण हच असावें.

त्या काळच्या पद्धतीप्रमाणे अध्ययनासाठी लागणारे काही ग्रंथ वासुदेवशास्त्र्यांनी आपल्या सुंदर हस्ताक्षरात लिहून घेतले होते, पण काही ग्रंथ त्यांनी आपल्या सहाध्यायीकडून लिहून घेतले व काही ग्रंथ पूर्वीच्या पिढीतील विद्यार्थ्यांनी लिहून ठेवलेले त्यास आयते उपलब्ध झाले होते, कारण तेव्हा छापील ग्रंथ मिळणे फारसे शक्य नव्हते. लघुशब्देन्दुशेखर हा ग्रंथ (सिद्धान्तकौमुदीवरील नागेशाची टीका) त्यांनी शके १८०४ भाद्रपद कृष्ण २ गुरुवार, या दिवशी लिहून संपविला, तसेच परमलघुमंजूषा हा ग्रंथ त्यांनी शके १८००, आषाढ शुद्ध १४ शनिवार या दिवशी लिहून संपविला.[१] असे त्या ग्रंथाच्या शेवटी त्यांनी म्हटले आहे. समग्र ग्रंथ हाताने लिहून काढल्यास तो समजण्यास व मुखोद्गत होण्यास मदत होते, असा अनुभव असल्यामुळे काही ग्रंथाच्या बाबतीत तरी परिस्थितीचाहि असा फायदा वासुदेवशास्त्र्यांस अनायासे मिळाला.

अशा प्रकारे मरोमरच बारा वर्षांत, वयाच्या विसाव्या वर्षी, त्यांनी आपले व्याकरणशास्त्राचे अध्ययन पूर्ण करून "द्वादशवर्षं व्याकरणं श्रूयते" हे वचन सार्थ करून दाखविलें, परंतु त्यांची ज्ञानलालसा मुळीच कमी झाली नाही. मागील काळात दिल्याप्रमाणे त्यापुढेहि वयाच्या २७ व्या वर्षापर्यंत, आपले अध्ययन त्यांनी चालूच ठेविले व गुरुजींच्या अध्यापनकार्याचा भार कमी करण्यासाठी स्वतः विद्यार्थ्यांस पढविण्यास सुरवात केली. विशेषतः दुपारी ३ ते ६ पर्यंत हे त्यांचे अध्यापनाचे कार्य चालू असे. कोणताहि विषय शिकविण्यास प्रारंभ केला असता तो उत्तम प्रकारे होतो, असा अनुभव आहे, कारण त्या विषयाचे जेवढे ज्ञान

१ त्या पोथ्या काशीनाथपंताच्या संग्रही अद्याप आहेत. भास्करशास्त्र्यांनी लिहून ठेविलेल्याहि कांही पोथ्या त्या काशीनाथपंतांच्या संग्रहांत आहेत.

विद्यार्थ्यांस यावयाचे असेल, त्याच्या शिदोरीत पट अधिक ज्ञानाचा संग्रह घडणाऱ्या शिक्षकाजवळ असावा लागतो. आवश्यक ते सर्व टीकाग्रंथ व संदर्भग्रंथ पाहून आपल्या अध्यापनविषयाची तयारी करण्याची वासुदेवशास्त्र्यांची पद्धति असल्यामुळें[7] त्या विषयात त्यांची स्वतःची तयारी उत्कृष्ट झाली, हे सांगणे नकोच. यावरून विद्यार्थिदशेंत अभ्यासविषय शिकविण्याची संधि मिळाली असता त्या विषयात प्रावीण्य संपादन करण्यास फार मोठी मदत होते असे सिद्ध होते.

(१) तत्त्वादर्श

वासुदेवशास्त्र्यांनी तीन वर्षे असे अध्यापन केल्यानंतर यांतूनच त्यांच्या ग्रंथलेखनाचा उदय झाला, असे म्हटले पाहिजे. कारण विद्यार्थ्यांना शिकवीत असताना त्यांतील कठीण स्थळें कोणती हें त्यांच्या ध्यानात आले व मुख्यतः त्या कठीण स्थळांचे विवेचन करण्यासाठीच सन १८८६ मध्ये, वयाच्या अवघ्या तेविसाव्या वर्षी त्यांनी 'तत्त्वादर्श' हा आपला पहिला ग्रंथ–नागोजीभट्टांच्या परिभाषेन्दुशेखरावरील टीकाग्रंथ–लिहिला. वासुदेवशास्त्र्यांनी स्वतः लिहिलेली क्रोडपत्रें हा या टीकाग्रंथाचा मुख्य आधार आहे. क्रोडपत्रें म्हणजे गुरुजींनी पाठ शिकविल्यानंतर विद्यार्थ्याने घरी गेल्यानंतर अथवा चिंतनिका करताना गुरुजींच्या विवेचनातील मुद्द्यांची करून ठेवलेली टाचण होत. अर्थातच क्रोडपत्रें म्हणजे गुरुजींनी विद्यार्थ्यांस ताजी सांगितलेल्या टीपा नव्हेत. या क्रोडपत्रांचा आधार घेऊन व परिभाषेन्दुशेखरावरील इतर ५–६ टीकांचा नीट अभ्यास करून, त्यांतील महत्त्वाचा भागांश एकत्र घेऊन वासुदेवशास्त्र्यांनी ही टीका लिहिली आहे. विद्यार्थ्यांस अडणाऱ्या अंतरङ्गपरिभाषेसारख्या फक्त कठीण स्थळांचेच विवेचन येथें असल्यामुळे, काही सोप्या परिभाषांवर या ग्रंथात मुळीच विवेचन सापडत नाही. या टीकाग्रंथाचा एक विशेष म्हणजे भट्टोजी दीक्षित यांचा जुना संप्रदाय व नागेशाचा नवा संप्रदाय यामध्ये मतभेदाची जी महत्त्वाची पाच सहा व इतर अनेक किरकोळ स्थानं आहेत त्या सर्वांचे इतर टीकांच्या आधारे परिशीलन करून शास्त्रीबुवांनी ठिकठिकाणी स्पष्ट विवेचन केले आहे व आपला स्वतःचा कल नव्या मताकडे आहे असे निःसंदिग्ध विधानहि केले आहे[8]. यावरून, पाल्हाळ न लावता मुद्देसूद रीतीने विद्यार्थ्यांसाठी आवश्यक अशा कठीण भागावरच टीपा लिहिणे हा वासुदेवशास्त्र्यांच्या सर्वच ग्रंथांतील टीपांचा विशेष या त्यांच्या आद्य ग्रंथातहि दिसून येतो.

---

७ सहाध्यायींची चिंतनिका घेतानासुद्धा ते या पद्धतीचा अवलंब करीत हे मागें सांगितलेच आहे.

८ पुणें येथील भांडारकर इन्स्टिटयूटने डॉ. कीलहॉर्न यांनी संपादन केलेल्या परिभाषेन्दुशेखराच्या पुनर्मुद्रणाचे काम प्रा. काशीनाथपंतांकडे सोपविलें होते. त्या आवृत्तीत ही 'तत्त्वादर्श' टीका त्यांनी प्रसिद्ध केली आहे.

(२) गूढार्थप्रकाश

'तत्त्वादर्श' लिहिल्यानंतर दोन वर्षांनी सन १८८८ मध्ये वासुदेवशास्त्र्यांनी नागोजीभट्टांच्याच 'लघुशब्देन्दुशेखर'[१] या ग्रंथावर 'गूढार्थप्रकाश' या नावाचा टीकाग्रंथ लिहिला मात्र या टीकाग्रंथाची काही थोडीपत्रेच उपलब्ध आहेत. संपूर्ण ग्रंथस्वरूपात तो उपलब्ध नसल्यामुळे त्याविषयी विशेष काही सांगता येणे शक्य नाही

अशा प्रकारे स्वत चे विद्याध्ययन चालू असताना व अध्यापनास सुरवातच प्रारंभ केला असताना, वयाच्या ऐन पंचविशीतच वासुदेवशास्त्र्यांनी व्याकरण-शास्त्रातील महत्त्वाच्या व कठीण ग्रंथावर स्वयस्फूर्तीने टीकालेखन केले, हा पांडित्याचा एक पराक्रम म्हटला पाहिजे, आणि कोणत्याहि क्षेत्रातील पराक्रमी मनुष्यास 'तू पराक्रम कर' असं सांगाव लागत नाही, तो त्याचा जन्मजात स्वभाव असतो यावरून वासुदेवशास्त्र्यांची ईश्वरदत्त असामान्य बुद्धिमत्ता अखंड विद्योपासना, गुरुपरंपरा लुप्त झाली तरी ग्रंथनिर्मितीच्या द्वारे ती विद्योपासना टिकून राहावी अशी खऱ्या विद्योपासकाची तळमळ इत्यादि श्रेष्ठ गुण दिसून येतात "वासुदेवशास्त्री पुण्यास न येता साताऱ्यासच कायमचे राहिले असते, तर काय झाले असते ? ' असा एक प्रश्न विचारात घेण्यासारखा आहे असा 'जर-तर' च्या प्रश्नाचे उत्तर देणे नेहमी धोक्याचे असले, तरी एवढे निश्चितपण म्हणता येईल की सर्वसामान्य परिस्थितीत साताऱ्याला राहूनसुद्धा वासुदेवशास्त्र्यांनी शेवटपर्यंत विद्या-व्यासंग चालू ठेवून उत्तम शिष्यपरंपरा तर निर्माण केलीच असती, पण काही ना काही ग्रंथनिर्मितिहि केली असती[१] कारण तो त्यांचा देहस्वभावच होता असा

वासुदेवशास्त्र्यांच्या सातारा येथील विद्यार्थिदशेतील आणखी एक उल्लेखनीय विक्रम म्हणजे, हे विद्याध्ययन चालू असताना त्यांनी पुणे येथील वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या व्याकरणशास्त्राच्या तीन वर्षांच्या तीनहि परीक्षा एकदम दिल्या व त्यात उत्तीर्ण होऊन आपले पाण्डित्य सिद्ध केले, कारण यापैकी विशेषत तिसरी परीक्षा किती अवघड असते हे शास्त्यास माहीतच आहे त्यापूर्वी बडोद्याच्या श्रावणमास दक्षिणापरीक्षेतहि व्याकरणशास्त्रातील उच्चतम परीक्षा देऊन पंच-वार्षिक दक्षिणा मिळविणाऱ्या लोकांमध्ये त्यांनी उच्चस्थान मिळविले होते त्या वेळी बडोद्यास जाताना सातारा ते पुणे व येताना पुणे ते सातारा, हा प्रवास त्यांनी पायी केला होता यावरून पाण्डित्याच्या क्षेत्रात पराक्रम गाजविण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा किती प्रबळ होती हे दिसून येते

वासुदेवशास्त्र्यांचे विद्याध्ययन चालू असता ज्या वेळी शंकराचार्यांची स्वारी सातारा येथे येई आणि विद्याप्रेमी गृहस्थ विद्वानांस बोलावून शास्त्रचर्चा

१ हा ग्रंथ म्हणजे भट्टोजींच्या सिद्धान्तकौमुदीवरील टीका आहे

ऐकत, त्या वेळीं शास्त्रीबुवांचे वाक्चातुर्य व पांडित्य यांचे सर्वजण कौतुक करीत. शास्त्रचर्चेतील वासुदेवशास्त्र्यांच्या नैपुण्याविषयी डॉ. वा. गो. परांजपे यांनी पुढील प्रसंग वर्णिला आहे:-[१०]

एकदा ग्वाल्हेर येथील दोन पंडित (रामाचार्य गजेन्द्रगडकर यांचे दोन शिष्य) साताऱ्यास आले असता वादविवादामध्यें त्यांनी अशी बाजू मांडली कीं, 'लोपश्च बलवत्तर ' हे नागोजीभट्टाचें (व्याकरणमहाभाष्य, शिवसूत्र ५ वरील) वार्तिकसदृश विधान बरोबर नाहीं, कारण त्यावरून निर्दोष कार्यकारणभाव व्यक्त होत नाहीं, परंतु तरुण वासुदेवशास्त्र्यांनी नागोजीभट्टाची बाजू इतक्या जोरदारपणें मांडली कीं दीर्घकाळ झालेल्या चर्चेनंतर त्या दोन पंडितांना शेवटी नागोजीभट्टाचें तें विधान निर्दोष आहे, असें मान्य करावें लागलें. शास्त्रीबुवा पुढे पुण्यास आल्यानंतर असे वादविवादाचे प्रसंग फारसे आले नाहीत, पण जेव्हां परगावचे कोणी विशेष शास्त्रीपंडित आल्यानंतर एखादा मोठा वादविवादाचा प्रसंग येई, तेव्हां वासुदेवशास्त्र्यास मुद्दाम निमंत्रण देण्यात येई. अशा वेळीं ते आपल्या लहानमोठ्या शिष्यांसह उपस्थित राहून व उभयपक्षाकडील लोकांनी पूर्वपक्ष उत्तरपक्ष केल्यानंतर स्वतः शास्त्रीबुवा तोंपर्यंत झालेला वादविवाद ध्यानात घेऊन इतका बिनतोड सिद्धान्तपक्ष मांडीत, कीं त्यानंतर कोणासच त्यांच्या विरुद्ध कांही पुरावा देता येत नसे व सर्वांस त्याचा निर्णय मान्य करावा लागे. अशा वादविवादामुळें विषयज्ञान पक्कें होण्यास मदत होई, परंतु यामध्यें कालापव्यय फार होत असल्यामुळे अशा विशेष प्रसंगाशिवाय वासुदेवशास्त्री अशा वादविवादांत भाग घेत नसत. वादविवादातील त्यांच्या प्रावीण्यावरून त्यांची चतुरस्र विद्वत्ता, श्रेष्ठ युक्तिवाद व हजरजबाबीपणा हे गुण सर्वांच्या निदर्शनास येत असत. अशा प्रकारें अध्ययन, अध्यापन, प्रवचन यासारख्या आवडीच्या कार्यामध्यें वासुदेवशास्त्र्यांचे कालक्रमण सुरू असतांना, १८९० साली त्यांच्या वयाच्या २७ व्या वर्षी एक निमित्त कारण घडून त्यांच्या आयुष्यास निराळें स्वरूप प्राप्त झालें.

शास्त्रीबुवांचे सर्वांत ज्येष्ठ बंधु दामूअण्णा या वेळीं परगावी पोस्ट-खात्यात सरकारी नोकरी करीत होते व दरमहा साताऱ्यास आपल्या मातोश्रीकडे प्रापंचिक खर्चासाठी कांही पैसे पाठवीत होते. मधले बंधु रघुनाथशास्त्री सातारा येथे राहून वासुदेवशास्त्र्यांबरोबरच शास्त्राध्ययन करीत व याज्ञिकीच्या व्यवसायांत मन घालून द्रव्यार्जनहि करीत. वासुदेवशास्त्रीसुद्धां प्रपंचास मदत म्हणून थोडाबहुत याज्ञिकीचा व्यवसाय करीत, पण त्यात त्यांचे फारसें मन लागत नव्हतें. अध्ययनाध्यापनातच त्यास गोडी वाटत होती, परंतु तें सर्व

१० पाहा फर्ग्यु. कॉ. मॅ. जुलै १९२८

निर्वेतन असल्यामुळे त्यामध्ये द्रव्यार्जनाचा संभवच नव्हता. वासुदेवशास्त्र्यांचा विवाह सन १८८४ च्या सुमारास झाला होता त्यांची पहिली दोन अपत्यें बाळाने हिरावून नेली होती सन १८९० मध्य त्यास तिसरे अपत्य, एक पुत्र झाला हेच म म प्रा वासुदेवराव होत या वेळी कुटुंबाची सर्व व्यवस्था वासुदेवशास्त्र्यांच्या मातुश्री दुर्गाबाकू या पाहत असत त्या निर्धन स्थितीत पूर्ण जबाबदारीने व नेकीने प्रपंच चालविताना दुर्गाबाकूनी जें धैर्य व जी कर्तबगारी दाखविली, ती अत्यंत प्रशंसनीय म्हटली पाहिजे घरामध्ये दुर्गाबाकू स्वत , त्यांच्या थोरल्या जाऊबाई, घरी आलेली एक नणंद दोन मुलगे, दोन सुना व नातवंडे अशी सुमारें १०–१२ माणसे होती उत्पन्न म्हटले म्हणजे दुर्गाबाकूचे थोरले बंधु दरवर्षी भाऊबिजेच्या ओवाळणीच्या निमित्ताने स्वत च्या शेतातील ज्वारी इत्यादि धरेचसे धान्य देत असत, बाकूचे थोरले चिरंजीव दामूअण्णा यांच्याकडून दरमहा सुमारें ७–८ रुपये येत असत व धाकट्या दोघा चिरंजीवाना याज्ञिकीनिमित्त थोडीशी प्राप्ति होत असे भास्करशास्त्री वारले तेव्हा तर या दोघा चिरंजिवाची याज्ञिकी अत्यल्प होती, आणि तीसुद्धा असण्याचे मुख्य कारण म्हणजे आळीतील लोकाना भास्करशास्त्र्यांविषयी जो अत्यंत पूज्यभाव वाटत असे, तेच म्हटले पाहिजे "आळीतल्या लोकाची पुण्यबुद्धि किंवा सहानुभूति हेंच आमचें त्या वेळचें मुख्य भांडवल होतें" असे दुर्गाबाकू आपल्या मुलाजवळ म्हणत असत या अशा एकदर उत्पन्नावर, आपला आब राखण्यासाठी स्वत घराच्या उबरठ्याबाहेर न पडता, दुर्गाबाकूनी त्या वेळी प्रपचाचा गाडा मोठ्या धैर्याने हाकाला, हे किती प्रशंसनीय आहे ! भास्करशास्त्र्यांच्या काळात त्यानी काही वर्षें सुस्थितीत काढली होती, पण एकदम ती सुस्थिति जाऊन कमालीच्या दारिद्र्यात दिवस काढण्याची त्यांच्यावर पाळी आली! पूर्वीची काहीशी श्रीमती तत्काल विसरून गरिबीत नेकीने दिवस काढणे किती कठीण आहे, ही गोष्ट स्वानुभवाशिवाय सामान्य मनुष्यास कळणें शक्य नाही मुले लहान असताना एखाद्या दिवशी, मधुकरी मागून घरच्या पाठशाळेंत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मधुकरीतीलहि काही अन्न त्यांनी आपल्या मुलास वाढले आहे! त्या वेळी त्या माउलीच्या चित्तात जी कालवाकालव झाली असेल, तिचें शब्दानी वर्णन करणे प्रस्तुत लेखकास खरोखर अशक्य आहे! त्या वेळी त्या अजाण बालकानी खाण्यापिण्याच्या बाबतीत केलेले हट्ट अगदी सामान्य वस्तूसाठीच होते, परंतु अक्षरश कोड्याचा माडा करून दुर्गाबाकूनी ते हट्ट कशा रीतीने पुरविले यासबधीच्या गोष्टी अभ्यंकर कुटुंबातील वयोवृद्ध माणसाकडून ऐकताना द्रोणपुत्र अश्वत्थाम्याची आई साध्वी कृपी, हिची आठवण झाल्याशिवाय राहत नाही दुर्गाबाकू पराकाष्ठेच्या प्रेमळ होत्या व त्या प्रेमावरच मुलांचें पोषण होऊन घरामध्यें सुखसमाधान नादत होत असे म्हणण्यास हरकत नाही

सुदैवाने दुर्गाकाकूंना दीर्घायुष्य लाभले व आपले तिन्ही मुलगे श्री–विद्या–यश–संपन्न झालेले त्यांनी पाहिले दुर्गाकाकूंचा आणखी एक उल्लेखनीय विशेष असा की आपल्या तिन्ही लेकांकडे जाऊन त्या राहत असत आणि त्या तिन्ही सुनांशी मिळते घेऊन वागण्याचे क्वचितच आढळणारे कौशल्य त्यांच्या ठिकाणी होते सन १९२९ मध्ये वयाच्या ८८ व्या वर्षी आपल्या पुत्रपौत्रांस सुखासमाधानात नांदताना पाहत सातारा येथें आपल्या वडिलोपार्जित घरात त्यांनी आपले डोळे अखेरचे मिटले अंतःकरणाची मृदुता व अत्यंत कठीण परिस्थितीशी झगडत राहून स्वकर्तव्य बजावीत नेटाने दिवस काढणे, या गोष्टी वासुदेवशास्त्र्यांनी आपल्या मातेपासूनच–दुर्गाकाकूंच्या उदाहरणावरूनच–घेतलेल्या दिसतात या कर्तबगार आदर्श मातेबद्दल मातृभक्त वासुदेवशास्त्र्यांना नित्य पराकाष्ठेचा आदर वाटत असे

परंतु एके दिवशी वयाच्या २७ व्या वर्षी (१८९० साली) त्या मातेने त्यांस जबाबदारीची जाणीव देण्याकरता जे उद्गार काढले, ते त्यांच्या चित्तास फार लागून राहिले! दुर्गाकाकू वासुदेवशास्त्र्यांस म्हणाल्या होत्या, "अरे आबा![11] तुझा प्रपंच आता वाढत चालला आता तू आपली जबाबदारी ओळखली पाहिजेस एकटा राघोबा (रघुनाथशास्त्री) काय करणार!"— दुर्गाकाकूंचे ते उद्गार सत्य होते यात शंकाच नाही, आणि एखाद्या सामान्य मनुष्याने ते मनावरहि घेतले नसते, परंतु वासुदेवशास्त्र्यांच्या मनास प्रेमळ आईचेहि ते उद्गार असह्य वाटले आणि याज्ञिकीचा नावडता व्यवसाय सोडून, आपला आवडता अध्यापनाचा व्यवसाय करूनच स्वावलंबनाने आपला प्रपंच चालविण्याचे त्यांनी ठरविले सातारा येथें ही गोष्ट साधणे अशक्य असल्यामुळे सातारा सोडून परगावी जाण्याचा त्यांनी निश्चय केला व लवकरच तो अमलातहि आणला

* * *

११. वासुदेवशास्त्र्यास त्यांच्या कुटुंबातील सर्व मंडळी आबा म्हणून संबोधीत असत.

# ६ : पुण्यांत स्थिरनिवास

'आयुष्य म्हणजे केवळ योगायोगाचा खेळ!' असे दैववादी लोक म्हणतात आणि प्रयत्नवादी त्याचा उपहासहि करतात! यत्नदेवाची उपासना करूनच आजपर्यंत जगामध्ये थोर लोकांनी मानवी बुद्धीस चकित करून सोडणारे पराक्रम केले आहेत, हेंहि अगदी खरें। परंतु दैवास अगदीच महत्त्व नाही असे म्हणता येणार नाही. निदान 'दैवं चैवात्र पंचमम्' हें गीतावचन सत्य मानण्यास मुळीच हरकत नाही, कारण कोणत्याहि मनुष्याच्या यशाचा निदान पाचवा वाटा दैवाकडे जातो, हें कोणाहि विचारी मनुष्यास पटेल. वयाची पहिली सत्तावीस वर्षे शास्त्रीबुवांनी[1] साताऱ्यास आपल्या घरीच घालविली, यावरून आहे त्या परिस्थितीत समाधान मानण्यास ते तयार होते, असे दिसते. प्रपंचाकडे विशेष लक्ष न देता आपल्या अध्ययन–अध्यापन–लेखन या कार्यातच ते मग्न होते! परंतु [illegible] २३ [illegible] वर्षी मागे वर्णिल्याप्रमाणे दुर्दैवाने त्यास सहज आपल्या जगावेगळेपणाची जाणीव करून दिली आणि जणू खडबडून जागे होऊन शास्त्रीबुवांनी सातारा सोडण्याचा दृढ निश्चय केला.

पंढरपूर येथे भास्करशास्त्र्यांचे शिष्य विठ्ठलशास्त्री घारूरकर संस्कृत पाठशाळा चालवीत होते. त्यांच्याकडे जाऊन एक महिनाभर राहून शास्त्रीबुवांनी त्यांच्या पाठशाळेत अध्यापनाचें काम केलें. परंतु त्या ठिकाणी आपल्या निर्वाहाची सोय होईल अशी खात्री न वाटल्यामुळे ते साताऱ्याला परत आले. मग रामशास्त्र्यांनी त्यास पुण्यास न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांच्याकडे पाठविलें व त्यांच्या योगक्षेमाची काहीतरी व्यवस्था करण्याविषयी प्रार्थना करणारें एक पत्रहि न्यायमूर्तींना देण्यासाठी लिहून दिलें. महर्षि रामशास्त्री यांच्या पत्नी आणि न्यायमूर्ति रानडे यांच्या द्वितीय पत्नी या सख्या बहिणी असल्यामुळे अशा रीतीने न्यायमूर्तींकडे शास्त्रीबुवांस पाठवून देण्याचें काम रामशास्त्र्यांस सहज करता आलें —अन् यालाच म्हणतात योगायोग! 'विनाश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लता' असें म्हणतात, तें अगदी सत्य आहे. १९३८ सालच्या आपल्या भाषणात शास्त्रीबुवांनीच म्हटलें आहे: 'मी चार तपें म्हणजे ४८ वर्षांपूर्वी या पुण्यनगरीत आलो, हें माझ्या पुण्याईचें फळच मी समजतो. मी पुण्यात पाऊल ठेवलें त्याच दिवशी न्या. रानडे यांनी माझ्या योगक्षेमाची व्यवस्था केली व मी अशा

१ यापुढे वासुदेवशास्त्र्यांशिवाय इतर शास्त्र्यांचा फारसा उल्लेख या चरित्रात येणार नसल्यामुळे 'शास्त्रीबुवा' याच शब्दाने वासुदेवशास्त्र्यांचा निर्देश केला आहे.

रीतीने चालू केली की ज्याप्रमाणे एखादा वृक्ष योग्य ठिकाणीं लावला व त्याची योग्य ती काळजी घेतली म्हणजे तो फोफावतो, त्याप्रमाणे त्या दिवसापासून आजपावेतो माझा योगक्षेम अत्युत्तम चालत आला आहे" शास्त्रीबुवाचे हे उद्गार[२] संपूर्णपणे यथार्थ आहेत, कारण न्यायमूर्ति रानड्यासारख्या लोकोत्तर विभूतीचा आश्रय मिळाल्यामुळे शास्त्रीबुवाच्या आयुष्याचे खरोखर सोनें झाले! 'अधिष्ठान तथा कर्ता. ' या गीतावचनात (अ १८ श्लो १४) म्हटल्याप्रमाणे अधिष्ठान अथवा आश्रयस्थान हेहि कार्यसिद्धीचे एक आवश्यक कारण आहे न्यायमूर्तीमुळे पुण्यासारख्या विद्येच्या माहेरघरी ख्यातनाम विद्वानस्थामध्ये कार्य करण्याची सुसंधी मिळून शास्त्रीबुवाच्या हातून अलौकिक विद्योपासना झाली, यात शका नाही सातारला राहून असे लोकोत्तर कार्य त्यास खास करता आले नसते शास्त्रीबुवाच्या आयुष्यात भास्करशास्त्र्याचा मृत्यु ही खरोखर अत्यंत प्रतिकूल घटना होती परंतु त्यातूनच त्यास राम-शास्त्र्यासारख्या सद्गुरूचा लाभ झाला, हा जसा एक योगायोग होता, त्याचप्रमाणे सातारा सोडावा लागला या प्रतिकूल घटनेतून पुण्यासारख्या उत्कृष्ट अधिष्ठानाचा त्यास लाभ झाला, हासुद्धा एक योगायोगच म्हटला पाहिजे — अर्थातच या सुसंधीचा त्यानी योग्य फायदा करून घेतला हा त्याच्या कर्तव्यनिष्ठेचा व कर्तबगारीचा विजय आहे, हेहि उघड आहे, कारण मिळालेल्या सुसंधीचा विशेष फायदा न घेणारे अथवा ती मुकट दवडणारे महाभागहि काही थोडथोडके नसतात!

—रामशास्त्र्याचे पत्र घेऊन शास्त्रीबुवा (वासुदेवशास्त्री) सातारा येथील आपल्या ४५ प्रौढ विद्यार्थ्यांसह[३] न्यायमूर्ति रानड्याकडे आले व त्यानी ते पत्र न्यायमूर्तींच्या हाती दिले अन् काय आश्चर्य! पत्र वाचताच क्षणभर विचार करून न्यायमूर्ति शास्त्रीबुवास म्हणाले, 'ठीक आहे, ही तुमची खोली या खोलीत तुमचे सर्व सामान ठेवून या तुम्हास आणखी काही अंथरूण-पांघरूण, भांडी-कुंडी पाहिजे असल्यास आमच्या घरातून मागून घ्या उद्यापासून दररोज तुम्ही आमच्या पंक्तीला दोन्ही वेळा भोजन करायचे व येथील संस्कृत पाठशाळेत सकाळी व दुपारी असे दोन वेळा शिकवायचे!' न्यायमूर्तींसारख्या उदारधीचा असा खंबीर आश्रय मिळताच त्या वेळी शास्त्रीबुवाना किती हायसे वाटले असेल, याची कल्पनाच केलेली बरी! न्यायमूर्तींनी दाखविलेल्या त्याच्याच घरातील खोलीत मुक्काम ठोकून दुसऱ्या दिवसापासून शास्त्रीबुवानी पाठशाळेत विद्यार्थ्यांना

२ फग्यु त्रै सप्टेंबर १९३८

३ या विद्यार्थ्यांनी स्वतंत्रपण आपली भोजनाची सोय अन्यत्र केली व संस्कृत पाठशाळेत राहूनच त्यानी आपले पुढील अध्ययन पूर्ण केले

सहवासाचा एक मुख्य परिणाम म्हणजे अखंड विद्याव्यासंगाची सवय शास्त्रीबुवांच्या ठिकाणी जडली. न्यायमूर्ति स्वतः ज्या विषयांत पारंगत असूनहि इतर अनेक विषयांचा व शास्त्रांचा अभ्यास करीत, थोडासुद्धा वेळ फुकट घालवीत नसत. त्यांचे डोळे थोडेसे अधू असल्यामुळे बहुधा ते स्वतः फारसे वाचीत नसत व लिहीतहि नसत. अगदी महत्त्वाच्या कागदपत्रांचे वाचन व लेखन मात्र ते स्वतः करीत. इतर ग्रंथ, वर्तमानपत्रें इत्यादि दुसऱ्याकडून वाचून घेत. पत्रें बहुधा दुसऱ्याकडून लिहून घेत. प्रा. म. दा. माटे यांचे वडील दामोदरशास्त्री माटे, वासुदेवशास्त्री सिंगारकरबुवा यांच्यासारख्या शास्त्रीमंडळीबरोबर त्या त्या शास्त्रांतील विषयांबद्दल ते चर्चा करीत. सामान्यतः रात्री ८ ते ९ अशी शास्त्रीबुवांशी चर्चा करण्याची न्यायमूर्तींची वेळ ठरलेली असे. त्यामुळे शास्त्रीबुवांना त्यांचा निकट सहवास घडला व नहि इतर उपयुक्त शास्त्रांचा अभ्यास कटाक्षाने करू लागल्याने पुढील आयुष्यांत तर फुरसतीच्या वेळी स्वतः ज्या गुणावरूनहि त्यांच्या अभ्यास-विषयांतील माहिती शास्त्रीबुवा विचारून घेत. यामुळे आपोआपच त्यांस बहुश्रुत-पणा संपादन करता आला. न्यायमूर्तींपासून शास्त्रीबुवांनी घेतलेला दुसरा महत्त्वाचा गुण म्हणजे वक्तशीरपणा. पाठशाळेत जाण्यास त्यांना कधीहि उशीर झाला नाही. व कॉलेजमध्ये त्यांना घेऊन जाण्यासाठी चौघाकी गाडी दाराशी येई, तेव्हा त्या गाडीचा खोळंबा त्यांनी कधीहि केला नाही. गाडी येण्याच्या अगोदर कपडे घालून ते तयार असत. घरांतील मंडळींशी फारसे पाल्हाळिक बोलत न बसतां थोड्या शब्दांत आपला अभिप्राय प्रकट करून त्याचबरोबर त्यांच्यावर आपला वचक ठेवण्याचा गुणहि शास्त्रीबुवांनी न्यायमूर्तींपासून घेतला असे दिसते. न्यायमूर्तींवरहि शास्त्रीबुवांचा चांगलीच छाप पडली होती. शास्त्रीबुवा उपाध्यायकर्म करीत असतील तर आपण धर्मकृत्यें करूं असे त्यांनी ठरविलें होतें व ते मुंबईस गेल्यानंतरसुद्धा शास्त्री-बुवांस मुद्दाम श्रावणीसाठी मुंबईस त्यांच्याकडे जावें लागे। सातारा सोडून पुण्या-सारख्या परक्या ठिकाणी आल्यानंतर शास्त्रीबुवांना न्यायमूर्तींसारख्या लोकोत्तर पुरुषाचा सहवास घडला हें त्यांचें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे.

शास्त्रीबुवांची अखंड विद्योपासना पुण्यास सुरू झाली. त्या वेळचा त्यांचा दिनक्रम ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. पहाटे साडेपांच वाजतां अथवा त्याहूनहि अगोदरच ते उठून व आपलें प्रातःकर्म उरकून थंडीच स्नान करीत. त्यानंतर संध्या पूजा, सप्तशतीच्या एकदोन अध्यायांचें पठण, सोमवारी शंकराला रुद्राची एकादशिनी व चतुर्थीला गणपतीला अथर्वशीर्षाची एकादशिनी करून बरोबर सातला ते पाठशाळेंत उपस्थित होत असत. सकाळीं ७ ते ९ पर्यंत पाठशाळेंत शिकविण्याचें काम ते करीत. नंतर सुमार एक तास कांहीं ग्रंथावलोकन करून, दहा वाजतां वैश्वदेव करून व शांतपणानें भोजन करीत. भोजनोत्तर पुन्हा एक तास ग्रंथावलोकन,

लेखन यासारखा उद्योग करीत व बहुधा साडेबारा वाजता गाडीतून कॉलेजला जात. मामायत दुपारी १ ते ३ पयत कालेजमध्य अध्यापन झाल्यानतर त घरी यत व थोडीशी विश्रांति घत ४ त ५ पयत देवदर्शनाच्या निमित्ताने बहुधा त एकटच मल दीड मैल चालून यत हाच त्याचा व्यायाम अस या वेळी एखाद्या अभ्यासविषयाच अथवा ग्रंथनविषयाचे त चिंतन करीत सध्याकाळी पाच त साड सहापयतचा त्याचा वेळ पाठशाळतील काणी प्रौढ विद्यार्थी अयवा शास्त्रीमडळी अयवा इतर ज काही लोक यत त्याच्याबरोबर शकानिरसन अथवा शास्त्रीय विषयावरील चर्चा यामध्य जात अस साडसहाला त गायमध्यसाठी उठत व सध्यावन्दनानतर सुमार अर्धा तास स्तोत्रपाठ म्हणत ८ वाजता त भोजनास बसत व भोजनात्तर सुमारे एक तास घरच्या मडळीबरोबर गप्पागोष्टी करून साडनऊ वाजता झोपी जात अशा प्रकारे दररोज तीन चार तास त्याच स्वत च ज्ञानार्जन अथवा लेखन याचे मोठ्या मुद्दामाम्य मात्र त्याच घर ग्रथलखन होई म्हणूनच सस्कृत पाठशाळत सतत ५२ वर्षे व फर्ग्युसन कालेजमध्य सतत छत्तीस वर्षे अध्यापनाच महत्त्वाच काय करूनहि त्याच्या हातून प्रचड व सरासर मौलिक लखनकाय झाले।

पाठशाळा व फर्ग्युसन कालज या दोन्ही ठिकाणी शास्त्रीबवा कोणत्या पद्धतीने अध्यापन करीत असत हे पाहण्यासारख आह कारण पाठशाळत शास्त्रीबुवाचा पाठ मिळण हे मोठें भाग्य समजले जाई त्या वेळी पाठशाळतच अध्यापन करणारे प शंकरशास्त्री व मारुलकरशास्त्री हे आपल्या खालच्या वर्गातील विद्यार्थ्यांस मुद्दाम शास्त्रीबुवाचे काही पाठ एकण्यास सागत असे पाठशाळतील शास्त्रीबुवाचे अगदी शवटच्या कालखडातील (सन १९३६ त ३९) विद्यार्थी प नारायणशास्त्री दीक्षित म्हणतात त्या काळात त्यानी मनोरमा प्रदीपासह सपूर्ण काव्यप्रकाश इत्यादि ग्रथाचे अध्ययन शास्त्रीबुवाच्याजवळ केल ते म्हणतात

शास्त्रीबुवा पाठ्यपुस्तकाच सागोपाग पाङ्क्त अध्ययन विद्यार्थ्यांकडून करून घत व त्याच वेळी इतर शास्त्रातील जरूर ते सदर्भ सागून व आनुषगिक अवातर विवेचन करून त्या विषयाच व्यापक स्वरूपहि विद्यार्थ्यांच्या नजरसमोर उभ करीत त्यामुळ विषयाची आवड विद्यार्थ्यांमध्य निर्माण होई व ज्या इतर ग्रथाना त आनुषगिक सदर्भ शास्त्रीबुवा देत असत त ग्रथ स्वत वाचून पाहण्य ची स्फूर्ति विद्यार्थ्यांत निर्माण होई मग अनायासेच मुख्य पाठ्यपुस्तकातील त्याचा विषय पक्का होऊन जाई मुख्य पाठ्यपुस्तकातील विषय सुस्पष्ट व निःसन्दिग्ध होण्यासाठी शास्त्रीबुवा व्याकरणमहाभाष्यातील विवेचनपद्धतीप्रमाणे त्या विषयावर अनेक शका उपस्थित करून त्याचें निरसन करीत विद्यार्थ्यांच्या मनात निर्माण होणाऱ्या त्यापेक्षाहि अधिक

फर्ग्युसन कॉलेज गद्रे वाडा १८९४ प्राध्यापक व कांही विद्यार्थी



खुर्चीवर बसलेले — १) प्रा धों के कर्वे २) प्रा गो कृ. गोखले ३) प्रा चि. ग भानू ४) प वासुदेवशास्त्री अभ्यंकर ५) प्रा दि. श्या नादीरकर ६) प्रि गो ग आगरकर ७) प्रा. वा. ब केळकर ८) प्रा. म. शि गोळे ९) प्रा के पी. लिमये १०) प्रा. वि वा घाटे ११) प्रा ग वा लेले. खुर्चीमागे उभे डावीकडून — क्र ७) श्री र पु परांजपे ८) श्री. वि रा. शिंदे.
मागून दुसरी ओळ उजवीकडून क्र २) श्री. ल रा पांगारकर.

फर्ग्युसन कॉलेजमधील काहीं प्राध्यापक (१९०२)



बसलेले डावीकडून १) प्रा चिं ग भानु २) प्रा वें का राजवाडे ३) रँ र पु परांजपे ४) प्रा धों के कर्वे
५) पं वासुदेवशास्त्री अभ्यंकर

उभे डावीकडून १) प्रा गो चिं भाटे २) प्रा ना स पानसे ३) प्रा वे रा कानिटकर

अगदी मोठ्या आवाजात-सध्या दूरध्वनिक्षेपकावर मनुष्य बोलू लागला असतां जेवढा मोठा आवाज ऐकू येतो तेवढ्या मोठ्या आवाजात-शास्त्रीबुवा कादंबरी-तील एकेक वाक्य वाचून जरूर त्या स्पष्टीकरणासह त्याचा अर्थ सांगत कधी कधी एक एक वाक्य तीन तीन पृष्ठांचे असे, पण त्याचा अर्थ शास्त्रीबुवांनी सांगितल्यानंतर निःसंदिग्धपणे आम्हास समजत असे. कादंबरीतील शृंगारिक प्रसंगाचे वर्णनहि शास्त्रीबुवा निरपवाद उच्च गुरांत शुद्ध मराठीत तपशीलवार पण अत्यंत गंभीरपणे करीत असत, त्यामुळे मिस्किलपणें हसण्याची कोणाचीहि छाती होत नसे. वर्गांत आल्यावरोबर ते टेबलावर पुस्तक ठेवून खुर्चीवर आसनमांडी घालून बसत व पुस्तक उघडून सारखाच निर्विकारपणें तासभर अस्खलितपणें विवेचन करीत. अध्यापनाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि विषयावर ते कधी गप्पागोष्टी करीत वा फुकट घालवीत नसत. तसेच ते न चुकता नियमित-पण वर्गांत येत व क्रमश: चपाना सर्व अभ्यास वेळेवर पूर्ण करीत. त्यामुळे व त्यांच्या विद्वत्तेबद्दल विद्यार्थ्यांस पराकाष्ठेचा आदर वाटत असल्यामुळे त्यांचा तास चालू असतांना कोणाहि विद्यार्थ्यास मोठ्या करण्याची बुद्धि होत नसे आणि इतर वेळीसुद्धा त्यांच्याविषयी चेष्टेचा अथवा अनादराचा सूर कोणीहि काढीत नसे!' प्रा. य. र. आगाशे म्हणतात, 'फर्ग्युसन कॉलेजमध्ये असतांना १९१४ ते १९१८ या अवधीत बी. ए. आणि एम्. ए. या वर्गांतील विद्यार्थी या नात्याने त्यांच्या (शास्त्रीबुवांच्या) समृद्ध लखनाचा लाभ प्रस्तुत लेखकाला झाला, हें मोठें भाग्य होय. मम्मटाचा काव्यप्रकाश, रामानुजाचार्यांचे श्रीभाष्य, श्रीशांकरभाष्य इत्यादि शास्त्रीय विषयावरील त्यांच्या व्याख्यानाचा विशेष म्हणजे 'पूर्णता गौरवाय' या शब्दांतच सांगितला पाहिजे. त्यांच्या अधिकारी वाणीचा अस्खलित ओघ सुरू झाला म्हणजे प्रतिपाद्य विषयाचें संपूर्ण विश्लेषण व्हावयाचें आणि न्याय, व्याकरण, मीमांसा इत्यादि शास्त्रांतील सदर्भ आणि परिभाषा यांची, उत्तम प्रकारें स्पष्टता व्हावयाची.' शास्त्रीबुवांच्या एका व्याख्यानाचे वर्णन करतांना डॉ. के. ना. वाटवे म्हणतात, ' भरघोस आवाजांत शास्त्रीबुवांचे प्रवचन चालू होई आणि त्या प्रवचनांत 'भिद्यते हृदयग्रन्थि छिद्यन्ते सर्वसंशया' याप्रमाणे विद्यार्थ्यांच्या मनांत प्रकाश पडत होता. अभिहितान्वयवादी, अन्विता-भिधानवादी, वाक्यपदीय 'गौ शुक्लश्चलो डित्थ' इत्यादि अडेलतट्टू आणि खोडसाळ प्रकरणें स्वच्छ आणि प्रसन्न दिसू लागली! शास्त्रीबुवांनी या सर्वांचे संदर्भ स्पष्ट केले. त्या वेळेला जवळ जवळ मृतवत् वाटणार त काव्यप्रकाशाचें प्रकरण आम्हास चैतन्यानें स्फुरलेले दिसू लागले।"

वरील वर्णनावरून शास्त्रीबुवांच्या विद्वत्तेची व अध्यापननैपुण्याची कीर्ति पुण्यातच नव्हे तर इतरत्रहि अल्पावधीत का पसरली असेल याची कल्पना

आपणास येते. हळूहळू त्यांची कीर्ति वाढत होती अन् अध्यापनाच्या अनुषंगाने शास्त्रीबुवांचा व्यासंगहि जोरात चालू होता.

— शास्त्रीबुवांना पुण्यात येऊन ८–९ वर्षे लोटली आणि अचानकपणे १८९९ साली त्यांस ग्रंथरचनेची एक सुवर्णसंधि प्राप्त झाली! यामध्येच त्यांच्या मौलिक व प्रचंड ग्रंथलेखनाचा—ग्रंथलेखक म्हणून त्यांनी मिळविलेल्या कीर्तीचा—उगम आपणास आढळतो! ही संधि म्हणजे संपूर्ण ब्रह्मसूत्र-शांकरभाष्याच्या मराठी अनुवादाची शास्त्रीबुवांकडे चालून आलेली कामगिरी!

* * *

# ७ : वाङ्मयीन कार्य – पूर्वार्ध (१८९९–१९२८)

"विद्युल्लतेप्रमाणें चचल अशी लक्ष्मी हें खरोखर आनुषंगिक फल विद्याधन मनुष्यास मिळते 'या अर्थाचे भारवि कवीचे वचन[1] शास्त्रीबुवांच्या बाबतीत सार्थ ठरतें, कारण व्याकरण हा शास्त्रीबुवांचा मुख्य अभ्यास विषय होता, तथापि "फर्गुसन कॉलेजमध्ये १८९२ साली अध्यापनाचे काम चालू केल्यानंतर त्यांना (शास्त्रीबुवांना) अलकार, न्याय वेदान्त व धर्मशास्त्र यावरील ग्रंथाचा अभ्यास करावा लागला आकरग्रंथ व टीकाग्रंथ याचे परिशीलन केल्याशिवाय व इतर ग्रंथाचा तौलनिक अभ्यास केल्याशिवाय कोणत्याहि शास्त्राचे यथार्थ अध्ययन होऊ शकत नाहीं हे त्यांचें ठाम मत होतें व म्हणून त्यांनी शकराचार्यांच्या शारीरभाष्याबरोबरच अद्वैत वेदान्तावरील मुख्य मुख्य ग्रंथाशिवाय रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, मध्वाचार्य, इत्यादि इतर आचार्यांच्या ग्रंथाचाहि सूक्ष्म अभ्यास केला ' असे प्रा काशीनाथपंत अभ्यंकर म्हणतात[2] यावरून पैसा अथवा कीर्त मिळविण्याच्या हेतूने नाही शास्त्रीबुवा आपल्या अध्यापन विषयाचा सखोल व व्यापक अभ्यास करीत नव्हते, तर आपलें अध्यापनाचें कर्तव्य अत्यंत प्रामाणिकपणे बजावण्यासाठीच त्यांचा हा सर्व निरलस उद्योग होता पण या उद्योगाचाच एक परिणाम असा झाला होता की त्यांच्या गाढ विद्वत्तेची कीर्ति अहमदाबाद येथील प्राध्यापक आबासाहेब काथवटे यांच्यापर्यंत जाऊन पोचली होती जेव्हा (सुमारे साठ वर्षांपूर्वी) *बडोद्याचे विद्वान् व विद्वत्प्रिय श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनी सामान्य जनते*-मध्ये उच्च तत्त्वज्ञानाचा प्रसार व्हावा या हेतूने शकराचार्यांच्या शारीरभाष्याचें मराठीत भाषांतर करून घेण्याचें ठरविलें व या कार्यासाठी एखाद्या सुयोग्य पंडिताचें नाव सुचविण्याविषयी प्रा आबासाहेब काथवटे यास विनंती केली, तेव्हा *त्यांनी नामदार गोखले यांच्याकडे चौकशी करून, शास्त्रीबुवा व फर्ग्युसन कॉलेज*-मधील त्यांचे एक सहकारी प्रा दिनकर त्र्यंबक चांदोरकर यांची नावे सुचविली। त्या सूचनेनुसार श्रीमंत सयाजीराव यांनी यांच दोघाकडे दोन वर्षांच्या मुदतीत हे भाषांतर पुरे करण्याची कामगिरी सोपविली या कामासाठी शास्त्रीबुवा व चांदोरकर या दोघास मिळून पाच हजार रुपये मानधन देण्याचेंहि त्यांनी कळविलें होतं ही कामगिरी अतिशय उत्तम प्रकारे बजावल्यामुळेच शास्त्रीबुवा थोर विद्वान्

---

१ अचिरांशुविलासचचला ननु लक्ष्मी फलमानुषङ्गिकम् ।( किरात २ १९)

२ शा भा मराठी भाषांतराच्या द्वितीयावृत्तीची प्रस्तावना,

१-२

म्हणून सुविख्यात झाले व उत्तरोत्तर त्यांच्या कीर्तीत भर पडत गेली म्हणजे शास्त्रीबुवास आपल्या विद्योपासनेचे आनुषंगिक फल म्हणून लक्ष्मी व कीर्ति यांचा लाभ झाला आणि यातच त्यांच्या श्रेष्ठतेचे मर्म साठविले आहे.

## (३) ब्रह्मसूत्रशांकरभाष्य–मराठी अनुवाद :

शास्त्रीबुवा व प्रा चादोरकर यांनी शारीरभाष्याच्या मराठी भाषांतराची ही कामगिरी पत्करतांच जारीने कार्यास सुरुवात केली दररोज दुपारी तीन वाजता कॉलेजातून परत आल्यानंतर शास्त्रीबुवा चादोरकरांकडे जात व सुमारे सहा वाजेपर्यंत त्यांचे हें काम चालू असे सुट्टीच्या दिवसाचाहि याच कार्याकडे तें विनियोग करीत चादोरकरांनी भाषांतर करावयाचे व शास्त्रीबुवांनी टीपा व अधिकरणाचे सारांश लिहून काढावयाचे, अशी कामांची वाटणी त्यांनी आपसांत करून घेतली होती "डॉ थिबो या विद्वान् प्राध्यापकांनी केलेले इंग्रजी भाषांतर वाचून व शास्त्रीबुवांकडून ग्रंथ समजावून घेऊन प्रा चादोरकर भाषांतर करू लागले व शास्त्रीबुवा हे भाषांतर बरोबर झालें आहे किंवा नाही तें पाहून व तपासून त्यावर टिप्पण्या व अधिकरणाचा सारांश लिहू लागले" असे या कामाचे वर्णन प्रा काशीनाथपंतांनी केलें आहे [३]

एक वर्षात दोघांनी जवळजवळ निम्में काम पूर्ण केले, म्हणजे शारीरभाष्याच्या दोन अध्यायांचे भाषांतर टिप्पण्या इत्यादिकांसह लिहून पूर्ण झाले – पण अकस्मात् (सप्टेंबर सन १९०० मध्ये) प्रा चादोरकर वारले व सर्व काम एकट्या शास्त्रीबुवांवर येऊन पडले। हीच खरी परीक्षेची वेळ होती। तथापि शास्त्रीबुवांनी प्रयत्नांची पराकाष्ठा करून उरलेल्या एका वर्षातच सर्व काम संपविण्याचा चंग बांधला। इतक्यात, शांकरभाष्याच्या अभ्यासास उपोद्बलक म्हणून, वेदान्तसूत्राचे[४] शंकराचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य व पूर्णप्रज्ञाचार्य (मध्व) या मुख्य आचार्यांनी ज्या ठिकाणी जे भिन्न अर्थ केले आहेत, त्यातील मतभेद स्पष्ट होण्यासाठी कोष्टकाच्या स्वरूपांत ते अर्थ देणारा एक परिशिष्टात्मक खंड तयार करण्याचीहि कामगिरी गायकवाड सरकारानी शास्त्रीबुवांकडे सोपविली शास्त्रीबुवांनी केवळ तीन महिन्यांची मुदतवाढ मागून घेऊन बरोबर एकूण सव्वादोन वर्षांत परिशिष्ट खंडासह समग्र

---

३ शा भा भाषांतर, द्वि आ प्रस्ता पृ १

४ आद्य शंकराचार्यांनी बादरायणाचार्यांच्या मूळ वेदान्तसूत्रांवरच आपले शारीरकभाष्य लिहिले आहे

ग्रंथाचें हस्तलिखित (एकूण चार खंड, छापील पृष्ठसंख्या सुमारे १७००) श्रीमंत गायकवाड सरकारच्या स्वाधीन केले।[५]

अन् कामाच्या दर्जाविषयी तर बोलावयासच नको। भाषांतराची मराठी भाषा इतकी साधी व सहजसुंदर आहे, की संस्कृतातील भगवान् पतञ्जलींच्या व्याकरणमहाभाष्याच्या भाषेचीच उपमा तिला शोभेल। ग्रंथातील अतिशय कठीण विषयाला इतकी सुबोध भाषा वापरलेली क्वचितच आढळते शास्त्रीबुवा मूळचे व्याकरणशास्त्राचे अभ्यासक असल्यामुळे पतञ्जलीच्या भाषेचा त्यांच्या भाषेवर खरोखरच मोठा परिणाम झालेला दिसून येतो नमुन्यासाठी शांकरभाष्याच्या प्रारंभी असलेल्या अध्यासभाष्याच्या अनुवादाचा पुढील प्रारंभ पाहा —

शांकरभाष्य "युष्मदस्मत्प्रत्ययगोचरयोर्विषयविषयिणोस्तमःप्रकाशवद्विरुद्ध-स्वभावयोरितरेतरभावानुपपत्तौ सिद्धायां तद्धर्माणामपि सुतरामितरेतरभावानुपपत्तिरित्यतोऽस्मत्प्रत्ययगोचरे विषयिणि चिदात्मके युष्मत्प्रत्ययगोचरस्य विषयस्य तद्धर्माणां चाध्यास, तद्विपर्ययेण विषयिणस्तद्धर्माणां च विषयेऽध्यासो मिथ्येति भवितुं युक्तम्। तथाप्यन्योन्यस्मिन्नन्योन्यात्मकतामन्योन्यधर्मांश्चाध्यस्येतरेतरा-विवेकेन, अत्यन्तविविक्तयोर्धर्मधर्मिणोर्मिथ्याज्ञाननिमित्त सत्यानृते मिथुनीकृत्य, अहमिदं ममेदमिति नैसर्गिकोऽयं लोकव्यवहार।" (शा भा पृ १)

मराठी अनुवाद "जो 'तू' अशा ज्ञानाला योग्य आहे तो विषय, आणि जो 'मी' अशा ज्ञानाला योग्य आहे तो विषयी होय या दोघांचे स्वभाव अंधकार आणि प्रकाश यांच्या स्वभावाप्रमाणे परस्परविरुद्ध आहेत म्हणून या दोघांचे ऐक्य संभवत नाही हे सिद्ध आहे तेव्हा अर्थातच या दोघांच्या धर्मांचेहि ऐक्य संभवत नाही हे उघड आहे यावरून 'मी' अशा ज्ञानाला योग्य जो चित्स्वरूपी विषयी त्याच्यावर 'तू' अशा ज्ञानाला योग्य जो विषय त्याचा आणि त्याच्या धर्मांचा केलेला अध्यास, तसेच याच्या उलट, विषयावर विषयीचा आणि त्याच्या धर्मांचा केलेला अध्यास हे दोन्ही मिथ्या होत असे मानणे जरी युक्त आहे तथापि (वस्तुत ) अत्यंत भिन्न

---

५ गायकवाड सरकारने हा ग्रंथ संस्थानच्या छापखान्यात छापून सन १९११ मध्ये प्रसिद्ध केला बडोद्याचे राज्य विलीन झाल्यामुळे पुण्याच्या डी ई सोसा-यटीने मुंबई सरकारची परवानगी मिळवून प्रा काशीनाथपंतांच्या देखरेखीखाली या ग्रंथाची द्वितीयावृत्ति सन १९५७ मध्ये प्रसिद्ध केली या द्वितीयावृत्तीस प्रा काशीनाथपंतानी स्वत ची विद्वत्तापूर्ण प्रस्तावनाहि जोडली आहे प्रा म दा साठे यांनी ७ जानेवारी १९५८ च्या केसरीत या द्वितीयावृत्तीचे विस्तृत परीक्षण दिले आहे

असे जे हे पदार्थ (विषय आणि विषयी) त्यांचा, आणि त्यांचे (वस्तुत ) अत्यंत भिन्न असे जे धर्म त्यांचा, तो परस्परांमधील भेद (मिथ्याज्ञानाच्या योगाने) कळून येत नाही, म्हणून परस्परांवर परस्परांच्या स्वरूपाचा आणि धर्मांचा अध्यास करून व खरे आणि खोटें यांचे 'मिथुन करून 'हे मी' 'हे माझें' अशा प्रकारचा मिथ्याज्ञानमूलक व्यवहार स्वाभाविक रीतीने लोक आजपर्यंत करीत आले आहेत ' (शा. भा मराठी अनुवाद, पृ. ३–५)

*सर्व ग्रंथात शास्त्रीबुवांनी दिलेल्या टिप्पण्या इतक्या मुद्देसूद व मार्मिक आहेत* की त्या वाचल्यानंतर सामान्य वाचकासहि या विषयातील दुर्बोधता वाटेनाशी होते व हळूहळू त्यातील हृद्गत ध्यानात येऊन त्यात गोडी वाटू लागते ! उदाहरणार्थ, प्रारंभीच्या अध्यासभाष्यामधील विषय, विषयी, अध्यास, प्रत्यगात्मा, प्रमाण इत्यादि शब्दांवरील व तर्कपादावरील (अध्याय २, पाद २) शास्त्रीबुवांनी दिलेल्या टीपा फारच उद्बोधक आहेत प्रत्येक अधिकरणाच्या प्रारंभी शास्त्रीबुवांनी त्या अधिकरणाचा दिलेला सारांशहि असाच मुद्देसूद व मर्मग्राही आहे त्यामुळे अभ्यासकास हा प्रचंड ग्रंथ समजण्यास व ध्यानात ठेवण्यास फार मोठी मदत होते अनुवाद, टीपा इत्यादि लिहिताना शास्त्रीबुवांनी *आनंदगिरिकृत शांकरभाष्यव्याख्या*, गोविंदानंदकृत रत्नप्रभा, वाचस्पतिमिश्रकृत भामती व अद्वैतानंदकृत ब्रह्मविद्याभरण या टीकाग्रंथांचा प्रामुख्याने उपयोग केला असल्यामुळे या अनुवादग्रंथास विशेष मोल चढले आहे शास्त्रीबुवांच्या या भाषांतरामुळे शांकरभाष्याची मराठीतील इतर भाषांतरे मागे पडली विद्यार्थीच काय, पण प्राध्यापकसुद्धा डॉ थिबो यांच्या भाषांतरापेक्षा शास्त्रीबुवांचेच भाषांतर पसंत करू लागले परिशिष्ट (चौथ्या) खंडात प्रत्येक भाष्यभागाचा त्या त्या सूत्रावरील अर्थ स्पष्ट होण्यासाठी शास्त्रीबुवांनी अधिक शब्द घालून दिले आहेत व मार्मिक टीपाहि दिल्या आहेत त्यामुळे एकंदर वेदान्तविषयाचे व्यापक ज्ञान होण्यासाठी हा खंड अत्यंत उपयुक्त असून त्यावरून शास्त्रीबुवांच्या असामान्य बुद्धिमत्तेची व पांडित्याची आपणास कल्पना येते. एकंदर ग्रंथास शास्त्रीबुवांनी बाहेरील घालून लिहिलेली प्रस्तावनाहि अशीच त्यांच्या योग्यतेस शोभेशी आहे त्यामध्ये वेदान्तसूत्रांचे स्वरूप, त्यातील चार अध्यायांतील प्रतिपाद्य विषय, शंकराचार्यादि चार भाष्यकारांनी त्या सूत्रांवर प्रकट केलेली भिन्न मते,[१] व त्यांची चर्चा इत्यादिकांविषयी थोडक्यात पण निःसंदिग्ध विवेचन केले आहे–म्हणूनच हा प्रचंड ग्रंथ मराठी भाषेत एक अमोल ठेवा ठरला आहे या ग्रंथाने शास्त्रीबुवांच्या

१ शंकराचार्यांचे केवलाद्वैत अथवा मायाद्वैत, रामानुजाचार्यांचे विशिष्टाद्वैत, वल्लभाचार्यांचे शुद्धाद्वैत व पूर्णप्रज्ञाचार्यांचे शुद्धद्वैत ही मतें प्रसिद्ध आहेत

कीर्तिमंदिराचा दृढ पाया भरण्याचे काम केले असल्यास त्यात आश्चर्य करण्याजोगें काय आहे? – शास्त्रीबुवानी केवळ कर्तव्यबुद्धीने अत्यंत निरपेक्षपणे जी विद्योपासना केली, निरचेच हे आनुषंगिक फळ त्यास मिळाले! या प्रकरणाच्या प्रारंभी दिलेले कवि भारवीचे वचन आधुनिक काळातहि सार्थ ठरले!

या कामगिरीबद्दल श्रीमंत गायकवाड सरकारकडून जे पाच हजार रुपये मानधन म्हणून मिळाले, त्यातील निम्मी रक्कम शास्त्रीबुवानी तात्काळच श्रीमती चादोरकर यांच्या स्वाधीन केली!

—यावर अधिक भाष्य करण्याची जरूर नाही धर्माज्ञेप्रमाणे व्यवहारातील करारांचेहि इतके कसोशीने पालन करणारे लोकोत्तर पुरुष जगात कितीसे आढळतात?

(४) 'समासोक्ति' टीकेसह श्रीभाष्य चतु सूत्री

श्रीशंकराचार्यांच्या शारीरकभाष्यानुवादाच्या कामातून शास्त्रीबुवा मोकळे झाले होते १९०४ साली मुंबई विद्यापीठाने रामानुजाचार्यांच्या श्रीभाष्याची चतु सूत्री पदवीपरीक्षेसाठी नेमली होती शांकरभाष्यानुवादाचे कार्य करताना शास्त्रीबुवानी एकंदर वेदान्तशास्त्राचे सखोल व व्यापक परिशीलन केले असल्यामुळे, थोड्याच दिवसात त्यानी 'श्रीभाष्ये चतु सूत्री' हा आपला ग्रंथ प्रसिद्ध केला चतु सूत्रीची मूळ संहिता देताना त्यानी पाचसहा हस्तलिखिते जमा करुन त्यातील महत्त्वाचे पाठभेद दिले आहेत आधुनिक संशोधकाप्रमाणे मूळ ग्रंथाची जास्तीत जास्त शुद्ध संहिता देण्याचा हा त्यांचा प्रयत्न अत्यंत प्रशंसनीय आहे तसच, त्या संहितेमध्ये –चतु सूत्रीमध्ये– श्रुति, उपनिषदे गीता, ब्रह्मसूत्रे विशेषत विष्णुपुराण इत्यादि ग्रंथातील जी अवतरणे आली आहेत, त्याचे सर्व संदर्भ मूळ ग्रंथातून शोधून काढून नमूद केले आहेत व त्यांची सूचीहि तयार करुन दिली आहे! यामुळे अभ्यासकाची बहुमोल सोय तर झालीच, परंतु एखाद्या शास्त्रीय ग्रंथाचा अभ्यास कसा करावा याचे दिग्दर्शनहि अभ्यासकास मिळाले असे म्हणण्यास हरकत नाही

आपल्या श्रीभाष्यामध्ये अथवा चतु सूत्रीमध्य रामानुजानी मुख्यत शंकराचार्यांच्या मायावादाचे खंडन करून आपले विशिष्टाद्वैतमत प्रस्थापित केले आहे या चतु सूत्रीवरील आपल्या टीकेला शास्त्रीबुवानी 'समासोक्ति' असे यथार्थ नाव दिले आहे, कारण त्या वेळी श्रीभाष्यावर श्रीसुदर्शनसूरींची 'श्रुतप्रकाशिका' नावाची एकच एक विस्तृत टीका उपलब्ध होती आपल्या टीकेविषयी शास्त्रीबुवा म्हणतात, "श्रीभाष्यरूपी सागरात अवगाहन करणाऱ्यासाठी 'श्रुतप्रकाशिका' नावाची

एकच मोठी नाव डोलाने उभी आहे, परंतु तीसुद्धा हल्ली दुर्लभ झाली असल्यामळे ही 'समासोक्ति' नावाची होडी प्रकाशित केली जात आहे"[७] यावरून मूळ शास्त्रीय ग्रंथ व त्याच्या अभ्यासाची साधने अभ्यासकास उपलब्ध करून देणे, हा या प्रयत्नामागील शास्त्रीबुवांचा हेतु स्पष्टपणे आपल्या ध्यानात येतो समासोक्ति टीका लिहिताना शास्त्रीबुवांनी विशिष्टाद्वैतमतावर लिहिलेल्या यतीन्द्रमतदीपिका, तत्त्वत्रयचुलुक, तात्पर्यदीपिका, तत्त्वशेखर इत्यादि अनेक ग्रंथांचा उपयोग करून घेतला आहे ही गोष्ट 'समासोक्ती' मधील त्या ग्रंथांच्या अनेक उल्लेखावरून सिद्ध होते शास्त्रीबुवांची रामानुजांची इतकी पांडित्यपूर्ण असूनहि तिच्या नावाप्रमाणे खरोखरच संक्षिप्त आहे आणि आश्चर्य असे की त्यांच्या अन्य ग्रंथाप्रमाणे ती अतिशय सुगमहि आहे, असा प्राध्यापकांचाच नव्हे तर विद्यार्थ्यांचाहि अनुभव आहे

(५) प्रकाश' टीकेसह यतीन्द्रमतदीपिका

'समासोक्ति' टीका लिहिल्यावर थोड्याच कालानंतर सन १९०६ मध्ये शास्त्रीबुवांनी आपला यतीन्द्रमतदीपिका – प्रकाशाख्यव्याख्यासमेता ' हा वेदान्तविषयावरील ग्रंथ प्रकाशित केला मूळ यतीन्द्रमतदीपिका हा ग्रंथ श्रीनिवासदास यांनी लिहिला, त्यावर शास्त्रीबुवांनी आपली 'प्रकाश' नावाची टीका लिहिली आहे या टीकेच्या प्रारंभी शास्त्रीबुवा म्हणतात, "मी फार मोठा बुद्धिमान् आहें अथवा गूढ शास्त्रार्थं मर्म जाणणारा आहे असे नाही, परंतु गुरुकृपेचा अवलंब करून शास्त्रविषयाची चर्चा करण्यास मी नेहमी अत्यंत उत्सुक असतो सर्व जगास आधारभूत असलेल्या परमात्म्याचें स्मरण करून मी 'यतीन्द्रमतदीपिका' ग्रंथाचे निरूपण करू शकेन अशी मी (परमेश्वराजवळ) प्रार्थना करीत आहे श्रीभाष्य इत्यादि ग्रंथांचा अभ्यास करून, निरनिराळ्या प्रसंगाच्या निमित्ताने त्या ग्रंथातील सिद्धान्ताचे विवरण करण्याचा मी आपल्या बुद्धीनुसार प्रयत्न करीत आहे"[८]–'विद्या विनयेन शोभते' या सिद्धान्ताचे हें उदाहरण नव्हे काय? जिज्ञासूंना वेदान्तशास्त्राचा अभ्यास

---

७ श्रीभाष्यसिन्धाववमज्जतां श्रुतप्रकाशिकैवेन तरीविराजते ।
न लभ्यते साऽपि च साम्प्रतं नृणामतः समासोक्त्युडुपः प्रकाश्यते ॥ (पृ १)

८ न तीक्ष्णधिषणो न च प्रथितगूढशास्त्रार्थवित्
तथापि मद्गुरुकृपा गुरुत्वमवलम्ब्य परम् ।
अशेषजगदाश्रयं परमपूरुषं चिन्तयन्
यतीन्द्रमतदीपिकां विवृणुयामिति प्रार्थये ॥
श्रीभाष्यादिनिबन्धान् दृष्ट्वा प्रायस्तदीयसिद्धान्तान् ।
तत्तत्प्रसङ्गतो विशदीकर्तुं यथामति प्रयते ॥

आहे त्यामुळे शास्त्रीबुवाच्या टीकाकाराचा भ्रमनिरास होऊन त्याचा अद्वैतमताभिमान निःसदिग्धपणे सिद्ध झाला याहि ग्रंथाच्या प्रारंभी विस्तृत विषयानुक्रमणिका व शेवटी ग्रंथान्तर्गत अवतरणाची वर्णानुक्रमसूची इत्यादि माहिती देऊन अभ्यासकाची मोठी सोय केली आहे

(१२) 'सकेत' टीकेसह काव्यप्रकाश

सन १९२१ मध्ये मम्मटाचा काव्यप्रकाश हा ग्रथ त्यावरील माणिक्यचद्रकृत 'सकेत' नावाच्या टीकेसह शास्त्रीबुवानी सपादन करून प्रसिद्ध केला 'सकेत' ही 'काव्यप्रकाश'वरील अगदी पहिली टीका असावी असे शास्त्रीबुवाच म्हणणे आहे सपादनासाठी याहि टीकेची दाक्षिणात्य हस्तलिखित शास्त्रीबुवानी मिळविली होती नेहमीप्रमाणे याहि ग्रथात त्यानी ग्रथान्तर्गत विषयाची वर्णानुक्रमसूची इत्यादि अभ्यासकाचे शेवटी दिली आहेत

(१३) सूत्रान्तरपरिग्रहविचार

सन १९२२ च्या सुमारास पुण्यामध्ये एक यज्ञ झाला होता त्या वेळी ऋग्वेदी आणि कृष्णयजुर्वेदी हिरण्यकेशीय ब्राह्मण याच्यामध्ये एक मोठा खळबळ उडवून देणारा वाद झाला! यज्ञातील हौत्र ऋग्वेदाच्या आश्वलायन सूत्राप्रमाणेच झाले पाहिजे असे एका पक्षाचे मत होते, तर इतर वेदाच्या सूत्राप्रमाणे ते होण्यास हरकत नाही, असे दुसऱ्या पक्षाचे म्हणणे होते शेवटी त्या यज्ञातील हौत्र हिरण्यकेशीय सूत्राप्रमाणे झाले आणि उभयपक्षातील लोक हमरीतुमरीवर आले! वर्तमानपत्रानहि या वादाची चर्चा सुरू झाली शास्त्रीबुवा या वादात पहिल्याने तटस्थ होते, परंतु या बाबतीत शास्त्रशुद्ध मत प्रकट करण्याची त्यास विनती करण्यात आल्यानतर त्यानी 'सूत्रान्तरपरिग्रहविचार' हा एक लहानसा २५ पृष्ठाचा निबंध प्रसिद्ध केला सर्व साधकबाधक प्रमाणे देऊन, अन्य सूत्राचा स्वीकार करण्यास हरकत नाही, असा निष्कर्ष सिद्धान्तरूपाने त्यानी या निबंधात माडला आहे

ऋग्वेदाची व यजुर्वेदाची अनेक सूत्रे असली, तरी त्याचा विनियोग कोणी व केव्हा करावा, याविषयी बौधायनीय धर्मरहस्यात पुढीलप्रमाणे व्यवस्था सागितली आहे – अध्वर्यु उद्गाता आणि होता याविषयी अनेक सूत्र आहेत परंतु ज्या लोकामध्ये सूत्रजातिकुलोचित सबध होऊ शकतो, त्यानी विवाह, सामश्राद्ध व अग्न्याधान या प्रसगी आपापल्या शाखेच्या सूत्रानीच ते विधि करावेत, नाही तर ते पतित होतील—अशा प्रकारे प्रारभ करून व इतर मुद्दे माडून शास्त्रीबुवानी हा निबध सपविला आहे या निबंधास 'सूत्रान्तरपरिग्रह-

विचारपरिशिष्टम्' या नावानें एक परिशिष्ट जोडून शास्त्रीबुवानी त्यामध्ये निवधातील सिद्धान्तावर इतरानी घेतलेले अनेक आक्षेप खोडून काढले आहेत

शास्त्रीबुवा स्वत कृष्णयजुर्वेदीय हिरण्यकेशी शाखेचे असल्याने त्याच्यावर निष्पक्षपातापणे आपली बाजू माडण्याची मोठी जबाबदारी होती, ती त्यानी उत्तम रीतीने पार पाडली यात शका नाही

(१४) 'दर्शनाङ्कुर" टीकेसह सर्वदर्शनसग्रह –

यानतर स्वत च्या टीकेसह 'सर्वदर्शनसग्रह' सपादन करण्याचे कार्य शास्त्रीबुवानी १९२८ साली सुरू करून १९२४ साली पूर्ण केले राजकीय प्राच्य (हिंदु) ग्रथमालेतील पहिले पुष्प म्हणून भाडारकर प्राच्यविद्या सशोधन-मदिराने हा ग्रथ प्रकाशित केला हें त्याचे काम इतके श्रेष्ठ दर्जाचे झाले आहे की त्यामुळे 'महापडित' म्हणून अखिल भारतात त्यानी कीर्ति पसरली। या ग्रथाची पहिली आवृत्ति लवकरच सपून गेली आणि विद्यार्थी व अध्यापक यानी त्याच्या पुनर्मुद्रणाची अत्यत निकडीची मागणी सतत चालू ठेवली, यावरूनच या ग्रथाचा श्रेष्ठ दर्जा व उपयुक्तता उत्तम प्रकारे सिद्ध होते असे डॉ रा ना दाडेकर यानी १९५० साली प्रसिद्ध झालेल्या या ग्रथाच्या द्वितीयावृत्तीच्या प्रस्तावनेत म्हटले आहे [१०] या ग्रथाच्या एवढ्या लोकप्रियतेचे मुख्य कारण असे की मूळ 'सर्वदर्शनसग्रह' अभ्यासकास अत्यत सग्राह्य अथवा अभ्यसनीय वाटत असूनहि दुर्लभ झाला होता व सामान्य लोकास तो बराच दुर्बोधहि वाटत होता, तथापि काही छापील व हस्तलिखित प्रति मिळवून शास्त्रीबुवानी तो शुद्ध स्वरूपात तयार केला व त्यास आपल्या उद्बोधक अशा 'दर्शनाङ्कुर' नावाच्या टीकेची व विस्तृत उपोद्घाताची जोड देऊन तो प्रसिद्ध केला।

सर्वदर्शनसग्रह ग्रथ माधवाचार्य या महापडितानी लिहिला असून, त्यामध्यें एकूण सोळा दर्शनाची थोडक्यात पण अत्यत मुद्देसूद माहिती दिली आहे प्रत्येक दर्शनाचे विवेचन करताना त्यात श्रुत्यादि आकरग्रथातील अवतरणे दिली असून

---

१० "That throughout all these five years there should have been a constant and urgent demand for its reprint from teachers and students in the various parts of the country indeed testifies most eloquently to the excellence and usefulness of that work' (र स द्वि आ, प्रस्ता० पृ १) या द्वितीयावृत्तीचे सपादन प्रा काशीनाथपत यानी केले

कितीतरी ग्रंथ व ग्रंथकार यांचे आधार दिले आहेत त्या सर्वांचे निर्दोष ज्ञान करून घेतल्याशिवाय या ग्रंथाचें रहस्य जाणणं व त्यावर टीका लिहिणे खरोखरच अतिशय कठीण आहे ! शिवाय या कार्यास प्रारंभ करण्याच्या वेळी शास्त्रीबुवांचे वय सुमारे साठ वर्षांचे होत म्हणून तोपर्यंत व्याकरणन्यायवेदान्तादि शास्त्रांत चाळीस वर्षे अध्यापन-लेखनाची अखंड तपश्चर्या केलेली असूनहि, हे कार्य हाती घेण्याविषयी शास्त्रीबुवांच्या मनात मोठी चलबिचल निर्माण झाली होती पण काय चमत्कार ! शास्त्रीबुवा म्हणतात " काय करावे हे समजेनासे होऊन, दोन-तीन दिवस मी द्विधा मन स्थितीतच काढल्यानंतर माझे परमगुरु पितामह भास्कर-शास्त्री यांची मूर्ति स्वप्नामध्ये एक क्षणभर माझ्या नजरेस पडली ! त्या स्वप्नातच तावडतोब मी त्याच्या चरणावर आपले मस्तक ठेवले असता प्रसन्न मुखाने त्यांनी माझ्याकडे आपला कृपाकटाक्ष टाकला ! तो परमानंदमय क्षण क्षणमात्र टिकला हे सांगणं नकोच तावडतोब मी जागा झालो आणि एकदम माझ्या मनात पहिला विचार हा आला की या 'सर्वदर्शनसंग्रहा' वर टीका लिहिण्याचा आपण जरूर प्रयत्न केला पाहिजे मग ती टीका सर्वांगसुंदर होवो वा न होवो ! सर्व-दर्शनसंग्रहरूपी अरण्यात संचार करणाऱ्या लोकास तिच्यापासून मार्गदर्शन होईल खास ! अशा प्रकारे अंतःकरणात उत्कट प्रेरणा निर्माण झाल्यानंतर मी सद्गुरु रामशास्त्री गोडबोले यांच्या पूज्य चरणांचे वारंवार चिंतन करीत, त्यांच्या कृपेनच हे कार्य तडीस जाईल असा विश्वास मनात निर्माण झाल्यामुळे आपल्या कुलदेवतेस वंदन केले व त्रिद्वद्वर्य परमगुरु भास्करशास्त्री अभ्यंकर यांच्या मूर्तीचे चिंतन करीत सर्वदर्शनसंग्रहाच्या टीकालेखनास प्रारंभ केला ! "[११] शास्त्रीबुवांचा हा अनुभव 'मनी वसे ते स्वप्नी दिसे' या म्हणीचेंहि प्रत्यंतर असणं शक्य आहे, परंतु या स्वप्नानंतर एकदा या संपादन-कार्याचा निश्चय केल्यावर शास्त्रीबुवांनी मनाची यत्किंचितहि चलबिचल होऊ न देता अयत्न जारीने आपल्या कामास सुरवात केली व परमवंदनीय गुरुचरणाचे स्मरण करीत हे कार्य उत्कृष्ट रीतीने तडीस नेले, हें ध्यानात ठेवण्या-सारखें आहे यावरून विद्वत्ता व परिश्रमशीलता यांवरोबर दृढनिश्चय व गुरु-भक्ति हेहि त्यांचे गुण दिसून येतात हा ग्रंथ त्यांनी गुरुवर्य महर्षि रामशास्त्री यांस अर्पण केला आहे अर्पणपत्रिकेच्या शेवटी ते म्हणतात, " मी कनिष्ठ शिष्य वासुदेव अभ्यंकर, आता सद्गुरूंच्या चरणकमलांवर हा 'दर्शनाङ्कुर' अर्पण करून

---

११ पाहा—स स, द्वि. आ. प्रस्ता पृ. ७

स्वत चा जन्म सफल व्हावा अशी इच्छा करीत आहे"[१३] याच ग्रंथाच्या उपोद्घातामध्ये शेवटी, जन्मसाफल्याची इच्छा करणाऱ्याने मोक्षसिद्धीसाठी सतत प्रयत्न केला पाहिजे, आत्मज्ञानाने मोक्ष प्राप्त होतो, असंदिग्ध निष्कामकर्माचरण, संपूर्ण चित्तशुद्धि व तीव्र मोक्षेच्छा या तीन गोष्टी परस्पर-साहाय्यक असून त्यामुळे आत्मज्ञान होते, असे शास्त्रीबुवानी सिद्ध केले आहे[१३] यावरून मोक्षसिद्धीचें साधन म्हणून या संपादनकार्यास शास्त्रीबुवानी हात घातला व तें तडीस नेले असे म्हणावेसे वाटते १९३९ साली लिहिलेल्या आपल्या 'कायपरिशुद्धि या स्वतंत्र ग्रंथाच्या शेवटीसुद्धा जन्मसाफल्य हाच आपला हेतु त्यानी सांगितला आहे[१४] आपल्या एकदर ग्रंथलेखनाचा हेतुच जन्मसाफल्य (मोक्षसिद्धि) हा आहे, असेहि त्यानी मृत्यूपूर्वी थोडेच दिवस, आपण स्वतंत्रपणे लिहिलेल्या अथवा संपादन केलेल्या ग्रंथाची यादी करून व त्यापैकी तेरा ग्रंथाना 'आमोद' असे नाव देऊन, सर्वांचे खाली पुढील श्लोकात म्हणून ठेवले आहे –

> समर्प्य गौरीरमणे कृत्वाऽमोदांस्त्रयोदश।
> श्रीवासुदेवो जनुष साफल्य लब्धुमीहते ॥[१५]

शास्त्रीबुवाचे हे उद्गार औपचारिक नसून पूर्णपणे वस्तुस्थितीस धरून आहेत, कारण मोक्षसिद्धीचे साधन या दृष्टीने त्यानी या ग्रंथसंपादन–लेखन–कार्याकडे पाहिले नसते, तर एवढें प्रचंड कार्य त्यांच्या हातून झालेच नसते! वयाची साठी झाली असता सर्वदर्शनसंग्रह–संपादनाचे अत्यंत जिकिरीचे व त्यावर टीका लिहिण्याचे अतिशय कठीण असे काम त्यानी हाती घेतले, यातील मर्म मोक्षसाधना हेच आहे

कलकत्ता व पुणे येथे छापलेल्या 'सर्वदर्शनसंग्रहा'च्या प्रतीमध्ये खूपच अशुद्ध पाठ होते व दोनतीन ठिकाणी तर मध्यंतरीच्या काही ओळीच गळून गेल्यामुळे मागचापुढचा अन्वयहि लागत नव्हता! त्यानी ज्या हस्तलिखित प्रति मोठ्या प्रयासाने मिळविल्या होत्या, त्यापैकी काहीमध्ये सर्वात महत्त्वाचे शाकरदर्शनच

१२ अभ्यंकरोपाह्व–वासुदेवक, शिष्यावम सद्गुरुपादपङ्कजे।
　　समर्पयन् सम्प्रति दर्शनाङ्कुर, स्वजन्मसाफल्यमवाप्तुमीहते ॥३॥
१३ स स उपोद्घात, पृष्ठें ११८–११९
१४ समर्प्य गौरीरमणे भक्त्येत ग्रन्थमादरात्।
　　श्रीवासुदेवो जनुष साफल्य लब्धुमीहते॥(का. प, पृ १०४)
१५ म स, पृ ४९

नव्हतें। तर एका प्रतीतील पानें हातात घेताच त्याचे तुकडे पडत, इतकी ती अत्यंत जीर्ण झाली होती। यावरून या ग्रंथाची शुद्ध संहिता तयार करताना शास्त्रीबुवांना किती प्रयास पडले असतील, याची कल्पनाच केलेली बरी!

सर्वदर्शनसंग्रहावर टीका लिहिण्याचे काम तर फारच कठीण होते, कारण वेदान्त अथवा तत्त्वज्ञान हा विषय इतका दुर्गम आहे की 'सामान्यतः व्युत्पन्न व वेदान्तशास्त्रात प्रवेश झालेल्या मनुष्यास वेदान्तग्रंथातील वाक्याचा अर्थ फार तर समजेल, परंतु त्यामधील गूढ आशय समजणे मुळीच शक्य नाही कुशाग्रबुद्धि लोकांसहि, अध्ययनाध्यापनाच्या साहाय्याने या ग्रंथसागराचे वारंवार आलोडन केलें तरी, त्याचें पुन्हा समालोचन करताना नवनवीन गूढ अर्थ प्रतीत होतो।"[१६] अन् या ग्रंथात तर ग्रंथकर्त्यांनी एकूण सोळा दर्शनांचा थोडक्यात पण मार्मिक परिचय करून दिला आहे त्यांपैकी चार्वाक, बौद्ध व जैन ही तीन नास्तिक दर्शनें असून रामानुज, पूर्णप्रज्ञ(माध्व) नकुलीशपाशुपत शैव, प्रत्यभिज्ञा, रसेश्वर, वैशेषिक, नैयायिक जैमिनि, पाणिनि सांख्य योग व शांकर ही तेरा आस्तिक दर्शनें आहेत। या सर्वांमधील साम्यभेद नीट ध्यानात घेऊन त्यांचा निःसंदिग्ध परिचय करून देणे किती दुष्कर आहे याची कल्पनाच केलेली बरी पण शास्त्रीबुवा या कामात निर्विवादपणे यशस्वी झाले आहेत त्यांची 'दर्शनाङ्कुर' टीका मूळ ग्रंथाइतकीच विस्तृत आहे मूळ ग्रंथास जोडलेला १२१ पृष्ठांचा उपोद्घात तर इतका विद्वत्ताप्रचुर व तर्कशुद्ध आहे आणि त्याची भाषा इतकी निःसंदिग्ध व अल्पाक्षररमणीय आहे की शास्त्रीबुवांच्या लेखनाचा अत्युत्कृष्ट नमुना म्हणून त्याकडे बोट दाखविता येईल उदाहरणार्थ शास्त्रीबुवांनी त्या सोळा दर्शनांचें अत्यंत थोडक्यात व साभिप्राय विशेषण योजून केलेले परिगणन व त्यांचा क्रम पाहा –' अत्राय संग्रहः । दर्शनकारा द्विविधा नास्तिका आस्तिकाश्च । नास्तिका द्विविधा आध्यक्षिकास्तार्किकाश्च । आध्यक्षिकाश्चार्वाका (१) । नास्तिका स्तार्किका द्विविधा क्षणिकवादिनः स्याद्वादिनश्च । क्षणिकवादिनो बौद्धा (२) । स्याद्वादिनो जैना (३) । आस्तिका द्विविधा सगुणात्मवादिनो निर्गुणात्मवादिनश्च । सगुणात्मवादिनो द्विविधास्तार्किका श्रौताश्च । तार्किका द्विविधा प्रच्छन्नतार्किका स्पष्टतार्किकाश्च । प्रच्छन्नतार्किका द्विविधा प्रच्छन्नद्वैता स्पष्टद्वैताश्च । प्रच्छन्नद्वैता रामानुजीया (४) । स्पष्टद्वैता माध्वा (५) । स्पष्टतार्किका द्विविधा भोगसाधना-दृष्टवादिन उत्पत्तिसाधनादृष्टवादिनश्च । भोगसाधनादृष्टवादिनो द्विविधा विदेह-मुक्तिवादिनो जीवन्मुक्तिवादिनश्च । विदेहमुक्तिवादिनो द्विविधा आत्मभेदवादिन आत्मैक्यवादिनश्च । आत्मभेदवादिनो द्विविधा कर्मानपेक्षेश्वरवादिनः कर्मसापेक्ष-

---

१६ पाहा—स. स. उपोद्घात, पृ. ९६

वादिनश्च। कर्मनिरपेक्षेश्वरवादिनो नकुलीशपाशुपता (६)। कर्मसापेक्षेश्वरवादिन· शैवा (७)। आत्मैक्यवादिन प्रत्यभिज्ञादर्शिन (८)। जीवन्मुक्तिवादिनो रसेश्वरा (९)। उत्पत्तिसाधनादृष्टवादिनो द्विविधा शब्द प्रमाणान्तरमनङ्गीकुर्वाणास्तदङ्गीकुर्वाणाश्च। अनङ्गीकुर्वाणा वैशेषिका (१०)। अङ्गीकुर्वाणा नैयायिका (११)। श्रौता द्विविधा वाक्यार्थवेदिन पदार्थवेदिनश्च। वाक्यार्थवादिनो मीमांसका (१२)। पदार्थवेदिनो वैयाकरणा (१३)। निर्गुणात्मवादिनो द्विविधास्तार्किका श्रौताश्च। तार्किका द्विविधा निरीश्वरा सेश्वराश्च। निरीश्वरा सांख्या (१४)। सेश्वरा पातंजला (१५)। श्रौता अद्वैतवादिन शाङ्करा (१६)।' (स स उपो पृ ८४–८५)

लोकांना अज्ञानापासून परावृत्त करण्यासाठी शास्त्रकार ग्रंथरचना करीत असतात सर्व दर्शनामध्ये शंकराचार्यांचा केवलाद्वैतवाद अथवा अद्वैतवाद श्रेष्ठ आहे, हे दाखविण्यासाठीच माधवाचार्यांनी 'सर्वदर्शनसंग्रह' लिहिला आहे. अनेक रत्न वेगवेगळी पाहिली असता त्यातील कोणते रत्न सर्वश्रेष्ठ आहे, याविषयी सामान्य मनुष्यास संभ्रम पडतो, परन्तु ती रत्न एका माळेत गुंफिली असता त्यातील सर्वश्रेष्ठ रत्न सामान्य मनुष्य निवडून काढू शकतो, तसाच विचारकरून ग्रंथकारानी सर्वदर्शनसंग्रह तयार केला यावरून ग्रंथकाराच्या अलौकिक बुद्धिमत्तेबरोबर त्यांची दयाशील वृत्तिहि दिसून येते असे शास्त्रीबुवा म्हणतात [१७] या ग्रंथसंपादनकार्यावरून शास्त्रीबुवांचेहि बुद्धिमत्ता व दयाशीलता हेच गुण दिसून येतात या ग्रंथाच्या उपोद्घातावरून शांकरदर्शन हे सर्वश्रेष्ठ असून तेच शास्त्रीबुवांना ग्राह्य वाटत होते असे पुन्हा एकदा सिद्ध झाले आहे शास्त्रीबुवा म्हणतात ' एवमाराहत्मेर्णेतरेषा दर्शनानि प्रदर्श्य सर्वात सर्वापेक्षया ज्यायस शाकरदर्शनस्योल्लेख सपादित। (स रा उपोद्घात, पृ ९०)

सर्वदर्शनसंग्रहातील दर्शनमालिकेतील ही सोळा दर्शने वरील क्रमाने गुंफण्यात ग्रंथकाराचा कोणता हेतु असावा हे स्पष्ट करताना शास्त्रीबुवा म्हणतात, "प्रथमत अत्यत स्थूल असे केवळ प्रत्यक्षप्रमाण मानणाऱ्या चार्वाकाचे दर्शन देऊन, नतर अधिकाधिक सूक्ष्म बुद्धीने विचार करणाऱ्या दर्शनकारांची दर्शने ग्रंथकारानी दिली आहेत' [१८] चार्वाकानंतर अनुमान अथवा तर्क मानणारे बौद्धदर्शन दिले आहे बौद्धातहि स्थूलसूक्ष्मक्रमाने माध्यमिक, योगाचार, सौत्रांतिक व वैभाषिक यांची दर्शनें ( हे चार पोटभेद ) दिली आहेत बौद्धमतानुयायी आकाश हे

---

१७ पाहा— स स उपोद्घात, पृ ९४

१८ "तरतदर्शिना बुद्धिसौक्ष्म्यतारतम्यदर्शनादुत्तरोत्तर सूक्ष्मदृष्टीना दर्शनान्यत्र ग्रथितानि।" ( स स उपोद्घात, पृ ८५ )

स्वतंत्र तत्त्व न मानता, पृथिव्यादि चार तत्त्वाचा अभाव म्हणजे आकाश असे मानतात म्हणून त्याच्याशी तुलना करता आकाश हे स्वतंत्र तत्त्व मानणारे जैन अधिक सूक्ष्म दृष्टीचे ठरत असल्यामुळे बौद्धदर्शनानंतर जैनदर्शन दिले आहे हीं सव नास्तिक दर्शन वाली ती शब्द अथवा श्रुति प्रमाण मानत नाहीत त्याच्या मानाने सूक्ष्म ठरणारा आस्तिक दर्शने यानंतर दिली आहेत आस्तिक दर्शने श्रुति प्रमाण मानतात विश्वाचें मूलतत्त्व परोक्ष असल्यामुळे प्रत्यक्ष अथवा त्यावर आधार ठेऊन अनुमान या प्रमाणांनी तें समजणे शक्य नाहीं श्रुतिच त्याचें ज्ञान करून देऊ शकेल अशी त्याची श्रद्धा असते आस्तिक तिहि श्रुतीवर थोडी मन्द विश्वास ठेवणारे अधिक (अमन्द) विश्वास ठेवणारे व अत्यंत दृढ विश्वास ठेवणारे असे भेद पडतात व त्यानुसार उत्तरोत्तर श्रुतीस अधिकाधिक मान देणारी दर्शने ग्रथकारानी दिलीं आहेत आस्तिकामध्ये तर्कास प्राधान्य देणारे ते तार्किक व श्रुतीस प्राधान्य देणारे ते श्रौत होत श्रौतामध्येहि द्वैतवादी व अद्वैतवादी असे भेद पडतात याशिवाय उघड तार्किक व प्रच्छन्न तार्किक आणि उघड द्वैती व प्रच्छन्न द्वैती असेहि भेद पडतात त्यापैकी *प्रच्छन्न तार्किक व प्रच्छन्न द्वैती विपमिश्रित अमृताप्रमाणे अधिक घातुक* होत म्हणजे सर्वदर्शनसंग्रहकारानी प्रच्छन्नतार्किक असून प्रच्छन्नद्वैती असणाऱ्या रामानुजाचार्याचे[19] दर्शन अगोदर सागून त्यानंतर प्रच्छन्नतार्किक पण उघड द्वैती अशा माध्वाचे दर्शन दिले आहे त्यानंतर प्रत्यक्षतार्किकाची दर्शने दिली आहेत त्यातहि श्रुतीवर मन्दतम श्रद्धा बाळगणाऱ्या चार प्रकारच्या माहेश्वराचीं दर्शन अगोदर सांगितली आहेत चार माहेश्वरामध्ये तरतमभाव दिसत नसल्यामुळे त्याच्यामधील क्रमाच्या बाबतीत वस्तुरिच्छा याशिवाय दुसरा उपपत्ति देता येणार नाही असे शास्त्रीबुवा म्हणतात [20] तरीसुद्धा अधिक बारकाईने पाहून शास्त्रीबुवानी त्यामधील नकुलीशपाशुपत शैव प्रत्यभिज्ञा व रसेश्वर हा क्रम कसा सुसंगत आहे हे दाखविले आहे [21] माहेश्वरदर्शनानतर श्रुतीवर मन्दतर श्रद्धा बाळगणाऱ्या वैशेषिक-नैयायिकाची दर्शन दिली आहेत त्यातहि वैशेषिक श्रुतीस अनुमान द्वारा प्रमाण मानतात म्हणून त्याचे दर्शन (दोहापैकी अधिक निकृष्ट म्हणून) अगोदर व नैयायिक श्रुतीस स्वतंत्र प्रमाण मानतात म्हणून त्याचे दर्शन मागाहून सांगितले आहे तथापि नैयायिक पृथिव्यादि पचमहाभूताचे परमाणु नित्य मानतात

---

१९ शोभाव्यात प्रच्छन्नबौद्ध म्हणून शकराचार्यांचा उपहास करणाऱ्या रामानुजास शास्त्रीबुवानी हा उत्तम उलट आहेर केला आहे

२० तत्र क्रमविशेष वस्तुरिच्छैव नियमिका भवति न तु कारणान्तर किंचित। (स स उपो पृ ८८)

२१ पाहा– स स उपो पृ ८८

म्हणून नैयायिकानंतर आकाशाच्या पलीकडील व आकाशाचे कारण असलेले शब्दब्रह्म हें तत्त्व विश्वाचें मूळ कारण आहे असे मानणारे जैमिनीय व पाणिनीय यांची दर्शनें सांगितली आहेत त्यांपैकी व्याकरणाच्या आधारावर स्वतः वाक्यार्थ-विचार करणाऱ्या जैमिनीयांपेक्षा शब्दब्रह्मापासून विवर्तरूपानें जगाची निर्मिति मानणारे पाणिनीय शांकरमतास अधिक जवळचे असल्यामुळे प्रथम जैमिनिदर्शन व नंतर पाणिनिदर्शन ग्रंथकारांनीं सांगितलें आहे यानंतर श्रुतीवर 'श्रद्धा' थेडी बाळगणारी सांख्य-योगदर्शनें दिलीं आहेत त्यांतहि निरीश्वरवादी सांख्यांचे दर्शन अगोदर सांगून ईश्वर मानणारे योगदर्शन अथवा पातंजलदर्शन मागाहून सांगितलें आहे सरते शेवटी सर्वश्रेष्ठ शांकरदर्शन सांगितलें आहे शांकरमतास कोणत्याहि श्रुतिवचनाचा विरोध येत नाही, सर्व श्रुतिवचनांशी जास्तीत जास्त सुसंगत असे शांकरदर्शनाशिवाय दुसरें दर्शन नाही. शंकराचार्यांच्या मताप्रमाणे आत्मा अथवा ब्रह्म हीच एक सत्य वस्तु असून, इतर सर्व वस्तु मिथ्या आहेत तो आत्मा ज्ञानस्वरूप असून, कोणत्याहि शब्दांनीं त्याचे वर्णन करता येत नाही अविद्या अथवा माया ही त्या आत्म्याची शक्ति त्रिगुणात्मक जगाचें मूळकारण आहे अविद्या पारमार्थिक दृष्टीनें सत्य नसल्यामुळें अभावस्वरूपी आहे, परंतु व्यावहारिक दृष्टीनें ती सत्य असल्यामुळे तिला भावस्वरूपीहि समजलें पाहिजे, म्हणूनच तिला 'अनिर्वचनीय' असे म्हणतात ती अनादि असून शुक्तीवर जसा रजताचा आभास होतो, त्याप्रमाणे ब्रह्मावर अविद्येचा–मायेचा–आभास होतो ब्रह्म आणि माया यांच्या खऱ्या स्वरूपाचें हे ज्ञान झाल्यानंतर व त्याचा प्रत्यक्ष अनुभव (साक्षात्कार) घेतल्यानंतर मनुष्य संसारबंधनांतून मुक्त होतो आणि त्याच्या आयुष्याचें सार्थक होते

वरीलप्रमाणे कितीतरी बारकावे सांगूनहि, संक्षिप्त पण निःसंदिग्ध रीतीनें शास्त्रीबुवांनी सर्वदर्शनसंग्रहांतील सोळा दर्शनांचें तौलनिक विवेचन केलें आहे व प्रथम दिलेला दर्शनांचा क्रम कसा सुसंगत आहे, ते दाखविलें आहे या ग्रंथांतील दर्शनांच्या क्रमाची दुसरी उपपत्ति शास्त्रीबुवांनी अशी सांगितली आहे की ग्रंथ-कारांनी शांकरदर्शनास अत्यंत दूर असलेल्या चार्वाकदर्शनापासून प्रारंभ करून, उत्तरोत्तर शांकरमतास अधिकाधिक जवळ असलेली दर्शनें दिलीं आहेत व शेवटी त्यास (ग्रंथकारास) अत्यंताभिमत व सर्वश्रेष्ठ असे शांकरदर्शन दिलें आहे उपोद्घातांतील शास्त्रीबुवांचें हे सर्व विवेचन इतके सुबोध व सुस्पष्ट आहे, की त्यामुळे कोणत्याहि दर्शनाची अगदी बरोबर कल्पना अभ्यासकास येते पंडित पद्माकरशास्त्री बाळशास्त्री क्षीरसागर[२२] म्हणतात, "मी शास्त्रीबुवांचा प्रत्यक्ष

२२ संस्कृत विषयाचे अध्यापक, नू म वि प्रशाला, पुणे २

विद्यार्थी नव्हतो, परंतु कलकत्त्याच्या 'सांख्यतीर्थ' परीक्षेचा अभ्यास करताना, स्वतःला विषयाची नीट समजूत होऊ न शकल्यामुळे मी शास्त्रीबुवांनी संपादन केलेली 'सर्वदर्शनसंग्रहा'ची प्रत मिळविली आणि काय आश्चर्य! त्या ग्रंथातील शास्त्रीबुवांची 'दर्शनांकुर' टीका व विशेषत उपोद्घात यांचा अभ्यास केल्यानंतर मला सर्व विषय अगदी करतलामलकवत् झाला!" विशेषत 'सर्वदर्शनसंग्रहा'चा उपोद्घात ही शास्त्रीबुवांची एक अत्यंत उत्कृष्ट श्रेष्ठकृति (Masterpiece) का मानली जाते, याची थोडी तरी कल्पना या विवेचनावरून येईल

नेहमीप्रमाणे याहि ग्रंथास शास्त्रीबुवांनी सूचीपत्रें जोडली आहेत मूळ ग्रंथ व टीका यामध्ये आलेली श्रुत्यादि ग्रंथातील अवतरणे, ग्रंथ व ग्रंथकार यांची नावे, ग्रंथात आलेले विशेष शब्द इत्यादिकांची वर्णानुक्रमाने नोंद केलेली ही एकूण सात सूचीपत्रें असून, ती इतकी तपशीलवार आहेत की त्यांची पृष्ठसंख्या १७५ आहे! नमुन्यासाठी विशेष शब्दांच्या सूचीपत्रातील 'ईश्वर' शब्द पाहा (पृ ६०२). त्यावरून या ग्रंथात सुमारें ७० ठिकाणी 'ईश्वर शब्द आलेला दिसतो ही सर्व स्थळें या ग्रंथात पाहिल्यानंतर निरनिराळ्या दर्शनकारांची ईश्वरासंबंधी काय मतें आहेत, हे कोणाच्याहि सहज ध्यानात येईल यावरून अभ्यासकांच्या दृष्टीने ग्रंथाची उपयुक्तता वाढविण्यासाठी म्हणजेच पर्यायाने समाजात कल्याणकारक शास्त्रीय ज्ञानाचा प्रसार करण्यासाठी शास्त्रीबुवा किती पराकाष्ठेचे परिश्रम घेत असत, हें दिसून येतें

सर्वदर्शनसंग्रहासारखा अमोलिक ग्रंथ अस्तित्वात असला, तरी शास्त्रीबुवांनी तो सुलभ व सुगम करून पुन्हा उजेडात आणला, या त्यांच्या कामगिरीने संस्कृत शास्त्रीय वाङमय अधिक संपन्न झाले यात मुळीच शंका नाही!

(१५) संस्कारपद्धति ·

शास्त्रीबुवांचे आजोबा भास्करशास्त्री अभ्यंकर यांनी लिहून ठेवलेला 'संस्कारपद्धति' नावाचा प्रबंध पुण्याच्या आनंदाश्रमाने १९२४ साली आपल्या ग्रंथावलीत प्रसिद्ध केला या ग्रंथास वे मू गोपीनाथ गणेश दीक्षित यांनी लिहिलेल्या उपादनाताचीहि जोड दिली आहे शास्त्रीबुवांनी या ग्रंथाचे उपोद्घातासह संपादन केले 'ज्ञानान्मोक्ष' असा सिद्धान्त असला, तरी आयुष्यातील प्रत्येक आश्रमांत मनुष्याने कर्म केलेच पाहिजे अशी वैदिक परंपरा आहे शारीरकभाष्यात 'सर्वापेक्षा च यज्ञादिश्रुतेरश्ववत्' (३ ४ २६) या सूत्राने मोक्षसाधन जें ज्ञान, त्यालाहि अग्न्याधानादि कर्मांची आवश्यकता प्रतिपादिली आहे तसेच, शंभर वर्षांपूर्वीच्या काळात कर्मकाण्डाला फार महत्त्व होतें, म्हणून भास्करशास्त्र्यांनी हा ग्रंथ लिहिला

व धर्मनिष्ठ शास्त्रीबुवांनी पितृऋण फेडण्यासाठी या ग्रंथाचे संपादन केले, हे योग्यच होतें.

(१६) न्यायकोश :

'न्यायकोशा'ची सुधारून वाढविलेली तिसरी आवृत्ति हें शास्त्रीबुवांचे एक महत्त्वाचे कार्य होय ही आवृत्ति भांडारकर प्राच्यविद्यासंशोधन मंदिराने १९२८ साली 'बॉम्बे संस्कृत सीरिज' मध्ये प्रसिद्ध केली या न्यायकोशाची पहिली आवृत्ति १८७४ साली एल्फिन्स्टन कॉलेजमधील संस्कृतचे प्राध्यापक म म भीमाचार्य झळकीकर यांनी डॉ ब्यूलर व डॉ कील्हॉर्न यांच्या सूचनेवरून तयार केली हा कोश संस्कृतांत असून, गौतमाचीं न्यायसूत्रें, गदाधरी आणि न्यायशास्त्रावरील इतर काही ग्रंथ यावर तो आधारलेला आहे तत्वज्ञानावरील ग्रंथांतच नव्हे, तर मीमांसा, व्याकरण वगैरे इतर शास्त्रांतील ग्रंथांतहि न्यायशास्त्रांतील पारिभाषिक शब्द वारंवार येतात व त्यांचा नीट अर्थ समजल्याशिवाय त्या शास्त्रीय ग्रंथांचे रहस्य ध्यानांत येत नाही, म्हणून लेखकाने हा न्यायकोश तयार केला या पहिल्या आवृत्तीचे अभ्यासकांनी चांगलें स्वागत केले

पहिली आवृत्ति लवकर संपल्यामुळे दुसरी आवृत्ति काढण्याचे काम म म. भीमाचार्य झळकीकर यांच्यावरच सोंपविण्यात आले त्यांनी या कामास सन १८८६ मध्ये सुरुवात करून सतत परिश्रम करून १८९३ मध्ये ते पूर्ण केले पहिल्या आवृत्तींत फक्त ४०० शब्द होते, पण या दुसऱ्या आवृत्तींत ही शब्दसंख्या १८९४ झाली व पृष्ठसंख्या २६७ वरून १००० वर गेली[1] या न्यायकोशाच्या तिसऱ्या आवृत्तीचे काम शास्त्रीबुवांवर सोंपविण्यांत आले या तिसऱ्या आवृत्तीची शब्दसंख्या तर २५६२ झाली आहे[1] ज्या ग्रंथांतून या कोशात पारिभाषिक शब्द घेतले आहेत, त्यांची संख्या १७२ आहे ते ग्रंथ, त्यांचे लेखक, लेखनकाल इत्यादिविषयीं माहिती देणारा तक्ता या आवृत्तींत जोडण्यात आला आहे न्यायशास्त्रावरील विशेष शब्दांबरोबरच भट्टि नैषध, शिशुपालवध, कुमारसंभव, रघुवंश या काव्यग्रंथांत आढळणारे विशेष शब्द आणि महाभारत, स्मृति, पुराणें इत्यादि ग्रंथांतील उपयुक्त पंक्ति यांचाहि संग्रह या आवृत्तींत करण्यात आला आहे अनेक ठिकाणीं या ग्रंथांतील पूर्वीची भाषा दुर्बोध होती, ती बदलून शास्त्रीबुवांनी सुबोध केली आहे

या आवृत्तीला शास्त्रीबुवांनी जोडलेला उपोद्घात फार मार्मिक आहे एखाद्या भाषेचे व्याकरण होण्यापूर्वी ज्याप्रमाणे त्या भाषेचा पुष्कळ विस्तार होणे आवश्यक असतें, त्याप्रमाणे एखाद्या शास्त्रांतील पारिभाषिक शब्दांचा कोश होण्यापूर्वी त्या

शास्त्राची ग्रथसपदा भरपूर असणे आवश्यक असतें आकरग्रथ, परिभाषा, वृत्ति, टीका, भाष्य इत्यादि रूपानी त्या शास्त्राची जेव्हा खूप वाढ होते, तेव्हा कोशाची आवश्यकता निर्माण होते, कारण शब्दाचे अर्थ हळूहळू बदलत जातात व शास्त्र-ग्रथाची उपस्थितिहि कमी होत जाते

पूर्वी इतर शास्त्रावरोबर न्यायशास्त्रातील तर्कदीपिका मुक्तावली, चिन्तामणि वगैरे प्राथमिक ग्रथाच्या अध्ययनामुळे कोशाची गरज लागत नसे, सव विद्या कठगत असे इतकेच नव्हे तर प्राचीन पडिताना कोशग्रथाविषयी फारसा आदरहि वाटत नसे परतु हल्ली विद्यार्थ्यांचे स्वत च्या शास्त्राचे अध्ययन पूर्ण नसत, त्यामुळे कोणत्याहि शास्त्राचा अभ्यास करताना कोश वारवार उघडून पाहावा लागतो म्हणून न्यायकोशाच्या तिसऱ्या आवृत्तीचे सपादन करून शास्त्रीबुवानी एक महत्त्वाची वाङमयीन कामगिरी बजावली यात शका नाही

(१७) सिद्धान्तबिन्दु

१९२८ साली शास्त्रीबुवानी मधुसूदनसरस्वतीचा 'सिद्धान्तबिन्दु हा ग्रथ सपादित करून त्यावर आपली 'बिन्दुप्रपात नावाची टीका लिहिली भाडारकर प्राच्यविद्यासशोधन मदिरातर्फे हा ग्रथ सटीक प्रसिद्ध झाला नुकतेच १९६२ साली या ग्रथाचे पुनर्मुद्रणहि झाले आहे ग्रथास जोडलेल्या लहानशा प्रस्तावनेत या ग्रथाकडे आपण कसे वळलो हे सागताना शास्त्रीबुवा म्हणतात या जगात बहुधा सर्व प्राणी सुख मिळविण्यासाठी व दु ख नष्ट करण्यासाठी धडपड करताना दिसतात तथापि जोपर्यंत प्राणी शरीरधारी आहे तोपर्यंत त्याची दु खापासून मुक्तता होणे अशक्य आहे म्हणून प्राण्यास शरीर प्राप्त होण्याचे मूळ कारण कोणते आणि आत्मा व शरीर (चेतन व अचेतन) याचा सबध कशा प्रकारचा आहे याविषयी विचार करणे आवश्यक आहे परतु माझ्यासारख्यास स्वतत्रपणे या प्रश्नाचे उत्तर शोधून काढणे अशक्य असल्यामुळे प्रथितयश थोर पडितानी परोपकारबुद्धीने वेदान्तशास्त्रावर जे ग्रथ लिहिले आहेत त्याचे मी अवलोकन करू लागलो योगायोग असा की श्रीशकराचार्यांच्या दशश्लोकी वर पडित मधुसूदनसरस्वतीनी[२३] लिहिलेला 'सिद्धान्तबिन्दु हा टीकाग्रथ माझ्या नजरेस

२३ मधुसूदनसरस्वतीविषयी फारशी निश्चित माहिती उपलब्ध नाही तथापि ते सतराव्या शतकाच्या उत्तरार्धात होऊन गेले त्याच्या गुरूचे नाव 'विश्वेश्वर' असे होते आणि सिद्धान्तबिन्दु अद्वैतसिद्धि महिम्नस्तोत्रटीका, भगवद्गीतेवरील गूढार्थदीपिका, व सक्षेपशारीरावरील सारसग्रह हे त्याचे ग्रथ प्रसिद्ध आहेत, एवढे त्याच्यासबधी म्हणता येईल

पडला हा ग्रंथ आपल्या मनाचे समाधान करण्यास समर्थ आहे असे ध्यानात घेताच मी तो मागून घेण्याचा प्रयत्न केला आणि त्याचें रहस्य जिज्ञासूसमोर मांडण्याच्या हेतूने मी त्यावर टीका लिहिण्याचा विचार केला श्रीशंकराचार्यांच्या कृपेने ती टीका शेवटास गेली आहे" म्हणजे मुमुक्षूंना ब्रह्मानंदाचा—परमार्थाचा—मार्ग दाखविण्याच्या हेतूने शास्त्रीबुवा या ग्रंथाकडे वळले, हे उघड आहे.

नेहमीप्रमाणे शास्त्रीबुवांनी या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रति मिळविण्याचा प्रयत्न सुरू केला त्यांना केवळ 'दशश्लोकी'ची एक प्रत व 'सिद्धान्तबिन्दु' टीकेसह दशश्लोकीच्या नऊ प्रति, अशा एकूण दहा प्रति मिळाल्या त्या सर्वांचा विचार करून, पाठभेद निश्चित करून, जरूर तेथे तळटीपेंत अन्य पाठभेद देऊन शास्त्रीबुवांनी हा ग्रंथ संपादित केला आहे प्रा काशीनाथपंतांनी या ग्रंथास २८ पृष्ठांचा 'उपोद्घात' जोडला आहे त्यामध्ये त्यांनी अद्वैत तत्त्वज्ञानाचा उदय, विकास, स्वरूप व पोटभेद याविषयी चर्चा करून, मायावादाचे आद्य पुरस्कर्ते गौडपादाचार्य, त्यांचे प्रशिष्य श्रीमच्छंकराचार्य, त्यांच्यानंतर होऊन गेलेले टीकाकार, सिद्धान्तबिन्दुकर्ते मधुसूदनसरस्वती व शास्त्रीबुवांची 'बिन्दुप्रपात' टीका याविषयी थोडक्यात पण उद्बोधक चर्चा केली आहे

साक्षात् 'विश्वेश्वर' व 'विश्वगुरु' जे भगवान् शंकराचार्य, त्यांनी सर्व जीवांचा उद्धार करण्याच्या इच्छेने नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा परब्रह्मस्वरूपी जीवात्म्याचे थोडक्यात पण निःसंदिग्ध ज्ञान करून देण्यासाठी आपली 'दशश्लोकी' रचली मायावादाचा पुरस्कार करून व सांख्य, मीमांसक, जैन, बौद्ध इत्यादि परमतांचे खंडन करून श्रुतिप्रतिपादित केवलाद्वैताची प्रस्थापना करणाऱ्या आपल्या मताचे सार त्यांनी या केवळ दहा श्लोकांत आणले आहे म्हणून शांकरमत सूत्ररूपाने ध्यानात ठेवण्यास ही 'दशश्लोकी' फारच उपयुक्त आहे मधुसूदनसरस्वतींनीसुद्धा आपल्या बलभद्र नावाच्या शिष्याच्या विनवणीवरून, संपूर्ण वेदान्तशास्त्र श्रवण करण्याची फुरसत नसलेल्या लोकांसाठी याच दशश्लोकीची निवड करून तिच्यावर आपली 'सिद्धान्तबिन्दु' नावाची टीका लिहिली या टीकेविषयी शास्त्रीबुवा म्हणतात ' मायावादरूपी वृक्षाची मुळें वेदामध्ये खोल रुजली आहेत बादरायणाचार्यांच्या वेदान्तसूत्रांमुळे त्या मुळांस अंकुर फुटले, श्रीशंकराचार्यांच्या शारीरभाष्यामुळे त्या अंकुरापासून एक महान् वृक्ष निर्माण झाला, यानंतरचार सुरेश्वराचार्य व इतर अध्यात्मशास्त्रनिपुण मुनि यांच्यामुळे त्या वृक्षास जलसिंचन मिळून सुंदर फुले आली, विद्यारण्यमहामुनींनी आपल्या 'पञ्चदशी' सारख्या ग्रंथांत त्या विविध फुलांतील गंध —वेदान्ततात्पर्य—गोळा करून ठेवला आणि शेवटी मग मधुसूदनसरस्वतींनी जिज्ञासूंच्या हितासाठी या

तो सत्य आहे, ही गोष्ट तर्काने सिद्ध करण्यासाठी मधुसूदनसरस्वतींनी ज्या केवळ पाच ओळी दिल्या आहेत, त्याचे स्पष्टीकरण करण्यासाठी शास्त्रीबुवांनी सहा पृष्ठें चर्चा घातलीं आहेत (पृ १२८ ते १३३) त्यामध्ये "दृग्दृश्यान्वयव्यतिरेके साक्षिसाक्ष्यान्वयव्यतिरेक । आगमापायितदवध्यन्वयव्यतिरेक ।" इत्यादि न्यायघटित वाक्याचे शास्त्रीबुवांनी केलेले स्पष्टीकरण पाहण्यासारखें आहे त्यावरून अवघड विषयहि सोप्या व निःसंदिग्ध रीतीनें उलगडून सांगण्याची शास्त्रीबुवांची हातोटी आपल्या ध्यानात येते 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' (तै २।१।१) या वाक्यावरून निष्कृष्ट निर्विशेष ब्रह्माचा बोध होतो, हे सांगण्यासाठी त्यांनी केलेले विवेचन जवळजवळ एका पृष्ठाइतकें विस्तृत आहे (पृ ४) 'अर्थवाद' या एका शब्दाचेहि विवेचन इतकेंच विस्तृत आहे (पृ ७९–८०) मूळ ग्रंथातील विषय स्पष्ट करण्यासाठी शास्त्रीबुवांनी सुमारे तीस ग्रंथांतील अवतरणें (अर्थातच अत्यावश्यक असलेली) दिलीं आहेत विवेचन करताना कित्येक ठिकाणी पूर्वापर संदर्भ स्पष्ट केला आहे, तर अनेक ठिकाणी विवरण करून झालेल्या विषयाचे थोडक्यात संकलन करून मग पुढील विषयाकडे शास्त्रीबुवा वळले आहेत थोडक्यात म्हणजे अभ्यासकास गुरूच्या मदतीशिवाय मूळ ग्रंथ समजावा, अशा हेतूने सर्व कठिण स्थळांचे विशेष स्पष्टीकरण करणारी शास्त्रीबुवांची ही टीका असल्यामुळे तिची उपयुक्तता पटवून देण्याची आवश्यकता नाही ही टीका मूळ ग्रंथाच्या तिपटीइतकी विस्तृत झाली आहे शंकराचार्यांच्या दशश्लोकीतील पहिला व आठवा हे श्लोक विशेष महत्त्वाचे असून, त्यासाठी या ग्रंथातील एकूण १५४ पृष्ठांपैकी अनुक्रमें ५६ व ५४ पृष्ठें चर्चा पडलीं आहेत ! जिज्ञासूसाठी आत्मानात्मस्वरूपाचें विवेचन करणारा हा टीकाग्रंथ लिहिण्यात शास्त्रीबुवांची अध्यात्मनिष्ठा स्पष्टपणे दिसून येते

— — —

सन १९२८ मध्ये वयाच्या ६७ व्या वर्षी शास्त्रीबुवा फर्ग्युसन कॉलेजमधून सेवानिवृत्त झाले १८९० साली ते पुण्यात आले होते अडतीस वर्षांच्या या दीर्घ काळात संस्कृत पाठशाळेतील व फर्ग्युसन कॉलेजमधील आपलें अध्यापनाचें कार्य करीत असताना, मुख्यत त्या अध्यापनाच्या अनुषंगानें व काही नैमित्तिक कारणामुळे त्यांनी कसकसें मौलिक वाङ्मयीन कार्य करून दाखविलें, याचें वर्णन आतापर्यंत केलें वाङ्मयीन कार्य हेंच त्यांच्या आयुष्यातील प्रमुख कार्य होय, परंतु तें करीत असताना याच काळात त्यांचें प्रापंचिक जीवन कसें चालू होतें, त्यातहि त्यांनी कोणती कामगिरी करून दाखविली, ती पाहणें उद्बोधक ठरेल. शास्त्रीय ज्ञानोपासना चालू असताना शास्त्रीबुवांनी आपली प्रापंचिक जबाबदारी कशी सांभाळली हें पाहणें सामान्य मनुष्याच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचें आहे

* * *

# ८ : प्रापंचिक जीवन

*विद्योपासनेत—अध्ययन, अध्यापन व लेखन यातच*—शास्त्रीबुवा आपले जन्म-साफल्य मानीत असल्यामुळे प्रापंचिक गोष्टींकडे त्यांनी विशेष लक्ष दिले नाही, यात काही आश्चर्य नाही. तथापि त्यामध्येहि अगदी प्रारम्भापासून त्यांनी ठरविलेले धोरण व वागण्यातील पद्धति नजरेसमोर पाहण्यासारखी आहे

मनुष्याच्या आर्थिक प्राप्तीवर त्याचे प्रापंचिक जीवन मुख्यत अवलंबून असते हे सांगणे नकोच सर्वसामान्य मनुष्याच्या आयुष्यात लहानमोठया अडचणी नित्य येत असतात आणि त्यापैकी बऱ्याचशा आर्थिक असतात तथापि त्या सर्वास तोंड देऊन अनेक प्रकारच्या जबाबदाऱ्या त्याला सांभाळाव्या लागतात आणि यातच त्याच्या खऱ्या कौशल्याची व व्यक्तिमत्त्वाची पारख होत असते " सामान्य गोष्टी-सुद्धा असामान्य रीतीने करून दाखविण्यात मनुष्याचा थोरपणा दिसून येतो" अशा *अर्थाचे एक आप्त वचन*[१] आहे *शास्त्रीबुवांच्या प्रापंचिक जीवनात हा थोरपणा* निश्चनपणे आपणास आढळतो, कारण शक्यता असताहि ते कधी संपत्तीच्या मागे लागलेले दिसत नाहीत, इतकेच नव्हे तर द्रव्यलाभाच्या उत्तम संधी चालून आल्या असताहि त्यांनी आपला ध्येयवाद सोडला नाही, यात शंका नाही नामदार गोखले व रँग्लर परांजपे यासारख्या फर्ग्युसन कॉलेजमधील अत्यंत थोर चालकमंडळीचा शास्त्रीबुवांच्या मनावर विशेष परिणाम झाला होता दरमहा पाचशे ते एक हजार रुपये पगाराची मानाची सरकारी नोकरी चालून आली असता व संस्थेने ती पत्करण्याची परवानगी दिली असताहि, रँग्लर परांजपे केवळ पंचाहत्तर रुपये पगारावर फर्ग्युसन कॉलेजमध्ये अध्यापनाचे कार्य करीत राहिले, पैशासाठी संस्थेच्या आजीवसदस्यत्वाचा त्यांनी त्याग केला नाही, हा ध्येयवाद शास्त्रीबुवांच्याहि अन्तःकरणात घर करून राहिला होता! संस्कृत पंडित म्हणून ते ख्यातनाम *झाल्यावर, कलकत्ता येथील संस्कृत कॉलेजचे दरमहा ३०० रुपये पगारावर* प्राचार्यपद स्वीकारण्याची त्यास आग्रहपूर्वक विनंती केली असता त्यांनी ती मान्य *केली नाही तसेच, मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये, निदान पुण्याच्याच डेक्कन* कॉलेजमध्ये, दरमहा शंभर रुपये पगारावर संस्कृत शास्त्री म्हणून काम करण्या-विषयी डॉ भांडारकरांनी त्यास पृच्छा केली होती, परंतु शास्त्रीबुवांनी आपला निश्चय बदलला नाही ही त्यांची त्यागवृत्ति व संस्थेवरील निष्ठा यामुळे फर्ग्युसन

---

१ " Greatness lies in doing common things uncommonly well "

कॉलेजमध्ये त्यास सर्व्हेच्या आजीव सदस्याप्रमाणे मान दिला जात असे १९२८ साली ते सेवानिवृत्त झाले त्या वेळी त्यास दरमहा ७५ रुपये पगार मिळत होता व महागाई तीस रुपये मिळत असे सेवानिवृत्त झाल्यानतर, याच वेतनावर घरी येणाऱ्या विद्यार्थ्यांस शिकविण्याविषयी त्यास सर्व्हेकडून विनती करण्यात आली, परतु वेतन न घताच आपण विद्यार्थ्यास शिकविण्याचे काम करू असे त्यानी सागितले व त्याप्रमाणे शवटपर्यंत ह त्याच अध्यापनाचे काम चालू होते सस्थेनेहि त्यास इतर आजीव सदस्याप्रमाणे आमरण निम्मा वेतनाएवढे (दरमहा साडेबावन्न रुपये) पेन्शन चालू ठवले होते, या एकाच गोष्टीवरून त्याचा ध्येयवाद कोणाच्याहि ध्यानात येईल

इतर ठिकाणच्या नोकऱ्याप्रमाणेच, विद्यार्थ्यांच्या खासगी शिकवण्याहि त्यानी कधी पतकरल्या नाहीत कधी कधी त्या काळातील विशेष अर्थप्राप्तीच्या म्हणजे दरमहा पचवीस रुपयाच्याहि शिकवण्या त्याच्याकडे आल्या होत्या, परतु हा शुद्ध विद्याविक्रय आहे अशी त्याची धारणा असल्यामुळे या मोहात ते कधी सापडले नाहीत तसेच केवळ पैसा मिळविण्यासाठी त्यानी विद्यार्थ्यांकरिता मार्गदर्शक पुस्तके लिहिली नाहीत, कारण यातहि विद्याविक्रय होतो व आपल्या विद्येचे तेज लुप्त होते असे त्यास वाटे म्हणून मागे वर्णिल्याप्रमाणे ग्रथसपादन लेखनाचे काय अत्यत परिश्रमपूर्वक अखडितपणे चालू ठवून त्यानिमित्त मिळालेल्या द्रव्याचा त्यानी स्वीकार केलेला असला, तरी या सर्व वाङ्मयकार्याच्या मागे विद्याभिवृद्धि हा त्याचा प्रमुख हेतु होता असे सिद्ध होते अशा प्रकार ध्येयवादाचा अगीकार करून विद्योपासना आचरीत असताना 'अनुत्सृज्य सता वर्त्म' जेवढ द्रव्य सपादन करता आले तेवढेच करून शास्त्रीबुवानी आपली प्रापचिक जबाबदारी पार पाडली, इतकेच नव्हे तर आपल्या धर्मनिष्ठेस व कर्तव्यतत्परतेस साजेसे वर्तन कसे ठेवले ते पाहण्यासारखे आहे

सस्कृत पाठशाळेत शास्त्रीबुवाना दरमहा दहा रुपये वेतन मिळत असे व हळूहळू ते ३५ रुपयापर्यंत वाढत गेले तसेच फर्ग्युसन कॉलेजमधील त्याचे एकूण वेतन दरमहा चाळीस रुपयापासून १०५ रुपयापर्यंत वाढत गेले याचा अर्थ सन १८९० ते १९२८ या काळात त्याना सरासरी दरमहा शभर रुपये मिळत होते याशिवाय मुख्यत वाङ्मयकार्यापासून त्यास काही अवातर प्राप्तिहि होत असे म्हणजे त्या काळाच्या मानाने त्याची प्राप्ति बऱ्यापैकी होती तथापि पूर्वीच्या दारिद्र्याची भरपाई करण्यासाठी अथवा स्वाभाविक हौस म्हणून त्या पैशाचा चैन करण्याकडे अथवा वाटेल तसा, विनियोग त्यानी कधीहि केला नाही

पुण्यास आल्यानतर जो पहिला दहा रुपये पगार त्यास मिळाला त्यातील काही भाग सातारला त्यानी पाठविला व तेव्हापासून जवळजवळ अविच्छिन्नपणे

दरमहा दहा रुपयापर्यंत काही रक्कम ते सातारला आपल्या मातुश्रींकडे अथवा वडील बधूकडे पाठवीत असत याशिवाय दावाहि वडील बधूच्या मुलामुलींच्या विशेषत लग्नकार्यात ते मदत हाताने नित्य मदत करीत असत सातारचे स्वकष्टो-पार्जित घर शाबूत राखण्यासाठी त्यावर पत्र घाउण्याचे कामहि त्यानी हळूहळू पूर्ण करून टाकले साधनशुचिता राखून मिळाल्या सपत्तीमधून स्वत वो गर्व प्रापचिक जबाबदारी सांभाळून त्यानी आपल्या एकत्र कुटुबासाठी एवढेच कार्य केले आहे, तरीसुद्धा ते प्रशसनीय ठरले असत, परंतु याहिपुढे जाऊन, अगदी प्रारभापासून त्यानी आपल्या धर्मादाय कार्यासाठी एक विशेष आर्थिक योजना आखली होती व ती मोठ्या कसोशीने अमलात आणली होती ही योजना अशी की आपल्या पगारातीलच नव्हे, तर कोणत्याहि प्राप्तीमधील आठव्या हिश्श्याएवढी रक्कम ते धर्मकार्यासाठी बाजूस काढून ठेवीत असत एक रुपाया जरी मिळाला, तरी त्यातील दोन आणे ते त्या धर्मकार्याच्या गगाजळीत टाकीत असत त्यामुळे कोणतेहि धर्म-कार्य करण्याचे मनात आणताच त्याना पैशाची अडचण कधीच भासली नाही

धर्मकृत्ये

१९०४ साली आपल्या मातुश्रींच्या इच्छेनुसार त्यानी एकत्र कुटुबातील सर्व मडळी व शिष्य अशी एकूण वीस माणसे बरोबर घेऊन, बैलगाडीने प्रवास करून श्रीक्षेत्र परशुरामाची यात्रा केली हे ठिकाण कोकणात चिपळूणजवळ असून परशुराम हे अभ्यकराचे कुलदैवत आहे आपल्या धर्मकार्यनिधीतून शास्त्रीबुवानी केलेला हा पहिला मोठा खर्च होय यानतर मातुश्रींच्याच इच्छेनुसार १९१२ साली आपल्या कुटुबीयासह त्यानी त्रिस्थळी यात्रा केली व यामुळ यात्रा करण्याची त्याची प्रवृत्ति जागी झाली, पुढे त्यानी ज्या तीर्थयात्रा केल्या त्यातील बीज हे आहे स्वतःच्या धर्मादाय निधीमुळे मातुश्रींनी असा एखादा धर्मकार्याची गोष्ट काढताच नकार देण्याची त्याच्यावर कधी पाळी आली नाही मातुश्रींसाठी त्यानी केलेले एक विशेष मोठे धर्मकार्य म्हणजे सातारा येथे पार पाडलेले सहस्रभोजन हे होय १९१८ साली शास्त्रीबुवाच्या एकत्र कुटुबातील सर्व मडळी सातारला जमली होती व त्यानी मोठ्या उत्साहाने परिश्रम घेऊन हे धर्मकृत्य पार पाडले, यासाठी शास्त्रीबुवाना दक्षिणेसह एकूण आठशे रुपये खर्च आला।

"त्यानतर त्यानी बारा ज्योतिर्लिंगापैकी बदरीकेदार व श्रीशैल्यमल्लिकार्जुन या यात्रा कठीण व आपणास असाध्य म्हणून सोडून देऊन सोमेश्वर, रामेश्वर, अमलेश्वर, महाकालेश्वर, त्र्यबकेश्वर, भीमाशकर, नागेश्वर, घृसृणेश्वर, वैद्यनाथ या ज्योति-लिंगाचे दर्शन घेतले याशिवाय द्वारका, हरिद्वार, मथुरा, वृदावन, गोकर्णमहाबळेश्वर, डाकोर, पढरपूर व क्षेत्र महाबळेश्वर या ठिकाणीहि जाऊन त्यानी देवदर्शन घेतले"

( प्र ख प ४५ ) व तेथे आवश्यक ती सर्व धर्मकृत्यें केलीं अशा प्रकारे अत्यंत काटेकोरपणे गंगाजळी ठेवण्याची शास्त्रीबुवांची योजना धार्मिक अथवा सामाजिक कार्य करू इच्छिणाऱ्या कोणीहि सामान्य मनुष्यानें अमलांत आणण्याजोगी आहे.

नित्य काटकसरीने वागून स्वत च्या प्रपंचांतील इतर नैमित्तिक खर्चासाठीहि शास्त्रीबुवा काही ना काही रक्कम शिल्लक ठेवण्याचा प्रयत्न करीत असत. त्यामुळे शभर-दोनशें रुपये त्यांच्याजवळ नेहमीच घरी बाजूस काढून ठेवलेले असत; अकस्मात् उपस्थित झालेल्या जादा खर्चाची तोंडमिळवणी या शिलकेतून त्यांस करता येई, कोणाहिजवळ पैशासाठी याचना करण्याची त्यांस पाळी येत नसे.

पुण्यात घर

१८९३ सालीं न्या महादेव गोविंद रानडे पुण्याहून मुंबईस बदलून गेल्यावर शास्त्रीबुवांनी त्यांच्या घरातील आपली खोली सोडली व भाऊमहाराजांच्या बोळात श्री गणपतराव जोशी यांच्या घरात ते माडीवरची खोली घेऊन राहू लागले. त्यानंतर चार-पाच ठिकाणी त्यांनी आपली बिऱ्हाडाची जागा बदलली होती शास्त्रीबुवांना एकंदर पाच-सहा अपत्यें झाली परंतु त्यापैकी दोन मुलांखेरीज बाकीचीं लहानपणीच दिवंगत झाली हे दोन मुलगे म्हणजे त्यांचे थोरले चिरंजीव म म प्रा काशीनाथपंत (जन्म दिनांक ७ ऑगस्ट १८९०) व द्वितीय चिरंजीव श्री गंगाधरपंत (जन्म जून १८९४मध्ये) हे होत १९१३ साली प्रा काशीनाथ-पंत यांची गुजरात कॉलेज, अहमदाबाद येथे संस्कृताध्यापक म्हणून नेमणूक झाल्या-नंतर शास्त्रीबुवांची आर्थिक शिल्लक अर्थातच वाढू लागली. १९१७ साली त्यांस दरमहा १८ रुपये घरभाडें भरावे लागत असे म्हणून तेव्हापासून ते एखादे घर विकत घेण्याच्या विचारात होते, १९१९ साली हा योग जुळून आला सध्या सदाशिव पेठेंत प्रा. काशीनाथपंत राहत असलेले कॉमनवेल्थ कंपनीच्या शेजारचे घर त्या मालकास विकावयाचें होतें त्यांनी आपण होऊन शास्त्रीबुवांस ते विकत घेण्याविषयी विनंती केली तेव्हा उभय पक्षांच्या हिताचा विचार करून, त्या घराचा दोनतृतीयांश भाग शास्त्रीबुवांनी आपली सर्व पुंजी खर्च करून ५६०० रुपयांस विकत घेतला। पुढें १९३८ साली त्या घराचा उरलेला एकतृतीयांश भागहि त्यांनी ७२०० रुपयांस विकत घेतला व तें संपूर्ण घर शास्त्रीबुवांच्या मालकीचे झाले. पैशाच्या मुळींच मागें न लागता, सर्व प्रकारचे नित्य नैमित्तिक इत्यादि खर्च करून पुण्यासारख्या शहरात शास्त्रीबुवांनी स्वत.चें घर संपादन केलें, ही गोष्ट त्यांस भूषणास्पद आहे, हें कोण मान्य करणार नाही? पुढे त्या घराच्या दुरुस्तीसाठी अथवा नवीन बांधकामासाठी वारंवार खर्च करताना, शास्त्रीबुवांनी कोणाकडून एकहि पैसा कर्जाऊ न काढता स्वत जवळ असेल तेवढ्याच रकमेंतून तो

सर्व भागविण्यात धोरण अत्यंत निष्ठुरपणे पाळल्यामुळे भयवर आर्थिक अडचणीत सापडून मन गानता गमावून बसण्याचा प्रसंग त्यांच्यावर कधी आला नाही व त्यांच्या मुख्य वाङ्मयीन कार्यांत विघ्न निर्माण झाले नाही

विद्योपासक हीच शास्त्रीबुवांची मुख्य भूमिका असल्यामुळे वर सांगितल्याप्रमाणे महत्त्वाच्या प्रापंचिक गोष्टींकडे त्यांनी कसोशीने लक्ष पुरविले असले तरी बारीकसारीक गोष्टींस त्यांनी फारसे महत्त्व दिले नाही बाजारहाट करणे यासारख्या गोष्टी प्रथमत त्यांचे सहाध्यायी त्यांच्यासाठी करीत आणि पुढे हे काम त्यांच्या शिष्यांनी पतकरले व अत्यंत मनापासून पार पाडले प्रथम प महादेवशास्त्री जोशी, नंतर केशवशास्त्री महाबळेश्वरकर व शेवटी गणेशशास्त्री गोडबोले या त्यांच्या प्रथितयश शिष्यमंडळींनी प्रत्येकी १२–१५ वर्षे अगदी घरच्या माणसाप्रमाणे या बाबतींत त्यांस मदत केली शास्त्रीबुवा प्रवासास गेले असताना हे शिष्य त्यांच्या बरोबर असत व त्यांची सेवा करीत शास्त्रीबुवांच्या उतारवयात त्यांचे दोन्ही पुत्र परगावी असल्यामुळे, गणेशशास्त्री गोडबोले यांनी त्यांची जी सेवा केली, ती दोघांहि गुरुशिष्यांस अत्यंत भूषणास्पद आहे। १८९७ साली, शास्त्रीबुवा दोवडध्याच्या बोळात चिपळूणकरांच्या वाड्यात राहत असताना तेथे जवळच राहणारे दामोदरशास्त्री साठे त्यांच्याकडे सध्याकाळी गप्पा मारण्यासाठी येत त्या वेळी शास्त्रीबुवांचा नित्याचा स्तोत्रपाठ उरकलेला असे दामोदरशास्त्री शास्त्रीबुवांपेक्षा सुमारे पधरा वर्षांनी वडील असले तरी 'समानशीलव्यसन' असल्यामुळे त्यांच्यामध्ये मैत्री जडली होती बरोबरीच्या नात्याने ते शास्त्रीय विषयावर चर्चा करीत व अनेक लहानमोठ्या प्रापंचिक गोष्टींबद्दल विचार विनिमयहि करीत दामोदरशास्त्र्यांच्या निधनानंतर ( सन १८९७ ) शास्त्रीबुवांची अन्य कोणाशी विशेष मैत्री कोणाशी जडली नाही म्हणून त प्रापंचिक बाबतींत आपल्या शिष्यमंडळींशीच विचारविनिमय करीत या बाबतीत गणेशशास्त्री गोडबोले त्यांचे उजवे हात होते असे म्हणण्यास हरकत नाही

' महामहोपाध्याय' पदवी व इतर सन्मान

या कालखंडातील शास्त्रीबुवांच्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वाची घटना म्हणजे ब्रिटिश सरकारकडून त्यांस महामहोपाध्याय पदवीचा लाभ झाला हा होय भरतखंडामध्ये हा सन्मान्य पदवी शास्त्रीय ग्रंथ निर्माण करणाऱ्या त्याच अध्यापन करणाऱ्या अथवा हा उभयविध कामगिरी करणाऱ्या अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या पंडितांस आचार्यपीठाकडून अथवा राज्यकर्त्यांकडून देण्याची वहिवाट अनेक शतके चालू आहे ब्रिटिश अमदानीत १८८७ साली महाराणी व्हिक्टोरियाच्या राज्यारोहण ज्युबिलीच्या निमित्ताने ब्रिटिश राज्यकर्त्यांनी हा महामहोपाध्याय

पदवी प्रथम विद्वद्वर्य गंगाधरशास्त्री तेलंग यास दिली त्यानंतर नित्यानंद पर्वतीय, दामोदरशास्त्री भारद्वाज, गंगानाथ झा, तात्याशास्त्री पटवर्धन, सौराष्ट्रातील हाथीभाईशास्त्री, पुण्यातील भीमाचार्य झळकीकर व भटजीशास्त्री घाटे यास ही पदवी मिळाली शास्त्रीबुवासहि ब्रिटिश सरकारकडून १९२१ साली ही पदवी मिळाली! त्यामुळे त्याच्या लोकमान्य विद्वत्तेस राजमान्यता मिळून ते अखिल भारतात ख्यातनाम पंडित झाले

मुंबई विश्वविद्यालयाने १८९८ साली एम् ए परिक्षेच्या 'झाला वेदान्त प्राइज पेपर' साठी परीक्षक म्हणून शास्त्रीबुवाची नेमणूक केली व सतत सोळा वर्षे ते त्या विषयाचे परीक्षक होते तसेच, जुन्या तऱ्हेने प्राच्य विद्या शिकविणाऱ्या पंडित व मौलवी याना वार्षिक वेतन देण्याचे सरकारने काही वर्षे चालू केले होते त्यामध्ये शास्त्रीबुवाचा क्रमांक पहिला होता!

कॉलेजमधून सेवानिवृत्त

सन १९२८ मध्ये वयाची ६५ वर्षे पूर्ण झाल्यामुळे शास्त्रीबुवा फर्ग्युसन कॉलेजमधून सेवानिवृत्त झाले त्या वेळी त्याच्या एका शिष्याने म्हटले आहे, 'पुनरपि नय विद्यादेवो भवेद् गुरुरीदृश '[२] ("देवाप्रमाणे विद्येची उपासना करणारे अशा प्रकारचे गुरुवर्य पुन्हा कसे मिळणार?") त्या वेळच्या फर्ग्युसन व विलिंग्डन कॉलेज त्रैमासिकाच्या संपादकानी आपल्या संपादकीय निवेदनात शास्त्रीबुवासबंधी पुढील उद्गार काढले आहेत[३] — 'हे ए सोसायटीची आपली सुमारे ३५ वर्षांची दीर्घकालीन व वैशिष्ट्यपूर्ण सेवा संपवून म म वासुदेव शास्त्री अभ्यंकर निवृत्त होत आहेत त्याच्या चरणाजवळ अध्ययन करण्याचे भाग्य ज्याना लाभले, अशा त्याच्या सहकाऱ्याना व आजी-माजी विद्यार्थ्यांना यापुढे कितीतरी वर्षे त्याची अनुपस्थिति जाणवल्याशिवाय राहणार नाही

२ फर्ग्यु त्रै जुलै १९२८

३ 'Mahamahopadhyaya Vasudeoshastri Abhyankar retires after a long and distinguished service of about thirtyfive years of the Deccan Education Society His absence will be felt for years to come by his colleagues and past and present students who had the privilege of learning at his feet Even when there were big classes to listen to his lucid exposition of the Sanskrit texts it was more as a professor of professors that he had become a valuable asset to the Fergusson Coellege"

संस्कृत पाठ्यपुस्तकावरील त्याची सुबोध प्रवचने ऐकण्यासाठी जरी विद्यार्थ्यांची गर्दी होत असे, तरी प्राध्यापकांचे प्राध्यापक या नात्यानेच फर्ग्युसन कॉलेजला त्यांच्यापासून मिळणारा फायदा अधिक महत्त्वाचा होता!"

असं सांगतात की शास्त्रीबुवा सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांच्या जागी दुसऱ्या एखाद्या शास्त्रीबुवाची संस्कृत विषय शिकविण्यासाठी कॉलेजमध्ये नेमणूक करण्याविषयी कॉन्सिलच्या चालकांस काही आजीव सदस्यांनी विनंती केली असता चालकमंडळींचें असें मत पडले की वासुदेवशास्त्र्यांच्या तोडीच (विद्वत्ता व व्यक्तिमत्त्व या दोन्ही दृष्टींनी) एखादे शास्त्रीबुवा असल्यास त्यांची नेमणूक करण्यास हरकत नाही परंतु तसे शास्त्री मिळू न शकल्यामुळे शास्त्रीबुवांच्या नंतर कोणाहि शास्त्र्याची फर्ग्युसन कॉलेजमध्यें नेमणूक झाली नाही

वस्तुत ५५ वर्षें पूर्ण, हे भारतातील सेवानिवृत्तीचें वय सर्वमान्य आहे शास्त्रीबुवा तर वयाची ६५ वर्षे अविरत कार्य करून फर्ग्युसन कॉलेजमधून निवृत्त झाले होते! तरीसुद्धा मनाने कार्यनिवृत्त होण्यास ते तयार नव्हते म्हणून सेवानिवृत्तीनंतरहि त्यांनी आपले वाङमयीन कार्य चालूच ठेवले–एवढेंच नव्हे तर या खरोखरीच्या वृद्धापकाळातहि त्यांनी जगामध्ये अद्वितीय ठरलेले एक वाङमयीन कार्य संपन्न दाखविले!

* * *

# ९ : वाङ्मयीन कार्य – उत्तरार्ध (१९२९–१९४२)

'प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा ' :

"आपणाजवळ असलेली एखाद्याची ठेव त्याच्याकडे परत केल्यानंतर ज्याप्रमाणे मन शांत निश्चित होते, त्याप्रमाणे आज माझे अंतःकरण अत्यंत शांत व निश्चित झाले आहे" हे कण्वमुनींच्या तोंडी कविकुलगुरु कालिदासाने घातलेले उद्गार आपणास एका अत्यंत श्रेष्ठ मानवी अंतःकरणाची ओळख करून देतात. आपल्या शिष्यावरोबर शकुंतलेची पतीच्या घरी पाठवणी करून दिल्यानंतर तिच्या विवाहाच्या काळजीतून मुक्त झालेल्या कण्व ऋषींनी शेवटी सुटकेचा निःश्वास सोडताना हे उद्गार काढले आहेत. वस्तुतः शकुंतला ही कण्व ऋषींची मानलेली मुलगी. अरण्यात एका झाडाखाली त्यांना ती सापडली आणि परमेश्वराने ही ठेव आपणाजवळ ठेवली आहे अशा श्रद्धेने त्यांनी तिचे पालनपोषण केले. स्वतः तपस्वी असूनहि तिच्याविषयी स्वतःच्या मुलीसारखें त्यास प्रेम वाटू लागले व या अपत्यनिर्विशेष प्रेमामुळेच अनुरूप वराकडे तिची रवानगी केल्यानंतर त्यास हायसे वाटले! केवढें हें श्रद्धापूर्ण आणि प्रेमळ असे थोर अंतःकरण! १९३८ सालच्या आपल्या भाषणात संपूर्ण व्याकरण-महाभाष्याचे मराठी भाषांतर (छापील पृष्ठसंख्या सुमारे ३०००) डे. ए. सोसायटीच्या चालकांच्या स्वाधीन करताना शास्त्रीबुवांनी "जातो ममाऽयं विशदः प्रकामं प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा" याच कालिदासोक्तीची आपणास उत्कट स्मृति होत आहे, असें म्हटले आहे. कुलक्रमागत आलेली व्याकरणविद्या ही जणू परमेश्वराने आपणाजवळ ठेवलेली ठेव असून ती पर्यायाने महाराष्ट्रजनतेच्या स्वाधीन करून आपण निश्चित झालो, असे त्यास म्हणावयाचे आहे! तसेंच, डे. ए. सोसायटीने आपणास पेन्शन दिले —वस्तुतः पगार घेऊन शिकविण्यातहि विद्याविक्रयाचे थोडेसें पाप लागते अशी शास्त्रीबुवांची धारणा होती!—त्या उपकाराची परतफेड करण्यासाठी हें व्याकरण–महाभाष्याचे प्रचंड भाषांतर शास्त्रीबुवांनी त्या संस्थेच्या स्वाधीन केले आणि आत्मसमाधान मिळविले, असाहि त्यांच्या म्हणण्याचा अर्थ होतो. त्या प्रसंगी आपल्या भाषणात अशा अर्थाचे उद्गारहि त्यांनी काढले आहेत. शास्त्रीबुवांची ही कर्तव्यतत्परता व कृतज्ञता पाहून थक्क होऊन जातों आपण!

वयाची पासष्ट वर्षे उलटल्यानंतर मनुष्य खरोखरच वृद्ध होतो, हें कोण अमान्य करील? तथापि तशाहि परिस्थितीत सेवानिवृत्तीनंतर व्याकरण–महाभाष्याच्या कार्यास सुरुवात जारीने करून, मिळेल तेवढा सर्व वेळ त्याचे भाषांतर–कार्याकडे

देऊन त्यानी त अपत प्रचड व अवघड–सरोवरच दुर्गम–कार्य एकट्याने तडीस नले। सेवानिवृत्तीनतरची दहा वर्षे त्याना या कार्यासाठी खर्च करावी लागली!

तथापि हें महत् कार्य चालू असताना त्यानी जी इतरहि वाङ्मयीन कार्ये अगोदर तडीस नेली, याचा परिचय आपणास अगोदर करून घेतला पाहिजे अर्थातच ही कार्ये पुरतनीच्या वेळी वरमणुकीवरावर हातून काही सत्कार्य घडावे या हतूने त्यानी केली आहेत, त्यांच्या प्रयत्नाना सव मर व्याकरण-महाभाष्याच्या मराठी अनुवादावरच होता ह ध्यानात ठेवले पाहिजे

(१७) धमतत्त्वनिर्णय

१९२९ साली 'धमतत्त्वनिणय (पृष्ठसंख्या १११) हा शास्त्रीबुवानी लिहिलेला ग्रथ आनदाश्रम मस्थेतर्फे प्रसिद्ध झाला धार्मिक व सामाजिक बाबतीत सुधारणा इच्छिणाऱ्या महात्मा फुले, न्यायमूर्ति रानडे, डॉ भाडारकर, प्रि आगरकर इत्यादि थोर लोकानी जे प्रयत्न केले, त्यामुळे बाल-विवाह, पुनर्विवाह विधवाचे केशवपन आतर्जातीय व आतर्वर्णीय विवाह, घटस्फोट इत्यादि बाबतीत समाजामध्य जोराचे विचारमथन सुरू झाले या सव प्रश्नावर मुळ धर्मशास्त्रात काय सागितले आहे, हें अधिकृत रीत्या लोकासमोर यावे, म्हणून आनदाश्रमाच्या चालकाच्या इच्छेनुसार शास्त्रीबुवानी हा ग्रथ लिहिला आहे अर्थातच या ग्रथामध्ये शास्त्रीबुवाची वैयक्तिक मते त्यास माडावयाची नसून, श्रुतिस्मृत्यादि धर्मग्रथानी या प्रश्नाचा केलेला निर्णय सागावयाचा होता म्हणून सनातनी मतानुसार श्रुतिस्मृतिप्रामाण्य मानून त्यानी या सर्व प्रश्नाचा विचार केलेला आहे शास्त्रीबुवा स्वत पूर्ण सनातनी होते ही गोष्टहि अगदी खरी आहे त्यामुळे धर्मातील परिवर्तनवाद त्यास मान्य नव्हता तथापि आपली मत दुसऱ्यानी मानलीच पाहिजेत असा त्याचा आग्रह नव्हता उघडपणे श्रुति-प्रामाण्य न मानणारे जे लोक सामाजिक राजकीय आर्थिक इत्यादि कारणामुळे सनातनी मतास विरोध करीत होते, ते निदान प्रामाणिक असल्यामुळे त्याच्याविरुद्ध शास्त्रीबुवानी फारशी टीका केलेली नाही, परतु जे लोक म वादि स्मृति आपण प्रमाण मानतो असे एकीकडे म्हणतात, आणि दुसरीकडे कशीतरी शब्दाची ओढाताण करून स्मृतिग्रथाचा अर्थ आपणास अनुकूल असा जे बदलू पाहतात तेच परि-वर्तनवादी लोक धर्माचे खरे शत्रु आहेत, असे शास्त्रीबुवानी प्रतिपादन केले आहे, कारण हे लोक अप्रामाणिक असून इतराची दिशाभूल करून त्याच्या श्रद्धेचा गैरफायदा घेतात, असे त्याचे म्हणणे आहे सारांश प्रच्छन्न शत्रूपेक्षा उघड शत्रु बरा, असे त्यास वाटत!

(१८) 'कुण्डार्कोदया' टीकेसह कुण्डार्क

'कुण्डार्क कुण्डार्कोदयाभिधटीकासवलित' (पृष्ठसख्या ३६) हा ग्रथ शास्त्रीबुवानी १९३१ साली प्रसिद्ध केला कुण्डार्क हा ग्रथ छन्दोवद्ध असून, त्यात फक्त पधरा श्लोक आहेत, परन्तु ते परिभाषायुक्त असल्यामुळे समजण्यास कठीण आहेत ते नीट ध्यानात येण्यासाठी गणिताचे, विशेषत भूमितीचे, ज्ञान असणेहि आवश्यक आहे लेखकाने स्वत च नाव शकर व पित्याचे नाव नीलकठ असे दिले आहे वडिलापासून मिळालेल्या साम्प्रदायिक विद्येनुसार आपण ही माहिती दिली आहे असेहि त्याने म्हटले आहे, परन्तु स्वत च्या स्थलकालाचा त्याने मुळीच निर्देश केलेला नाही

या ग्रथात यज्ञयागप्रसगी उपयोगात येणाऱ्या विविध कुडाच्या आकृति व परिमाणे दिली आहेत मात्र त्या सर्वांचे वर्णन केवळ शाब्दिक आहे शास्त्रीबुवानी या पधरा श्लोकाची फोड उत्तम प्रकारे केली आहे त्याच्या सप्रमाण रेखात्मक आकृतिहि शास्त्रीबुवानी कागदावर तयार केलेल्या त्याच्या हस्तलिखित सग्रहात अद्याप आढळतात परतु छपाईचा खर्च वाढण्याच्या भीतीने या ग्रथात प्रकाशकानी त्या छापल्या नाहीत! श्लोकातील अर्थाच्या स्पष्टीकरणासाठी शास्त्रीबुवानी या ग्रथाला स्वत ची 'कुण्डार्कोदया' ही सुबोध टीकाहि जोडली आहे वस्तुत हा मुख्यत भूमितीचा विषय असल्यामुळे शास्त्रीबुवानी त्यात आपली पारगतता सिद्ध केली हे मोठे आश्चर्य आहे 'न कश्चित् धीमता अविषयो नाम।' (बुद्धिमतास अगम्य असे काहीच नसते!) असे म्हणतात ते अगदी खरे आहे!

(१९) 'प्रभा' टीकेसह मीमासान्यायप्रकाश

मीमासान्यायप्रकाश प्रभाख्यया व्याख्यया समेत' (पृष्ठसख्या ३००) हा ग्रथ शास्त्रीबुवानी सन १९३७ मध्ये प्रसिद्ध केला सतराव्या शतकात होऊन गेलेल्या आपदेवाने हा लिहिला असल्यामुळे यास आपदेवी असेहि म्हणतात नावावरूनच हा ग्रथ मीमासाशास्त्रावर आहे हे उघड दिसते केवळ 'मीमासा' शब्द 'पूर्वमीमासा' शब्दाचा वाचक आहे मीमासाशास्त्रात धर्माचा विचार केला आहे 'धर्म म्हणजे वेदाने कर्तव्य म्हणून सागितलेला अर्थ' असे मीमासक मानतात ( वेदेन कर्तव्यतया बोधितोऽर्थ ) अर्थनिर्णयासाठी मीमासकानी आपली पञ्चावयवात्मक पद्धति ठरविली आहे आणि त्या पद्धतीने ते वेदवाक्याचाच नव्हे तर स्मृत्यादि ग्रथाचाहि अर्थ करतात मीमासासूत्राचे आद्य प्रणेते आचार्य जैमिनि होत त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या आचार्यांनी रचलेली मीमासासूत्रे व कल्पसूत्रे आणि प्रतिपादिलेले न्याय, याचा स्वीकार करून व सर्व मत्रब्राह्मणग्रथाचा विचार करून जैमिनीनी ही मीमासासूत्रे रचिली आहेत श्रौतयागाच्या निर्वचनाला उपयुक्त

असे सर्व न्याय त्यांनी या सूत्रात एकत्र केले आहेत या सूत्रग्रंथाचे एकूण बारा अध्याय आहेत

हीं मीमांसासूत्रें दुर्बोध झाल्यामुळे उपवर्ष, हरि, भर्तृमित्र इत्यादींनी त्यावर वृत्ति लिहिल्या व शबरस्वामींनी विस्तृत भाष्य लिहिलें तेंच 'शाबरभाष्य' म्हणून सुप्रसिद्ध आहे हे भाष्य नसतें तर सूत्रांचा अर्थच लागला नसता असे म्हणतात शाबरभाष्यांतील विवेचन स्पष्ट होण्यासाठी वार्तिकें आणि टीकाग्रंथ झाले त्यामध्ये 'भाट्टमत' व 'प्राभाकरमत, असे दोन मतप्रणाली निर्माण झाल्या त्यांपैकी भाट्टमताचे प्रवर्तक कुमारिलभट्ट यांनी जैन, बौद्ध इत्यादि प्रतिवाद्यांच्या हल्ल्यास यशस्वी रीतीनें तोंड देऊन मीमांसामार्गाचें —कर्ममार्गाचें— रक्षण केलें शाबरभाष्याला अनुसरून त्यांनी श्लोकवार्तिक, तन्त्रवार्तिक व टुप्टीका अशा खण्डत्रयात्मक वार्तिकांत परमताचें खंडन केले व स्वमताचें मंडन करून वैदिक धर्मकाण्ड जिवंत ठेवलें सारांश, आचार्य जैमिनींनी मीमांसाशास्त्र तयार केलें, तर कुमारिलभट्टांनी त्यास दर्शनपदवीची योग्यता प्राप्त करून दिली। प्राभाकरमताचे प्रवर्तक प्रभाकरगुरु हे कुमारिलभट्टांचेच शिष्य होते त्यांनी शाबरभाष्यावर 'बृहट्टीका' नावाचा ग्रंथ लिहिला या दोन मतांमध्ये जीवस्वरूपनिर्णय, अभावस्वरूप, अर्थापत्ति इत्यादींच्या निरूपणांत भिन्नता आहे

यानंतरच्या काळातहि मीमांसाशास्त्रावर अनेक पांडित्यपूर्ण ग्रंथ झाले, तथापि विजयनगरचें हिंदु राज्य नष्ट झाल्यानंतर दक्षिणेंत आकरग्रंथांची अध्ययनाध्यापन-परंपरा लुप्त झाली व त्या ग्रंथांचें थोडक्यात विवेचन करणारे ग्रंथ मीमांसाशास्त्रांतहि निर्माण होऊं लागले आपदेवाचा मीमांसान्यायप्रकाश हा प्रस्तुत ग्रंथ अशाच प्रकारचा एक अधिकरणग्रंथ आहे त्यांतील सर्व विवेचन पांडित्यपूर्ण असून श्रुतिस्मृत्यादि वोधत्वाहि ग्रंथांतील वाक्यार्थनिर्णयास अत्यंत उपयुक्त आहे हें सांगणें नकोच हा उपयुक्त ग्रंथ सुगम होण्यासाठी शास्त्रीबुवांनी त्यावर 'प्रभा' नावाची टीका लिहून ती या ग्रंथाबरोबर प्रसिद्ध केली आहे

या टीकेंत जैमिनिसूत्रें, श्लोकवार्तिक तंत्रवार्तिक, न्यायसुधा इत्यादि प्राचीन ग्रंथांतील अवतरणांचा मार्मिक उलगडा अत्यंत सोप्या शब्दांत केला आहे आप देवाच्या ग्रंथांत शास्त्रार्थाच्या दृष्टीनें अतिदुर्बोध भाग म्हणजे 'सोमेन यजेत' या विधीचा सर्वस्व ऊहापोह होय शास्त्रीबुवांनी आपल्या टीकेंत हा भाग प्रसन्न भाषेंत शास्त्रीय विवेचनाला यत्किंचित् धक्का न लावता अगदीं गंगाजलाप्रमाणे पारदर्शक करून सोडला आहे। तसेच या ग्रंथास वीसबावीस पृष्ठांची विद्वत्तापूर्ण प्रस्तावना त्यांनी जोडली आहे त्यामध्ये त्यांनी इतिहासपद्धति व मीमांसापद्धति यांची तुलना करून मीमांसापद्धतीचें शास्त्रीयत्व, प्रामाण्य व निर्दोषत्व सिद्ध केलें आहे

या ग्रंथावरून अर्थातच मीमांसेसारख्या एका गहन विषयावरील शास्त्रीबुवांचे प्रभुत्व सिद्ध होते हा ग्रंथ म्हणजे त्यांच्या विद्वत्तेचा एक चमत्कार पैलू आहे असे म्हणण्यास मुळीच हरकत नाही नेहमीप्रमाणे या ग्रंथाला अत्यंत तपशीलवार अनुक्रमणिका शास्त्रीबुवांनी दिली असल्यामुळे वाचताना व्यवधान मुळीच सुटत नाही ग्रंथाच्या शेवटी दिलेली सूचीहि अत्यंत उपयुक्त आहे

### (२०) 'अद्वैताङ्कुर' टीकेसह श्रीमद्भगवद्गीता—अध्याय १ व २

'श्रीमद्भगवद्गीताया प्रथमद्वितीयाध्यायौ अद्वैताङ्कुरटीकासवलितौ' (पृष्ठसंख्या १९७) हा शास्त्रीबुवांचा ग्रंथ 'आनंदाश्रमग्रन्थावली' मध्ये १९३८ साली प्रकाशित झाला भगवद्गीतेवर आतापर्यंत कितीतरी प्राचीन व अर्वाचीन पंडितांनी संस्कृतात व मराठीत (पद्यात व गद्यात) टीकाग्रंथ लिहिले असून त्यांपैकी काही अत्यंत प्रसिद्ध, लोकप्रिय व वंदनीय झाले आहेत संस्कृतातील श्रीमच्छंकराचार्यांचे गीताभाष्य, ज्ञानेश्वरांची ज्ञानेश्वरी अथवा भावार्थदीपिका, लोकमान्यांचे गीतारहस्य यासारखे टीकाग्रंथ तर अजूनहि नित्य अभ्यासिले जातात!

शास्त्रीबुवांनी आपल्या अद्वैताङ्कुर नावाच्या संस्कृत टीकेसह भगवद्गीतेचे केवळ पहिले दोन अध्याय या ग्रंथात प्रसिद्ध केले आहेत शास्त्रीबुवांचे शिष्य व दा म पाठकशास्त्री मारुलकर यांनी हा ग्रंथ संपादित केला असून, त्यास वीस पृष्ठांची एक विद्वत्तापूर्ण प्रस्तावनाहि जोडली आहे या ग्रंथाच्या सुरुवातीस शास्त्रीबुवांनी २३ पृष्ठांची 'पूर्वपीठिका' लिहिली असून, तिच्यामध्ये साररूपाने गीताग्रंथाचे तात्पर्य सांगितले आहे त्यानंतर ६७ पृष्ठांमध्ये श्लोकशः स्वतःच्या टीकेसह गीतेचे पहिले दोन अध्याय त्यांनी दिले आहेत व नंतर १०७ पृष्ठांमध्ये या पहिल्या दोन अध्यायांतील वेदान्तविवेचनाच्या निमित्ताने एकंदर गीताग्रंथातील तत्त्वज्ञानाची चर्चा केली आहे भगवद्गीतेच्या संपूर्ण १८ अध्यायांवर शास्त्रीबुवांनी आपली टीका का प्रसिद्ध केली नाही, असा प्रश्न वाचकांच्या मनात निर्माण होणे स्वाभाविक आहे तशी संपूर्ण गीताग्रंथावर त्यांची टीका असती, तर ती फार उपयुक्त व उद्बोधक ठरली असती, यातहि शंका नाही, परंतु केवळ पहिल्या दोन अध्यायांवर शास्त्रीबुवांनी हा टीकाग्रंथ का लिहिला, याविषयी काहीसे समाधानकारक उत्तर देण्यासारखे आहे पहिली गोष्ट म्हणजे वयाच्या ७५ व्या वर्षी शास्त्रीबुवांनी हा ग्रंथ लिहावयास घेतला होता व याच पद्धतीने साधकबाधक चर्चेसह संपूर्ण गीतेवरील त्यांचा टीकाग्रंथ १००० पृष्ठांपेक्षा कमी त्यास झाला नसता शरीराच्या व मनाच्या शक्तींना विकल अवस्थेत हे प्रचंड कार्य आपल्या हातून तडीस जाईल, असे त्यास वाटत नसावे दुसरी गोष्ट म्हणजे याहि वेळी इतर ग्रंथलेखनाचे त्यांचे कार्य चालू असल्यामुळे या कामाकडे त्यास आपला

सर्व वेळ देता आला नाही तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे गीतेतील सर्व वेदान्त विषय दुसऱ्या अध्यायात बीजरूपाने आला असल्यामुळे,[१] त्याविषयी विवेचन करताना संपूर्ण गीताग्रंथाचे प्रतिपाद्य त्यास साररूपाने सांगता आले, अर्थातच या दृष्टीने गीतेच्या उरलेल्या १६ अध्यायातील प्रतिपाद्य विषय जवळजवळ गतार्थ झाला, असे म्हणण्यास हरकत नाही

लोकांस गीताग्रंथाचे महत्त्व पटवून देऊन, स्वत स पटलेलें गीतेचे तात्पर्य त्याच्यापुढे विशद करून मांडावे व अगदी सामान्य मनुष्यास व्यावहारिक सूचना देऊन मोक्षमार्गाचे दिग्दर्शन करावे याच हेतूने शास्त्रीबुवानी वेळात वेळ काढून हा उद्योग केलेला दिसतो प्रेमळ माता आपल्या रुग्ण बालकास शर्करावगुंठित औषध देऊन त्यास आरोग्यसंपन्न करते, त्याप्रमाणे 'जगज्जननी भगवद्गीतेने समरांगणात गुरफटून गेलेल्या समाधी लोकांस निष्काम कर्मयोगाचा उपदेश करून चित्तशुद्धीचा मार्ग सांगितला आहे व त्याची इच्छा नसताहि त्यास मोक्षाधिकार प्राप्त करून दिला आहे, असं शास्त्रीबुवानी 'पूर्वपीठिके त म्हटले आहे (पृष्ठें १३ १४) अर्जुनाचा बुद्धिभ्रंश दूर करण्यासाठी भगवान् श्रीकृष्णांनी त्यास आत्म्याचे अथवा परब्रह्माचें परोक्ष ज्ञान करून दिले आणि त्या वेळी अर्थातच अपरोक्ष ब्रह्मज्ञान (ब्रह्मसाक्षात्कार) त्यास झाले नसल्यामुळे क्षत्रियधर्माप्रमाणे परंतु समबुद्धि ठेवून युद्ध करण्याचा त्यास उपदेश केला त्यामुळे चित्तशुद्धि होऊन तो मोक्षमार्गाचा अधिकारी होईल व मग ज्ञानी लोकाकडून परमार्थज्ञान झाल्यानतर ('उपदेक्ष्यन्ति ते ज्ञान ज्ञानिनस्तत्त्वदर्शिन ' गीता ४. ३४) त्यास मोक्ष प्राप्त होईल असी श्रीकृष्णांनी त्याची खात्री पटवून दिल्यामुळे तो युद्धास तयार झाला अशा प्रकारे गीतेमध्ये ज्ञानयोग मुख्यत सांगितला असून त्यामुळ गीतेच्या उपक्रमोपसहारास मुळीच बाध येत नाही असे शास्त्रीबुवाच्या विवेचनाचे सार आहे एकदरीत गीतेमध्ये श्रीशंकराचार्यप्रणीत केवलाद्वैतसिद्धान्त - ज्ञानमार्ग - सांगितला आहे असे त्याचें मत आहे अपरोक्ष ब्रह्मज्ञानानतर ज्ञानी मनुष्याच्या हातून कर्मे घडताना दिसली तरी ती तो मुद्दाम करीत नाही, कारण चित्तशुद्धीसाठी कर्मयोगाचें आचरण करावयाचें असते व त्याची चित्तशुद्धि अगोदरच झालेली असते, लोकसंग्रहासाठीहि तो कर्म करीत नाही, कारण त्याच्या ठिकाणी कोणताच हेतु अथवा वासना शिल्लक राहिलेली नसते तसेच तो स्वत कर्मसंन्यास करीत नाही, तर मनुष्य निद्राधीन होत असताना ज्याप्रमाणे त्याची कर्मे आपोआप बंद पडतात, त्याप्रमाणे त्या ज्ञानी मनुष्यास कर्मे आपोआप सोडून जातात'—अशा प्रकारे शास्त्रीबुवानी आपली मते निर्भीडपणे मांडली असल्यामुळे ते खरोखरच प्रशसेस पात्र आहेत

१ 'तत्र च सूत्रीभूतो द्वितीयोऽध्याय इति प्रसिद्धमेव' असे शास्त्रीबुवानी स्वत च म्हटले आहे (पृ १)

श्लोकावरील टीका लिहिताना त्यांनी ज्ञानेश्वरीचा भरपूर आधार घेतला आहे पहिल्या श्लोकावरील टीकेच्या प्रारंभीं ते म्हणतात, "अथ भावार्थदीपिकानुसारेण व्याख्यायते।"[२] (पृ २४), यावरून त्यांच्या 'अद्वैताङ्कुर' टीकेचा रोख कोणाच्याहि सहज ध्यानात येईल खडनमडनात्मक पद्धतीने आपला सिद्धान्तपक्ष निःसदिग्धपणे सिद्ध करण्यात शास्त्रीबुवांची सूक्ष्म बुद्धिमत्ता व पाण्डित्य जागोजाग दिसून येते 'तमुवाच हृषीकेश प्रहसन्निव भारत ' या दुसऱ्या अध्यायातील दहाव्या श्लोकावरील शास्त्रीबुवांचें बावीस पृष्ठांचें विवेचन (पृ ४५ ते ६७) या दृष्टीने खरोखर पाहण्यासारखें आहे पहिल्या अध्यायात आलेल्या विषयाचे विभाग कसकसे पडतात त सागून त्याविषयी त्यांनी केलेला ऊहापोह तर्कशुद्ध आहे ह सागण नकोच जिज्ञासूनीं हें सर्व विवेचन शास्त्रीबुवांच्या मूळ ग्रथातून पाहणे आवश्यक आहे मनाची विषयासक्ति ही ससारवृक्षाचें मूळ असून, तीच मोक्षमार्गात दुर्लंघ्य अडथळा निर्माण करते त्या विषयासक्तीपासून मनाला मुक्त करण्यासाठी शास्त्रीबुवांनी विवेचनाच्या ओघात ज्या व्यवहार्य सूचना केल्या आहेत, त्या कोणासहि मार्गदर्शक ठरतील, शास्त्रीबुवा म्हणतात लहानमुलाप्रमाणे 'इंद्रियाचा विषयाकडे (उपभोग्य पदार्थांकडे) स्वाभाविकपणे जबरदस्त ओढा असता तो पूर्णपणे नष्ट करणे शक्य नाहीं म्हणून त्या विषयाचे प्रथमत फक्त क्षेत्र बदलणे पाहिजे प्रथमत आपल्या मनात मद्य, मास इत्यादि धर्मनिषिद्ध वस्तूविषयीं तिटकारा निर्माण होईल व दूध इत्यादि धर्मसमत वस्तूविषयी आकर्षण निर्माण होईल असे केले पाहिजे त्यानतर प्रयत्नसाध्य वस्तूऐवजी अनायास प्राप्त होणाऱ्या धर्मसमत वस्तूविषयी इंद्रियाच्या ठिकाणी आवड निर्माण केली पाहिजे नतर ही आवड अथवा आसक्तिहि हळूहळू नष्ट करून इंद्रियें व विषय याचा केवळ सर्वसामान्य (निर्विकार) सबध प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला पाहिजे म्हणजेच चित्तास समाधान प्राप्त होऊन तें दृढमूल होईल'[३]—यासारखें सामान्य मनुष्यास उद्बोधक विवेचन शास्त्रीबुवांनी केले असल्यामुळे या ग्रथाची उपयुक्तता निःसशय वाढली आहे

२ पृ ६८ वर हेच वाक्य आहे 'इदच अत्र 'ज्ञानदेव प्रबन्धयति (पृ ४४) असा इतरत्रहि ज्ञानेश्वराचा उल्लेख शास्त्रीबुवांनी केला आहे

३ 'बालस्थानीयानामिन्द्रियाणा या विषयासक्तिस्तामप्रत्याख्यायैव तदविरोधेन प्रथमत केवल विषयपरिवर्तन कार्यम्। मद्यमासादयो ये निषिद्धा विषयास्तान् दूरीकृत्य पयआदिष्वनिषिद्धविषयेष्विंद्रियासक्ति प्रथमत स्थापनीया। तत प्रयत्नसाध्यान् विषयान् प्रयत्नरूपदोषप्रदर्शनेन दूरीकृत्यानायाससाध्येषु यादृच्छिकेषु विषयेष्विंद्रियासक्ति प्रस्थापनीया। ततस्तत्राप्यासक्तिपूर्वकत्व दूरीकृत्य सामान्यतो विषयेंद्रियसबध प्रस्थापनीय । ततश्चित्तस्य समाधान दृढतर भवेत्।—" (पृ १८८)

सारांश, हा ग्रंथ म्हणजे गीताशास्त्रावरील एक छोटासा प्रबंध आहे, असं म्हणता येईल त्यावरून शास्त्रीबुवांची लोकहितबुद्धि स्पष्टपणे दिसून येते

या ग्रंथात आलेल्या सर्व विषयाची अत्यंत विस्तृत अनुक्रमणिका पृष्ठ व पंक्ति यांच्या निर्देशासह ग्रंथारंभी दिली असून, शेवटी नेहमीप्रमाणे या ग्रंथात उद्धृत केलेल्या अवतरणाची वर्णानुक्रमाने सूची दिली आहे यामुळे ग्रंथाची उपयुक्तता अर्थातच अधिक वाढली आहे

(२१) व्याकरण महाभाष्य— मराठी अनुवाद

शास्त्रीबुवांच्या वाङमयातच नव्हे, तर सर्व जगातील बोलभाषातील व्याकरणविषयक शास्त्रीय वाङ्मयात अद्वितीय ठरलेला शास्त्रीबुवांचा ग्रंथराज म्हणजे पतंजलि महर्षींच्या संस्कृत 'व्याकरण–महाभाष्याचा मराठी अनुवाद' हा होय केवळ 'अनवाद अथवा 'भाषांतर' या शब्दानें प्रथमदर्शनीच या ग्रंथाविषयी एखाद्याच्या अंतःकरणात उपेक्षाबुद्धि निर्माण होणे शक्य आहे, परंतु मराठीशिवाय हिंदी बंगाली, इंग्रजी, जर्मन, इत्यादि कोणत्याहि भारतीय अथवा परदेशी भाषेंत दुसऱ्या कोणी केलेले संपूर्ण व्याकरण–महाभाष्याचें भाषांतर अजूनहि उपलब्ध नाही, या एकाच गोष्टीवरून या ग्रंथाची मौलिकता आपल्या ध्यानात येईल। मूळ संस्कृत व्याकरण-महाभाष्याची थोरवी कोणास समजली नाही अथवा त्याच्या भाषांतराकडे कोणाचें लक्ष गेले नाही, असेंहि नव्हे सुमारें पन्नास वर्षांपूर्वी इंग्रजीमध्ये व्याकरण–महाभाष्याचें भाषांतर करण्याचा प्रयत्न करण्यात आला परंतु पहिल्या आह्निकापलीकडे या भाषांतराची मजल गेली नाही जर्मन भाषेंतीलहि या ग्रंथाच्या भाषांतराचें काम पहिल्या आह्निकाच्या पलीकडे जाऊ शकले नाही सुमारें तीस वर्षांपूर्वी लाहोर येथें या ग्रंथाच्या पहिल्या दोन आह्निकाचें हिंदी भाषेंत भाषांतर झाल्याचें एकिवात आहे[४] अलीकडे गेल्या दहा वर्षांत अन्नमलाई विद्यापीठाचे डॉ पी एस् सुब्रह्मण्यशास्त्री यानी इंग्रजीमध्ये या ग्रंथाच्या केवळ दोन अध्यायाचं[५] भाषांतर केले आहे। यावरून या ग्रंथाची मौलिकता कळूनहि त्याचें भाषांतर करणे ही गोष्ट फार अवघड असल्यामुळेच आतापर्यंत दुसऱ्या कोणास तो साधली नाही, हे उघड दिसून येते। शास्त्रीबुवांच्यामुळे हे दुर्मिळ भाग्य मराठी माणस लाभले, यात नाय संशय ?

काही ग्रंथाची जन्मकथासुद्धा त्याच्या थोरवीत केवढी मोठी भर घालते। लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्याची जन्मकथा कारागृहातील श्रीकृष्णजन्माइतकी

---

४ हिंदी भाषेंत अगदी अलीकडे शास्त्रीबुवांच्याच मराठी ग्रंथाच्या आधारे महाभाष्याची नवाह्निकी छापली डे ए सोसायटीने प्रकाशित केली आहे

५ व्याकरण–महाभाष्याचे एकूण आठ अध्याय आहेत

रोमांचकारक वाटते। शास्त्रीबुवांच्या व्याकरण-महाभाष्याच्या भाषांतराची कथाहि अशीच अद्भुत आहे। वयाच्या ६५ व्या वर्षी फर्ग्युसन कॉलेजमधून सेवानिवृत्त झाल्यानंतर शास्त्रीबुवांनी या ग्रंथाच्या लेखनास प्रारंभ केला ६५ व्या वर्षापर्यंत सुमारे चार तपें संस्कृत पाठशाळा व फर्ग्युसन कॉलेज या दोन्हीं ठिकाणी अध्यापनाचे अतिशय जबाबदारीचे काम केल्यानंतर व त्याच वेळी आतापर्यंत वर्णन केल्याप्रमाणे ग्रंथसंपादन-लेखनाचेहि अतिशय परिश्रमाचें अखंड कार्य केल्यानंतर शास्त्रीबुवांनी सेवानिवृत्त झाल्यावर संपूर्ण विश्रांति घेतली असती, तरी कोणासहि आश्चर्य वाटलें नसतें, परन्तु सेवानिवृत्त होताच, जणू नवीन जोमानें त्यांनी या प्रचंड कार्यास हात घातला। अनेक वर्षें व्याकरणशास्त्राचें अध्ययनाध्यापन केल्यानंतर या अतिशय कठीण ग्रंथाचा टीपांसह अनुवाद करण्याचें सामर्थ्य आपणास प्राप्त झाले आहे असा आत्मविश्वास निर्माण झाल्यामुळें, शास्त्रीबुवांनी वैयाकरणकुलांत लाभलेल्या आपल्या जन्माचें सार्थक करण्यासाठी व गुरुवर्य रामशास्त्री यांच्याकडून आपणास मिळालेला व्याकरण-विद्येचा ठेवा मराठी अभ्यासकांस परत करण्यासाठी या कामास प्रारंभ केला पूर्वीची जुनी अध्ययनाध्यापन-परंपरा लुप्त होत चाललेली पाहून आपण हा निश्चय केला, असे त्यांनी स्वत च म्हटले आहे संस्कृत व्याकरणावरील शास्त्रीय ग्रंथात व्याकरण-महाभाष्याचें अद्वितीय स्थान ध्यानात घेऊनच त्यांनी हें कार्य हातीं घेतलें, हें उघड आहे प्रा काशीनाथपंत म्हणतात, "पाणिनीनें रूपसिद्धीकडे प्रामुख्यानें लक्ष देऊन शास्त्रशुद्ध व शिष्टोच्चारित शब्द कोणते व अपशब्द कोणते हे कळावे व शुद्ध शब्दाचे यथार्थ ज्ञान व्हावे या हेतूने त्याचे वेळी प्रचारात असलेल्या संस्कृत भाषेचें उत्तम व्याकरण लिहिले व त्याबरोबर वैदिक शब्दांचे व त्यांच्या स्वरवैशिष्ट्याचे विवेचन करून वैदिक भाषेचेहि यथार्थ ज्ञान करून दिले पाणिनीनंतर थोड्याच कालाने त्याच्या लाघवपूर्ण अष्टाध्यायी ग्रंथाचें ठिकठिकाणीं अध्ययनाध्यापन चालू झाले व व्याख्यानाच्या साररूपाची वार्तिके जशीं लिहिण्यात आली, त्याप्रमाणेच कालान्तराने भाषेमध्ये झालेला फरक लक्षात घेऊन व प्रचारात आलेल्या नवीन शब्दाकडें लक्ष देऊन पूरक वार्तिकेंहि लिहिली गेली महाभाष्यकारांनी पाणिनीच्या सूत्रांचे, तसेच वर वर्णन केलेल्या दोन्ही प्रकारच्या वार्तिकांचें पूर्ण परिशीलन करून व स्वत हि काही इष्टिवचनें घालून सूत्रें व वार्तिके[६] यांचें यथासांग व्याख्यान व विवेचन करणारा विद्वत्तापूर्ण 'महाभाष्य' हा विद्वन्मान्य ग्रंथ लिहिला व वेदाङ्ग म्हणून समजल्या जाणाऱ्या

६ पाणिनीच्या अष्टाध्यायी या अनेक दृष्टींनी अपूर्व अशा व्याकरण-ग्रंथात सुमारें चार हजार सूत्रें असून त्यावर कात्यायनानें व इतर वैयाकरणांनी सुमारें ५००० वार्तिकें रचिलीं आहेत (महा–प्र रा, पृ १९४)

व्याकरणाला शास्त्राचें स्वरूप प्राप्त करून दिले महाभाष्यकारानी पूर्वीच्या व्याकरणग्रथाचें सूक्ष्म अध्ययन करून वैदिक व लौकिक प्रयोगाचा सपूर्ण अभ्यास करून महाभाष्य हा ग्रथ रचिल्यामुळे त्यात आला नाही असा व्याकरणशास्त्राचा कोणताच विषय राहिला नाही." (प्र ख , पृ ३४९) साराश, ',भाष्योच्छिष्ट शब्दशास्त्रम्' अशी परिस्थिति असल्यामुळे शास्त्रीबुवानी याच ग्रथाची निवड केली, यात आश्चर्य नाही

व्याकरण-महाभाष्य हा ग्रथ शकराचार्यांच्या शारीरभाष्याच्या जवळजवळ दुप्पट मोठा आहे शास्त्रीबुवानी मूळ सस्कृत सहितेसह केलेल्या त्याच्या अनुवादाचे सहा खड असून, त्याची एकूण पृष्ठसख्या सुमारे ३००० आहे। या ग्रथास त्यानी लिहिलेली तीस पृष्ठाची प्रस्तावना या अनुवाद – ग्रथाच्या सातव्या म्हणजे प्रस्तावनाखडात सपूर्णपणे समाविष्ट केलेली आहे ( पृ ७१ ते ९९ ) मूळ सस्कृत सहितेची पृष्ठसख्या सुमारे १४०० असून, मराठी अनुवादाची पृष्ठसख्या तितकीच म्हणजे १४०० आहे ( कारण सस्कृत सहितेसाठी वापरलेला टाईप मोठा असून, अनुवादाचा टाईप मध्यम आकाराचा आहे ) व टीपाची (बारीक टाइपात छापलेल्या) पृष्ठसख्या सुमारे २०० आहे। या ग्रथाच लेखन करताना शास्त्रीबुवानी कोणाचीहि मदत घेतली नाही सपूण मराठी भाषातरहि त्यानी स्वत च लिहिले मात्र त्याची मुद्रणप्रत तयार करण्याचे काम प शकरशास्त्री मारुलकर यानी केले *महर्षि पतञ्जलीच्या मूळ सस्कृत सहितेइतकीच ही अनुवादाची मराठी* भाषाहि सरळ, अर्थपूर्ण, प्रसादयुक्त व सहजसुदर उतरली आहे। मराठी भाषेच विशेष अभ्यास न करताहि शास्त्रीबुवानी अशी भाषाशैली कमावली, ह त्यास अत्यन्त भूषणावह आहे भाषा सोपी व सळीमिळीची असली, तरी व्याकरणमहाभाष्याचा विषयच इतका कठीण आहे की सिद्धान्तकौमुदीसारख्या एखाद्या मौलिक व्याकरण ग्रथाचे ज्याने अध्ययन केले आहे, त्यालाच तो ग्रथ समजेल। इतरास तो मराठी भाषातरावरूनहि समजणार नाही। यावरून या ग्रथाचे साधे भाषातर करणे किती अवघड आहे याची कल्पना येईल। मग त्यातील कठीण स्थळावर टीपा लिहिणे तर दूरच। व्याकरण महाभाष्यातील निरनिराळे विषय स्पष्ट करण्यासाठी भर्तृहरि, कैय्यट, भट्टोजी दीक्षित, नागोजीभट्ट यासारख्या महापडितानी अनुक्रमें वाक्यपदीय, प्रदीप, शब्दकौस्तुभ व उद्द्योत यासारखे कितीतरी नामाकित ग्रथ पुढील काळात लिहिलेले आहेत। *या ग्रथामुळ* महाभाष्यातील विषयविवेचनावर *अधिक प्रकाश पडतो व महाभाष्यामुळे हे ग्रथ सुस्पष्टपण समजतात म्हणून महाभाष्याचे भाषातर करतानासुद्धा या ग्रथातील विवेचन ध्यानात घेणे आवश्यक ठरते शास्त्रीबुवानी यापैकी काही ग्रथ अनेक वर्षे विद्यार्थ्यास*

पढविले असल्यामुळे व त्यासाठी उपोद्बलक अशा केलेल्या इतर ग्रंथाचा सूक्ष्म अभ्यास केला असल्यामुळे महाभाष्यातील सर्व विषय नि संदिग्धपणे त्यास आत्मसात् झाला होता म्हणून अनुवाद करताना महाभाष्यातील सागोपांग विषय ध्यानात घेऊन, बिनचूक व सफाईदार शब्दाची योजना करणे त्यास कठीण वाटले नाही टीपा लिहिताना, प्रतिपाद्य विषयातील अवघड भाग सुस्पष्ट करून अभ्यासकास तो विषय अनायासे समजेल अशी दक्षता इतर ग्रंथाप्रमाणे याहि ग्रंथाच्या बाबतीत त्यानी बाळगली आहे म्हणून शारीरभाष्याप्रमाणे याहि ग्रंथातील शास्त्रीबुवाच्या टीपा अत्यंत मार्मिक असून, त्यामुळे त्या त्या विषयविभागातील रहस्य वाचकाच्या सहज ध्यानात येते या टीपावरून व या ग्रंथास शास्त्रीबुवानी केवळ स्वतःच्या व्यासंगावर आधारलेली जी प्रस्तावना लिहिली आहे तिच्यावरून, त्याची चिकित्सक बुद्धिहि निर्विवादपणे सिद्ध होते, या दृष्टीने व्याकरण महाभाष्यापूर्वी एखादे लघुभाष्य लिहिले गेले असावे, याविषयी शास्त्रीबुवानी आपल्या प्रस्तावनेत केलेले विवेचन पाहण्यासारखें आहे संस्कृत व्याकरणशास्त्रावरील सर्व महत्त्वाच्या ग्रंथाचे, विशेषत प्रदीप व उद्द्योत या ग्रंथाचें रहस्य ध्यानात घेऊन शास्त्रीबुवानी या ग्रंथाचा मराठी अनुवाद केला असल्यामुळे अनुवादातहि जागोजाग विशेष मार्मिकता आपल्या प्रत्ययास येते [७] म्हणूनच काशीनाथपंत म्हणतात, "प्रस्तावना

७ नमुन्यासाठी सहजगत्या अवलोकनात आलेली 'समर्थ पदविधि ॥२।१।१॥ या सूत्रावरील महाभाष्याच्या प्रारंभीची पाच वाक्यें व त्याचा शास्त्रीबुवानी केलेला मराठी अनुवाद ही पुढे दिली आहेत ––

महाभाष्य – विधिरिति को ऽ य शब्द । विपूर्वाद्धाञः कर्मसाधन इकार विधीयते विधिरिति। किं पुनर्विधीयते। समासो विभक्तिविधानं पराङ्गवद्भावश्च॥'

मराठी अनुवाद–"येथील विधि शब्द कोणत्या अर्थाचा दर्शक आहे" वि हा उपसर्ग मागे लावून 'डुधाञ् धारणपोषणयो ' या धातूच्या पुढे कर्म या अर्थी कि प्रत्यय (३।३।९२) करून तयार केला असल्याने ज्याचे विधान केले जाते ते, म्हणजे काय या अर्थाचा दर्शक आहे

ज्याचे विधान केले जातें तें कार्य कोणतें ?

समास, विभक्तिविधान आणि पराङ्गवद्भाव हें होय '

(म भा मराठी अनुवाद भाग दुसरा, पृ २२५)

यावरून केवळ शब्दाला शब्द ठेवून केलेले हें भाषांतर नव्हे, विषयाचे संपूर्ण मर्म ध्यानात घेऊन अभ्यासकास विषय समजावून देण्याच्या दृष्टीने केलेले हे भाषांतर आहे – नव्हे, महाभाष्यावर ही मराठीत लिहिलेली वृत्तिच आहे, म्हणून खऱ्या पंडिताचें हें काम आहे ही गोष्ट कोणाच्याहि ध्यानात येईल

आढळतात! तसेच, केवळ विद्याभिवृद्धीचे ध्येय बाळगून, तीस हजार रुपयांचा प्रचंड खर्च करून या अजस्र ग्रंथाचे प्रकाशन करणाऱ्या डे ए सोसायटी-सारख्या संस्थाहि भारतात तरी अत्यंत दुर्मिळ आहेत हे सांगण्याची आवश्यकता नाही अशा प्रकारे थोर विद्योपासक असे लेखक, संपादक व प्रकाशक यांचा त्रिवेणीसंगम घडून आल्यामुळेच मराठी भाषेस प्रस्तुत महान् ग्रंथाचे जे अद्वितीय लेणे लाभले, त्याबद्दल कोणाहि मराठी भाषिकाला अत्यंत अभिमान वाटेल, यात मुळीच शंका नाही

( २२ ) कायपरिशुद्धि ·

'कायपरिशुद्धि' हा शास्त्रीबुवांचा ग्रंथ 'आनन्दाश्रमसंस्कृतग्रंथावली' मध्ये १९३९ साली प्रसिद्ध झाला कालानुक्रमाने पाहता, शास्त्रीबुवांनी लिहून पूर्ण केलेला हा शेवटचा ग्रंथ होय व्याकरण महाभाष्याच्या मराठी अनुवादाचे प्रचंड कार्य तडीस गेल्यानंतर शास्त्रीबुवा वेदान्तशास्त्राकडे वळले जन्मभर ज्या वेदान्त-शास्त्राचे त्यांनी अध्ययन अध्यापन, मनन व आचरण केले त्या वेदान्तशास्त्रावरील आपले परिपक्व विचार आपल्या पद्धतीने ग्रंथरूपाने मांडण्याचा त्यांनी विचार केला असावा म्हणून कायपरिशुद्धि, साधनपरिशुद्धि व मोक्षपरिशुद्धि हे वेदान्तशास्त्रा वरील तीन स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याचा त्यांनी या वेळी संकल्प केला व त्या सर्वांवर टिपण करण्यासहि सुरुवात केला, परंतु त्यापैकी फक्त कायपरिशुद्धि हाच ग्रंथ पूर्ण होऊन प्रसिद्ध झाला इतर दोन केवळ संकल्पस्वरूपात राहिले, हे वेदान्त-शास्त्राभ्यासकांचे खरोखर मोठे दुर्दैव म्हटले पाहिजे ! 'ईश्वरेच्छा बलीयसी' याशिवाय दुसरे काय म्हणणार ? तथापि कायपरिशुद्धि या ग्रंथाचा मुमुक्षूस लाभ झाला, हामुद्धा लहानसहान फायदा नव्हे, कारण या स्वतंत्र ग्रंथाची मांडणी बाहीशी नाविन्यपूर्ण असून त्याची उपयुक्तता निःसंशय विशेष आहे

कायपरिशुद्धीचे महत्त्व पटवून देऊन, ती साधण्याचे उपाय सांगण्यासाठी शास्त्रीबुवांना हा ग्रंथ लिहिला आहे काय म्हणजे शरीर, त्याचे तीन प्रकार आहेत — (१) स्थूल शरीर (२) सूक्ष्म शरीर व (३) कारणशरीर प्रत्येक प्राण्यास ही तीन शरीरे प्राप्त झालेली असून, त्यांच्या बंधनातून मुक्त झाल्याशिवाय त्याला मोक्ष प्राप्त होऊ शकत नाही यापैकी कारणशरीर हे सूक्ष्म शरीराचे व सूक्ष्म शरीर हे स्थूल शरीराचे कारण आहे त्रिशरीरात्मक संपूर्ण कायपरिशुद्धि झाल्याशिवाय आत्मज्ञानोपदेशाचा अधिकार प्राप्त होत नाही व आत्मज्ञाना शिवाय मोक्ष साध्य होणार नाही अथवा जरामरणबन्धभय नष्ट होणार नाही हे उघड आहे म्हणूनच बहुसंख्य लोक सदोषकाय आहेत हे जाणून आपण हा कायपरिशुद्धि ग्रंथ लिहित आहोत असे शास्त्रीबुवांनी या ग्रंथाच्या आरंभी म्हट—

सादाइ असून त्याची कधीहि तृप्ति होत नाही. शिवाय तो इतका मायावी आहे की मनुष्याला तो मित्राप्रमाणे भासतो व त्याच्यामुळे अहितकारक वस्तुहि हितकारक दिसू लागते जमिनीत असलेले गवताचे बीज जसे कधी उघड्या डोळ्यानी दिसत नाही, परतु पाऊस पडताच ते उदड वाढू लागते, त्याप्रमाणे मनुष्याच्या मनात लपून बसलेला हा कामशत्रु कधी सहसा त्याच्या ध्यानात येत नाही, पण विषय दिसताच त्याकडे तो मनुष्यास खेचून नेतो या कामशत्रूचे एकदम सपूर्ण निर्मूलन करणे शक्य नसल्यामुळे 'मातृसहस्रवत् वत्सल' अशा श्रुतीने नित्य, नैमित्तिक व विशेषत काम्य कर्मे सागितली आहेत त्याचा हेतु मनुष्याने काम्य कर्मेच करीत राहावे असा नसून, कामरिपूचे सचारक्षेत्र मर्यादित व्हावे व त्या श्रुति-प्रतिपादित सत्कर्मामुळे मनुष्याची चित्तशुद्धि होऊन मोक्षज्ञानास तो अधिकारी व्हावा, असा आहे कामरूपी बीज मनोभूमीत रुजते अनुकूल आर्थिक परिस्थिती-मुळे मन स्वास्थ लाभल असता जणू ती मनोभूमि नागरून सिधते व त्यावर विषय-चिंतनरूपी जलवर्षाव झाला असता ते कामरूपी बीज अकुरित होते आणि त्याचा लवकरच मोठा वृक्ष होऊन त्यास फुलेफळे येतात! कामबीजाच्या बाबतीत एक विशेष गोष्ट अशी की त्याला बाहरून जलसिंचन करावे लागत नाही, त्यास लागणार विषयचिंतनरूपी जल त्यास सहज उपलब्ध होते. म्हणून ज्याप्रमाणे बीज भाजल्यानतर ते रुजू शकत नाही, त्याप्रमाणे विषयाच्या ठिकाणी दोषदृष्टि निर्माण झाली असता कामबीज निष्फल ठरत, अथवा विषयचिंतनरूपी जल त्याला मिळू न दिल्यास, त्याची वाढ होऊ शकत नाही

—अशा प्रकार कामशत्रूचे निर्मूलन करण्यासबधी शास्त्रीबुवानी ज्या अत्यत उपयुक्त व व्यवहार्य सूचना दिल्या आहेत त्याची माहिती मूळ ग्रथातूनच करून घेतली पाहिजे ( पाहा—का प , पृ ८५ ते ९२ )

देवतादिकाचे पूजन, स्वाध्यायाचे अध्ययन, सध्योपासनादि नित्यनैमित्तिक कृत्याचे पालन इत्यादि धार्मिक आचरण करणाऱ्या मनुष्यास परमेश्वर सद्बुद्धि देतो व त्यामुळे त्याची कायपरिशुद्धि लवकर होते, कारण आपल्या भक्तास सद्बुद्धि देऊनच त्याचे रक्षण करण्याची परमेश्वराची पद्धति ठरलेली आहे [१०] कायपरि-शुद्धि झाली असता सत्वगुणाचा निश्चित उत्कर्ष [११] होतो, रजोगुणाचीहि मदत होऊ

---

१० न देवा दण्डमादाय रक्षन्ति पशुपालवत्।
य हि रक्षितुमिच्छन्ति बुद्ध्या सयोजयन्ति तम्॥ ( का प , पृ. १०२ )

११ समबुद्धि, निर्ममत्व, स्थितप्रज्ञता इत्यादि गुण अगीं बाणले असता सत्त्वगुणाचा उत्कर्ष होतो.

त्यागाने व तमोगुणापासून काहीच उपद्रव होत नाही, अशा प्रकारं सत्त्वगुणाचा उत्कर्ष झाला असता कामरिपूचा पराभव होतो [१२] व तो अगदी हतबल होऊन जातो. त्यामुळे मनुष्य आत्मज्ञानोपदेशास अधिकारी ठरतो आणि ब्रह्मज्ञानी आचार्यांकडून ब्रह्मज्ञानाचा उपदेश झाला असता त्याला सायुज्यमुक्ति प्राप्त होते —अशा प्रकारं शेवटीं कायपरिशुद्धीचें महत्त्व सांगत शास्त्रीबुवानीं हा ग्रंथ संपविला आहे शेवटीं जन्मसाफल्याचें समाधान प्राप्त होण्यासाठी आपण हा स्वतंत्र ग्रंथ लिहिला, असें शास्त्रीबुवानीं म्हटलें आहे ( पाहा प्रस्तुत ग्रंथ पृ ५० ) यावरून केवळ कर्तव्यपरता व परमार्थबुद्धि हेंच त्याचे गुण दिसून येतात आयुष्याच्या अखेरीस अशी परमार्थबुद्धि त्याच्या ठिकाणी दिसून आली नसती, तरच तें एक नवल ठरलें असतें

नित्याप्रमाणे याहि ग्रंथास तपशीलवार विस्तृत अनुक्रमणिका व श्रुत्यादि-ग्रंथातील अवतरणांचें सूचीपत्र ही जोडली आहेत शास्त्रीबुवाचे शिष्य प मारुलकर-शास्त्री यानी या ग्रंथास विवेचक प्रस्तावनाहि जोडली आहे

आतापर्यंत वर्णन केल्याप्रमाणे व्याकरण, वेदान्त पूर्वमीमांसा न्याय, योग इत्यादि विविध शास्त्रावर शास्त्रीबुवानी केवढें मौलिक लिखाण केलें, हे ध्यानात घेतलें असता मन आश्चर्यानें थक्क होतें! कारण संस्कृत पाठशाळा व फर्ग्युसन कॉलेज या दोन संस्थांमध्ये अखंड निरलसपणे अध्यापनाचें कार्य चालू असतानाच त्यानी हे सर्व कार्य केलें आहे! नुसतें व्याकरण महाभाष्याच्या मराठी भाषांतराचें कार्य त्यानी केलें असतें तरीसुद्धा ग्रंथकार म्हणून त्यास अढळ स्थान प्राप्त झालें असतं व्याकरणाच्या खालोखाल पण जवळजवळ तितकेंच वेदान्तशास्त्रातील त्यानें लेखन अत्यंत महत्त्वाचें आहे शांकरमहाभाष्याचें संपूर्ण मराठी भाषांतर त्याला जोडलेला (चार भाष्यकारानी केलेल्या सूत्रार्थांचा ) तुलनात्मक चौथा परिशिष्ट खंड श्रीभाष्याच्या चतु सूत्रावरील टीका संपूर्ण श्रीभाष्यावरील टीपा सर्वदर्शनसंग्रहा वरील दशनाङ्कुर टीका व त्यास जोडलेला विस्तृत उपोद्घात बिन्दुप्रपात टीकेसह सिद्धान्तबिन्दु अद्वैताङ्कुर टीकेसह भगवद्गीतेचे पहिले दोन अध्याय व त्यास जोडलेलें विस्तृत विवेचन आणि अद्वैतामोद व कायपरिशुद्धि हे दोन स्वतंत्र ग्रंथ-एवढें वेदान्तशास्त्रावरील त्यानें प्रचंड व अत्यंत मौलिक लेखनकार्य पाहिल्यानंतर वेदान्तशास्त्रावरील त्याचें असामान्य प्रभुत्व कोणीहि मान्य करील व प्रामुख्यानें ते

---

१२ पराभूता भवेत्काम सत्त्वोत्कर्षेण नान्यत ।
रजोगुण सहाय स्यादविरोधी तमोगुण ॥
(का प , पृ १०४)

वैयाकरण नसून वेदान्ती होते, असेहि म्हणण्याचा एखाद्यास मोह होईल। तथापि शास्त्रीबुवा प्रामुख्याने वैयाकरण होते आपल्या गुरुजींजवळ त्यांनी मुख्यत. व्याकरणाचें सुमारें दीड तप अध्ययन केलें होतें व वयाच्या २७ व्या वर्षी त्यांनी 'तत्त्वादर्श' ('परिभाषेन्दुशेखरा' वरील टीका) हा आपला पहिला ग्रंथ व्याकरणशास्त्रावरच लिहिला होता. वैयाकरण कुलात आपणास लाभलेल्या जन्माचे सार्थक करण्यासाठीच त्यांनी आयुष्याच्या अखेरच्या काळात 'व्याकरणमहाभाष्य-मराठी अनुवाद' हा आपला अद्वितीय ग्रंथ पूर्ण केला व्याकरणशास्त्रात पारंगतता प्राप्त झाल्यामुळेच इतर शास्त्रांचा ते सखोल व व्यापक अभ्यास करूं शकले व एवढी मौलिक ग्रंथसंपत्ति त्यांनी निर्माण केली।

इतर शास्त्रातीलहि त्यांचें लेखन महत्त्वाचें आहे या विविध शास्त्रातील ग्रंथाचें परिश्रमपूर्वक त्यांनी जें संपादन केलें व अभ्यासकासाठी त्या ग्रंथास बहुविध सूचीपत्रें जोडण्याचें जें अत्यंत उपयुक्त कार्य केलें तेंसुद्धा कारवाणण्यासारखें आहे

जवळजवळ एकट्याच्या बळावर शास्त्रीबुवा एवढें प्रचंड कार्य[१३] कसे करूं शकले ? हा मोठा विचार करण्यासारखा प्रश्न आहे आणि शास्त्रीबुवांची उत्कट ज्ञानोपासकाची भूमिका, हेच त्या प्रश्नाचें थोडक्यात उत्तर आहे. विद्यार्थिदशेत प्रामुख्याने अध्ययन व पुढे अध्यापन करताना, आपल्या अभ्यासविषयाचा सखोल व व्यापक अभ्यास केल्याशिवाय त्यांचें समाधानच झालें नाहीं। अभ्यासविषयाची आवड व कर्तव्याची तीव्र जाणीव हे त्यांचे गुण या एकनिष्ठ अखंड ज्ञानोपासनेच्या मुळाशी असावेत असें दिसतें बुद्धिमत्ता तर त्यांच्याजवळ सर्वश्रेष्ठ दर्जाची होतीच, कारण ती नसती तर हें अद्वितीय वाङ्मयीन कार्य त्यांच्या हातून झालेंच नसतें , परंतु त्या बुद्धिमत्तेस निरलस परिश्रमाची जी जोड त्यांनी दिली, त्यामुळें एवढा कार्याचा उठाव त्यांच्या हातून झाला 'सर्वदर्शनसंग्रहा'च्या द्वितीयावृत्तीच्या प्रस्तावनेत श्री काशीनाथपंतांनी म्हटल्याप्रमाणे व्याकरण वेदान्त, न्याय, अलंकार इत्यादि शास्त्रांचें अध्यापन करतांना त्या त्या शास्त्रावरील प्रमाणभूत ग्रंथाचें जें त्यांनी सखोल अध्ययन केलें, त्यामुळेंच शांकरभाष्याचें संपूर्ण काम अवघ्या सव्वादोन वर्षांत तें तडीस नेऊं शकले। त्या कामाचा श्रेष्ठ दर्जा अजूनहि सर्वमान्य आहे तें काम करीत असतांना एकंदर वेदान्तशास्त्रावरील प्रधान ग्रंथाचें जें त्यांनी कसोशीने

१३ भाषांतर, टीका, टिप्पणी, उपोद्घात, स्वतंत्र ग्रंथ इत्यादि प्रकारचें एकूण सुमार ६००० पृष्ठांचें मौलिक लेखन शास्त्रीबुवांनी केलें आहे.

परिशीलन केले, त्यानंतर रामानुजाचार्यांच्या विशिष्टाद्वैतमतावरील प्रशमनीय ग्रंथरचना त्यास करता आली तथापि यामुळे ते स्वत विशिष्टाद्वैतमतवादी असावेत असाहि त्यांच्यावर आराप आला तो दूर करण्यासाठी त्यांनी 'अद्वैतामोद' हा आपला स्वतंत्र ग्रंथ लिहिला। याच सुमारास अलकार न्याय, योग इत्यादि शास्त्रावरील ग्रंथाचें जें त्यांनी परिश्रमपूर्वक संपादन केले, त्यामुळे सर्व दर्शनाचें थोडक्यात दर्शन घडविणाऱ्या 'सर्वदर्शनसग्रहा'कडे त्यांचे लक्ष वेधले व त्यास स्वतःची टीका, उपोद्घात, सूची इत्यादिकांची जोड देऊन त्यांनी त्यांचे संपादन केले आणि जुन्या शास्त्रीय वाङ्मयोपासकांत अढळ स्थान मिळविले पुढे वयाच्या ६५व्या वर्षांनतरहि या प्रकरणात म्हटल्याप्रमाणे धर्मशास्त्र, वेदान्त व व्याकरण या शास्त्रावरील असामान्य ग्रंथलेखन करून, त्यांनी आपल्या आयुष्याचें सार्थक करून घेतलं अशा प्रकार 'तच्चिन्तन तत्कथनम् " इत्यादि श्लोकांत म्हटल्याप्रमाणे खरोखर *ब्रह्माभ्यासाप्रमाणेच शास्त्रीबुवानी तदेकपरबुद्धीने शास्त्राभ्यास केला आणि म्हणूनच एवढें प्रचंड व मौलिक ग्रंथलेखनकार्य त्यास* करता आल।

साराश, शास्त्रीबुवाना परमेश्वराने अलौकिक बुद्धिमत्ता दिली होती आणि दैवयोगाने थोर वैयाकरणकुलात जन्म, महर्षि रामशास्त्री गोडबोले यांच्यासारखे *आदर्श गुरु, पुण्याम न्यायमूर्ति रानडयांसारख्या विभूतींचा आश्रय, संस्कृतपाठशाळा* व फर्ग्युसन कॉलेज या नामवंत संस्थामध्ये अध्यापन आणि वारवार ग्रंथसंपादन अथवा लेखन यासाठी मिळालेल्या काही दुर्मिळ संधी, याहि गोष्टींचा त्यास लाभ झाला होता म्हणजे पोषक परिस्थितिहि त्यास लाभली होती, तथापि दृढ-*श्रद्धापूर्वक अतिशय परिश्रम घेऊन त्यांनी जी अखंड ज्ञानोपासना केली, त्यामुळेच ते वंदनीय महामहोपाध्याय झाले, यात शका नाही विशेषत आजच्या स्वराज्याच्या* काळात या त्यांच्या अलौकिक ज्ञानोपासनेचें सर्वांनी अनुकरण करणे अत्यावश्यक आहे

* * *

# १० : सेवानिवृत्तीनंतर

१९२८ साली शास्त्रीबुवा फर्ग्युसन कॉलेजमधून सेवानिवृत्त झाल्यानंतर
त्याच्या दिनचर्येत, मनोवृत्तीत अथवा एकदर वागण्यात कोणता फरक पडला, असा
प्रश्न एखाद्याच्या मनात निर्माण होणे अगदी स्वाभाविक आहे सहृदयांनी या
प्रश्नाचे उत्तर देणे–इतर अनेकाच्या बाबतीत दिसून येते त्याप्रमाणे-अवघड आहे,
असेहि वाटेल. परतु शास्त्रीबुवाच्या बाबतीत या प्रश्नाचे उत्तर देणे मुळीच
कठीण नाही फर्ग्युसन कॉलेजमधील अध्यापन बद पडल्यामुळे दुपारी १२ ते ३ या
वेळातहि ते घरी सापडू लागले व घरामधील त्याचा लेखन–वाचनाचा काळ
वाढला, एवढाच काय तो व.हा फरक त्याच्या दिनचर्येत आढळून आला त्याच्या
मनोवृत्तीत अथवा एकदर वागणुकीत फरक पडण्याचे काहीच कारण नव्हते।
कारण वैराग्य, विनय, इत्यादि सद्गुण त्यास जणू जन्मत प्राप्त झाले होते

विद्योपासना हे ध्येय शास्त्रीबुवानी केव्हाच मनाशी निश्चित केले असल्यामुळे
'सेवानिवृत्तीनतर पुढे काय?' ही समस्या त्याच्यापुढे कधीहि उभी राहिली
नाही मागील प्रकरणात म्हटल्याप्रमाणे सेवानिवृत्त होताच व्याकरणमहाभाष्याच्या
मराठी अनुवादाचे प्रचड कार्य त्यानी हाती घेतले व ते चालू असताना धर्मतत्त्व-
निर्णय, मीमासान्यायप्रकाश व भगवद्गीता यावरील टीकाचे व कायपरिशुद्धि
इत्यादि विद्वत्तापूर्ण ग्रथाचे लेखनहि केले। त्यामुळे सेवानिवृत्तास तापदायक
वाटणारा रिकामा वेळच त्याच्याजवळ नव्हता। शिवाय सस्कृत पाठशाळेतील मुख्या-
ध्यापक म्हणून त्याचे अध्यापनकार्य आयुष्याच्या अखेरीपर्यंत चालू होते, फक्त
शेवटची सऊदहा वर्षे वृद्धापकाळामुळे ते पाठशाळेत प्रत्यक्ष जाऊ शकले नाहीत
व या कार्याबद्दल त्यानी वेतन घेतले नाही एवढेच काय ते सध्याकाळी पाच-
नतर एकदोन तास फर्ग्युसन कॉलेजमधील काही प्राध्यापक अथवा सस्कृत
पाठशाळा, आनन्दाश्रम इत्यादि सस्थात काम करणारे काही शास्त्रीमडळी व
गावातील काही विद्याप्रेमी लोक उच्च शास्त्रीय ग्रथाचे पाठ्कन अध्ययन
करण्यासाठी अथवा शकासमाधानासाठी त्याच्याकडे पूर्वीप्रमाणेच येत असत
सारांश सेवानिवृत्तीनतर शास्त्रीबुवाच्या एकदर दिनचर्येत फारसा फरक पडला
नाही व त्याच्या विद्योपासनेच्या व्रतात तर मुळीच खड पडला नाही।

पुण्याची सस्कृत पाठशाळा.

पुण्यामध्ये सस्कृतच्या बाबतीत कार्य करणाऱ्या सर्व सस्थाशी शास्त्रीबुवाचा
घनिष्ठ सबध होता तथापि सस्कृत पाठशाळेशी ते इतके निगडित झाले होते
की सस्कृत पाठशाळा म्हणजेच शास्त्रीबुवा असे जवळजवळ समीकरण पुष्कळाच्या
मनात निर्माण झाले होते १८३४ सालच्या सुमारास पुणे व मुबई येथ इग्रजी

शाळा सुरू झाल्यानंतर लोकांची प्रवृत्ति प्रामुख्याने इंग्रजी शिक्षणाकडे दिसून आल्यामुळे ब्रिटिश सरकारने पुण्याची विश्रामबाग वाड्यातील संस्कृत पाठशाळा बंद केली व तिच्या ऐवजी तेथेच इंग्रजी शाळा सुरू केली त्यामुळे त्या पाठशाळेत व्याकरण, न्याय वेदान्त, अलंकार इत्यादि जुन्या शास्त्रात पारंगत होणाऱ्या पंडितांची परंपरा खंडित झाली। "काशीनंतरच्या खालोखाल विद्येचे केंद्र म्हणून मानलेल्या पुणे शहरामध्ये झालेला हा विद्येचा ऱ्हास आपल्या उच्च वैदिक संस्कृतीलाहि अपायकारक आहे हे काही वर्षांनी युनिव्हर्सिटीच्या उच्चतम पदवी धारण करणाऱ्या विद्वानांच्याहि लक्षात आले पुण्यातील विद्वान् शास्त्री नरसिंहशास्त्री शजवलकर, वासुदेवशास्त्री देहगावकर चिंतामणशास्त्री वरडकर व दामोदरशास्त्री माठे, यांनी पुण्यामध्ये पुन्हा संस्कृत पाठशाळा सुरू करण्याचे मनात आणले व न्यायमूर्ति रानडे, डॉ भांडारकर प्राध्यापक कायवट वगैरे विद्वान् व विद्याप्रेमी मंडळींना या बाबतीत पुढाकार घेण्याची विनंती केली सर वुइलियम वेडरबर्न यांच्यासारख्या परकीय विद्वानांनीहि या बाबतीत पूर्ण सहानुभूति दाखविली त्यानंतर लवकरच सन १८८५ मध्ये (शके १८०६, माघ महिन्यात वसंतपंचमीस) पुण्यामध्ये विश्रामबागेजवळ नगरकर यांचे वाड्यात ही पाठशाळा स्थापन करण्यात आली व मुख्याध्यापक म्हणून प्रथमत विद्वद्वर्य नारायणशास्त्री गोडबोले यांची नेमणूक करण्यात आली काही सद्गृहस्थांनी या पाठशाळेस देणग्या दिल्या, काहींनी विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्य दिल्या, तर इतर काही गृहस्थांनी विद्यार्थ्यांच्या राहण्याची व भोजनाची सोय आपल्याकडे केली (प्र ख पृ ५४–५५) या पाठशाळेत शास्त्रीबुवांनी सन १८९० मध्ये पुण्यात आल्या दिवसापासून १९४२ सालापर्यंत सतत ५२ वर्षे (पहिले ५-६ महिने सोडल्यास) प्रधानाध्यापक म्हणून काम केले पाठशाळेचा सर्व भार त्यांच्यावरच होता त्यांनी [पाठशाळेचा सर्व खर्च व्याजाच्या व देणग्यांच्या उत्पन्नातून भागवून पाठशाळेची सांपत्तिक स्थिति उत्तम सुधारली यापेक्षा मुख्य गोष्ट म्हणजे पाठशाळेच्या संस्थापकांच्या इच्छेनुसार शास्त्रीबुवांनी पाठशाळेत विविध शास्त्रात कितीतरी नामवंत विद्यार्थी[1] तयार करून महाराष्ट्राची विद्वत्परंपरा कायम राखण्यास फार मोठा हातभार लावला

## शास्त्रीबुवांचे विद्यार्थी

शास्त्रीबुवांच्या शिष्यवर्गापैकी विनायकशास्त्री सापरेबुवा व कान्हेरेबुवा यांनी उत्तम प्रवचने देऊन विद्याभिवृद्धीचे काय चालविले श्री कान्हेरे यांनी तर

---

१ या विद्यार्थ्यांचा विशेष परिचय प्रा काशीनाथपंतांनी प्रस्ता खंड पृ ५५ ६० मध्ये करून दिला आहे

मोकळेपणाने वेळोवेळी शंका विचारून आपले समाधान करून घेतल्यामुळे शास्त्रीबुवांच्याहि बुद्धीला सूक्ष्मेक्षिका व चिकित्सापद्धति यांची जोड मिळाली, म्हणूनच त्यांना विविध शास्त्रांतील अधिकृत ग्रंथाचें व्याख्यान, विवरण, भाषांतर व संपादन यथासांग करता आलें व आधुनिक चिकित्सापद्धतीस अनुसरून नवीन प्रबंध, उपोद्घात व टीका यांचे निर्दोष अथवा विद्वन्मान्य लेखन करता आले.

इतर संस्थांतील कार्य

शास्त्रीबुवा पुण्यातील वक्तृत्वोत्तेजक सभेचे काही वर्षे उपाध्यक्ष होते त्या वेळीं सभेतर्फे घेतल्या जाणाऱ्या वार्षिक परीक्षांची जबाबदारी त्यांनी अत्यंत निष्ठापूर्वक पार पाडली भांडारकर प्राच्यविद्या संशोधन–मंदिराचें शास्त्रीबुवा सन्मान्य सभासद होते ब्राह्मणसभेच ते उपाध्यक्ष होते पुण्यास भरलेल्या द्वितीय संस्कृत साहित्यसमेलनाच ते स्वागताध्यक्ष होते आनंदाश्रम व भांडारकर प्राच्यविद्या संशोधन–मंदिर या संस्थांतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या ग्रंथांच्या संपादनकार्यांत शास्त्रीबुवांनी विशेषत व्याकरणाच्या बाबतींत बहुमोल मदत केली आहे यांपैकी काही ग्रंथांच्या संपादनाची संपूर्ण जबाबदारी शास्त्रीबुवांनी पतकरली होती, तर शास्त्रीबुवांचे काही ग्रंथ या संस्थांनी प्रकाशित केले, ह मागे दिलेल्या त्यांच्या लेखनकार्याच्या परिचयावरून सहज ध्यानांत येण्यासारखें आहे

गुरु साक्षात् पर ब्रह्म

शास्त्रीबुवांनी वयाच्या तेविसाव्या वर्षापासून अध्यक्षतवाहून अधिक काळ अखंडितपणें अध्ययन, अध्यापन व लेखन अशा विविध मार्गांनी अत्यंत प्रामाणिकपणे जी विद्योपासना केली, ती पाहून मन खरोखर थक्क होऊन जातें 'गुरु साक्षात् पर ब्रह्म' या सुपरिचित श्लोकचरणांत म्हटल्याप्रमाणे शास्त्रीबुवांनी केवळ स्वत:स प्रत्यक्ष विद्यादान करणाऱ्या व्यक्तीस नव्हे, तर सर्वच ग्रंथकारास आणि त्यांच्या ग्रंथासहि ब्रह्मवत् पूज्य मानून विनम्रभावाने त्यांची सेवा केली म्हणनच कोणत्याहि ग्रंथकारासंबंधी त्यांनी कधीहि अनादराचे उद्गार काढले नाहीत व कोणत्याहि ग्रंथाचे अध्ययनाध्यापन करताना अथवा त्यावर टीकाविवरणादि लेखन करताना कधी कसूर केली नाही 'गुरु साक्षात् पर ब्रह्म' हें आपले ध्येयवाक्य असल्याचें त्यांनी कधी बोलून दाखविले नसले, तरी त्यांच्या एकंदर जीवनक्रमावरून ही गोष्ट प्रा काशीनाथपंतासारख्या त्यांच्या निकटवर्तीयांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिली नाही एवढें लोकोत्तर पाण्डित्य अंगी असूनहि त्यांच्या ठिकाणी असणारा सौजन्य अथवा विनय हा गुणहि तितकाच अद्वितीय म्हणावा लागेल म्हणूनच त्यांच्या वयाचें ७५ वे वर्ष सपलें त्या दिवशी त्यांच्या असंख्य शिष्यांतमानी

वेदशास्त्रोत्तेजकसभा कार्यकारीमंडळ व परीक्षक (५ मे १९२५)



खुर्चीवर १) वे गोविंदभट पाठक २) प वासुदेवशास्त्री अभ्यंकर ३) श्री नानासाहेब पावगी
४) प श्रीधरशास्त्री पाठक ५) श्री बाबासाहेब गोखले

व चाहत्यानी अत्यंत आदरबुद्धिपूर्वक मोठ्या उत्साहाने त्यांचा ७५ वा वाढदिवस साजरा केला प्रस्तुत ग्रंथाच्या प्रारंभी याच समारंभाचा निर्देश केला आहे

आयुष्यातील सुवर्णदिन

शास्त्रीबुवांच्या आयुष्यातील हा उत्सवदिन त्यांच्या जीवनेतिहासात खरोखर सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्यासारखा आहे! त्या वेळच्या मुंबई राज्याचे पंतप्रधान ना बा ग खेर त्या समारंभाचे अध्यक्ष होते व साहित्यसम्राट् तात्यासाहेब केळकर कार्याध्यक्ष होते, यातच त्या समारंभाची अपूर्वता दिसून येते शास्त्रीबुवांची राजमान्यता व लोकमान्यता याविषयी दुसरा कोणता पुरावा पाहिजे? पुणे शहरातील व बाहेरील मिळून ६४ संस्थातर्फे या वेळी शास्त्रीबुवांचा सत्कार करण्यात आला होता! प्रारंभीच्या स्वागतपर पद्यानंतर साहित्यसम्राटांनी आपल्या भाषणात, शास्त्रीबुवासारख्या जुन्या शास्त्री-पंडितांचें वाङ्मयीन कार्य म्हणजे ज्ञानसागरात बुडी मारुन त्याच्या तळाशीं असलेली रत्ने शोधून वर काढण्याचा विक्रम होय, असं सांगितलें नंतर प घोंडशेशास्त्री यानी या प्रसंगी आलेले शुभ संदेश वाचून दाखविल्यावर प्रा के ना वाटवे यानी 'महाराष्ट्रीय-जनते' तर्फे शास्त्रीबुवास त्या वेळीं अर्पण करण्यात आलेले मानपत्र वाचून दाखविले मानपत्रामध्ये मुख्यत शास्त्रीबुवानी व्याकरण, वेदांत, न्याय, मीमांसा इत्यादि शास्त्राचे अध्यापन करुन शेकडो विद्यार्थी तयार केले व शास्त्राध्ययनास अत्यंत उपयुक्त असे ग्रंथ निर्माण करुन जणू एक दीर्घकालीन ज्ञानयज्ञ स्वत केला आणि आपल्या विद्यार्थ्यांकडून करुन दाखविला अशा प्रकारच्या शब्दानी शास्त्रीबुवांचा यथोचित गौरव केला आहे [२]

मानपत्र-वाचनानंतर अध्यक्ष ना खेर यानी मानपत्राची एक प्रत रौप्य-करंडकातून शास्त्रीबुवास अर्पण केली व त्यास एक महावस्त्र देऊन पुष्पहारहि समर्पण केला तसेच त्यानी शास्त्रीबुवांच्या 'व्याकरण महाभाष्य-मराठी अनुवादा'चा पहिला भाग प्रसिद्ध झाल्याचें जाहीर करुन त्याची एक प्रत शास्त्रीबुवास दिली नंतर अध्यक्षानी चित्रकार पिंपळखरे यानी काढलेल्या शास्त्रीबुवांच्या तैलचित्राचें अनावरण केले मग इतर संस्थातर्फे शास्त्रीबुवांचा सत्कार करण्यात आल्यावर त्या वेळचे फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपाल रँ ग स महाजनी म्हणाले, 'महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री हे प्राध्यापकाचे प्राध्यापक आहेत " प रगाचार्य रड्डी यानी आपल्या भाषणात दीर्घोद्योग प्रत्युत्पन्नमतित्व व नियमितपणा या शास्त्रीबुवांच्या अंगी असलेल्या तीन गुणाचा प्रामुख्याने उल्लेख केला

---

२ हें संपूर्ण मानपत्र पुढें परिशिष्ट क्रमांक ३ मध्यें दिले आहे

या समारंभास शास्त्रीबुवांची सर्व आप्तमंडळीहि उपस्थित होती. त्यांचे ज्येष्ठ बंधु दामूअण्णा यांचें वय या वेळी ८२ वर्षांचें होतें. शास्त्रीबुवांचा हा अपूर्व सत्कार पाहून दामूअण्णांस इतकें गहिंवरून आलें की त्यांच वेळी समारंभाच्या ठिकाणाहून त्यांस बाजूस न्यावें लागलें। साहजिकच आहे। " ६७ वर्षांपूर्वी आजोबा भास्करशास्त्री वारले, त्या वेळी आपली किती शोचनीय स्थिति होती! त्या वेळीं अवघ्या सात वर्षांचे आबा (वासुदेवशास्त्री) जवळजवळ पोरके झाले होते ! किती हालअपेष्टांत आपण दिवस काढले ! किती दिव्यांतून सर्वांस जावें लागलें ! अन् आज आपल्या आबांनी एवढी राजमान्यता व लोकमान्यता मिळवून आपल्या कुळाचें नाव किती उज्ज्वल केलें ! त्यांच्या आणि सर्वांच्याच परिश्रमाचें खरोखर सार्थक झालें !"–अशा तऱ्हेच्या अनेक विचारांनी व स्मृतींनी त्या वेळी दामूअण्णास सद्गदित करून सोडलें नसतें तरच नवल। या समारंभानंतर दोनच महिन्यांनी दामूअण्णा दिवंगत झाले। या समारंभप्रसंगी ते हयात होते, हें शास्त्री-बुवांचें थोर भाग्य म्हटलें पाहिजे।

शास्त्रीबुवांच्या या सत्कारसमारंभाचें वर्णन करतांना केसरीकारांनी म्हटलें आहे की शास्त्रीबुवा अनेक शास्त्रांत पारंगत असल्यामुळें, तसेंच त्यांनी नुसतें अध्यापन नव्हे, तर बहुमोल ग्रंथलेखन केलें असल्यामुळें आणि प्राचीन विद्यापीठा-तील कुलपतींना शोभण्यासारखी राहणी व अत्यंत शुद्ध आचरण त्यांच्या ठिकाणी आढळत असल्यामुळें, सरकारनें दिलेल्या महामहोपाध्याय या पदवीनें त्यांस मोठेपणा न येतां, त्या पदवीलाच शास्त्रीबुवांमुळें मोठेपणा आला। तसेंच, याच सुमारास शंकराचार्यमठातर्फे त्यांस ' विद्वद्रत्न-अशी जी पदवी मिळाली होती, ती अगदीच अपुरी होती, कारण त्यावरून शास्त्रीबुवांच्या गाढ विद्वत्तेची मुळीच कल्पना येत नाही. म्हणून त्यांचे आजोबा भास्करशास्त्री यांस 'विद्वन्मुकुटरत्न' अशी जी पदवी मिळाली होती, तीच पदवी शास्त्रीबुवांसहि देणें योग्य ठरलें असतें! 'केसरी'चें हें मत म्हणजे तत्कालीन महाराष्ट्रांतील सर्व सुविद्य जनतेचें प्रातिनिधिक मत होय, असें म्हणण्यास मुळीच हरकत नाही.

शास्त्रीबुवांच्या या ७५ व्या वाढदिवसाच्या निमित्तानें महाराष्ट्रांत इतरहि अनेक ठिकाणी त्यांचा सत्कार झाला या वेळेपर्यंत त्यांस एकंदर विसांहून अधिक शालजोड्या मिळाल्या; त्यांतील एक विसावी शालजोडी सातारा येथील आपल्या घरांतील श्रीरामाच्या शिवमंदिरांतील शाळुंकेपुढें ठेऊन, शास्त्रीबुवांनी साष्टांग नमस्कार घातला। या वेळीं त्यांस कृतकृत्यतेचें जें समाधान लाभलें असेल, त्याची कल्पनाच केलेली बरी!

या वेळीं शास्त्रीबुवांचे थोरले चिरंजीव प्रा. काशीनाथपंत अहमदाबाद येथे सरकारी गुजराथ कॉलेजमध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून कित्येक वर्षांपूर्वीच स्थिर

झाले होते व दुसरे चिरंजीव श्री गंगाधरपंत हेहि सरकारी शिक्षणखात्यात कायम झाले होते दोघेहि चिरंजीव सुस्थितीत असल्यामुळे सेवानिवृत्तीनंतरहि शास्त्रीबुवा पुण्यास स्वतःच्या घरात पत्नी उमाबाई याच्यासह राहून निश्चितपणे सुखात काळ घालवीत होते. शिवाय १९२९ साली आपल्या पहिल्या घराच्या मागील बाजूस असलेलें दुसरे घर (जवळजवळ बखळ) शास्त्रीबुवानी आपल्या चिरंजीवाच्या मदतीने विकत घेतले होते त्या ठिकाणी दुसरे नवीन घरहि बांधले होते दोनतीन नातवंडे पुण्यास शास्त्रीबुवाजवळ राहत असत व त्याचे संगोपनहि ते प्रेमळपणे व योग्य रीतीने करीत असत, जणू वानप्रस्थाश्रम पत्करून विद्योपसनेतच आपला सर्व काळ ते व्यतीत करीत होते। प्रारंभापासूनच शास्त्रीबुवाच्या प्रपंचातील सर्व लहानमोठ्या गोष्टींची जबाबदारी बहुतांशी सौ उमाबाई दक्षतेने पार पाडीत असल्यामुळे शास्त्रीबुवाना ही विद्योपासना निर्वेधपण करता आली म्हणून शास्त्रीबुवांच्या आयुष्यातील यशात सौ उमाबाईचा बराच मोठा वाटा आहे हे उघड आहे

'शास्त्रीबुवाचे एकदर आयुष्य कसे गेले?' असा प्रश्न केल्यास, त्याचे उत्तर 'सुखात गेले' असेच देता यईल 'त्या दिवसापासून (पुण्यास आल्यापासून) माझा योगक्षेम उत्तम चालत आला आहे' असे त्यानी स्वतः १९३८ च्या आपल्या भाषणात म्हटले आहे 'या त्याच्या सुखी जीवनाचें रहस्य कशात आहे?' असे विचारल्यास 'तीन गोष्टीत आहे — शुद्ध नैतिक आचरण, ऐहिक सुखाविषयी अगदी मर्यादित अपेक्षा व नित्य सत्कार्यमग्नता या तीन गोष्टी होत त्यामुळे शास्त्रीबुवाचें आयुष्य एकदरीत सुखात गेले' असे म्हणावे लागल, कारण शुद्धाचरणामुळे मनस्तापाचा प्रसग त्याच्यावर कधीच आला नाही, पुण्यास आल्यापासून म्हणजे वयाच्या सत्ताविसाव्या वर्षापासून, सवसामान्य गरजास पुरेसा पैसा त्यास मिळाला व त्यापेक्षा अधिक पैसा मिळविण्याची आकाक्षा त्यानी बाळगलीच नसल्यामुळे त्याच्यावर निराश होण्याचा प्रसग कधी आला नाही आणि विद्योपासनेसारख्या सत्कार्यात ते नेहमी निमग्न असल्यामुळे प्रपंचातील बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष देण्यास त्यास फुरसतच सापडली नाही व अलौकिक ज्ञानानंदाचा लाभ घडून शेवटी तर त्यानी स्वतः म्हटल्याप्रमाणे जन्मसाफल्याचेहि समाधान त्यास प्राप्त झाले।

— — —

शास्त्रीबुवाचे दोघे वडील बधु दामूअण्णा व रघुनाथशास्त्री यासही मानवेळी (सन १९३८च्या सुमारास) एकदरीत बरा काळ प्राप्त झाला होता या तिघां बधूमध्ये नुसता स्नेहभाव होता एवढेच नव्हे, तर शेवटपर्यंत त्याच्यामधील

घनिष्ठ संबंध कायम होते वडील व मातोश्री यांच्या श्राद्धप्रसंगी सर्वजण बहुधा सातारला एकत्र जमत याशिवाय विवाहादि मंगल कार्ये, मोठ्या सुट्ट्या अथवा प्लेगसारखे अडचणीचे प्रसंग, या सर्व निमित्तांनी वर्षांतून अनेक वेळा त्यांचे एकत्र राहणे होई यामुळे त्यांचे संबंध अत्यंत जिव्हाळ्याचे असून शेवटपर्यंत ते तसेच कायम होते सेवानिवृत्त होऊन दामूअण्णा पुण्यास आपल्या चिरंजिवाजवळ राहावयास आल्यानंतर, रोज एकदा तरी शास्त्रीबुवांकडे येऊन भेटून जात असत म्हणूनच आपले चिरंजीव श्री नीलकंठराव तथा राजाभाऊ यास त्यांनी पुण्यास गावातच घर विकत घेण्यास सांगितले शास्त्रीबुवा व त्यांचे दोघे वडील बंधु यांचे हे घनिष्ठ संबंध अजूनहि त्यांच्या पुत्रपौत्रांपर्यंत टिकून राहिले आहेत आजहि श्री राजाभाऊ यांची प्रा काशीनाथपंत तथा बापूसाहेब यांच्याकडील रोजची फेरी कधी चुकत नाही रघुनाथशास्त्र्यांचे दोघे चिरंजीव वे शा स गोविंदशास्त्री तथा भाऊसाहेब व दिगंबरपंत तथा अप्पासाहेब परगावाहून कारणपरत्वें नित्य प्रा काशीनाथपंताकडे येतात व अभ्यंकर–कुटुंबातील लग्नकार्यादि मंगल समारंभ नेहमीच एकमेकांच्या सहकार्याने पार पडत असतात सर्वच कुटुंबीया-मध्ये आपल्या घराण्याविषयी योग्य तो अभिमान असून, आपल्या घराण्याच्या लौकिकास व कुलदीपक ठरलेल्या शास्त्रीबुवांच्या निर्मळ कीर्तीस साजेसे वर्तन ठेवण्याची कोशीस करताना ते सर्वजण दिसतात

* * *

# ११ : बंधु, पुत्रपौत्र इत्यादि

शास्त्रीबुवाचा आपल्या बंधूंशी व पुत्रपौत्रादिकांशी किती घनिष्ठ अथवा जिव्हाळ्याचा संबंध होता, यासंबंधी थोडेसें दिग्दर्शन मागील प्रकरणाच्या अखेरीस केलेंच आहे. त्यवरून शास्त्रीबुवांच्या आयुष्यात त्यांच्या बंधु-पुत्रपौत्रादिकांस महत्त्वाचें स्थान आहे हें उघड आहे. म्हणून त्यांच्याविषयी काही विशेष माहिती सांगण्याचें येथे योजिले आहे.

## (१) वडील बंधु दामूअण्णा

शास्त्रीबुवांचे सख्खे ज्येष्ठ बंधु दामअण्णा (सन १८५६–१९३८) यांचं प्रारंभीचे काही संस्कृत अध्ययन पितामह भास्करशास्त्री ह्यात असताना घरच्या संस्कृत पाठशाळेंतच झाले. भास्करशास्त्री वारले त्या वेळी दामूअण्णांचं वय पंधरा वर्षांचे होतें, पण भास्करशास्त्र्यांच्या निधनानंतर पुढील पिढीतील सगळेच लोक जुन्या संस्कृत विद्याभ्यासांत कशाला? बदलत्या काळास अनुसरून चरितार्थाचें महत्त्वाचें साधन या दृष्टीने कोणास तरी इंग्रजी शिक्षण देणं आवश्यक आहे अशा विचाराने त्यांस सातारा येथील सरकारी इंग्रजी शाळेंत घातलें होतें. साताऱ्याचे सुप्रसिद्ध वकील दादासाहेब करंदीकर दामूअण्णांच्याच वयाचे असून या शाळेंत दोघेजण एकाच वर्गात शिकत होते. दादासाहेब करंदीकरांना अभ्यंकर घराण्याविषयी अतिशय आपलेपणा वाटत असे. दुर्गाकाकूंना ते भक्तिभावानं वंदन करीत व महर्षि रामशास्त्र्यांस गुरु मानीत. त्या वेळी इंग्रजी पाचवीतील विद्यार्थ्यांना सरकारी पब्लिक सर्व्हिस एक्झॅमिनेशनला बसता येत असे, परंतु ती परीक्षा फक्त पुण्यास होई व त्या वेळी साताऱ्याहून पुण्यास जाण्यासाठी आगगाडीची सोय नव्हती, (ती सोय पुढें नोव्हेंबर १८८६ मध्ये झाली) आणि एखादा मनुष्य बरोबर देऊन बैलगाडीने त्यांस पुण्याला या परीक्षेस पाठविण्यासाठी त्यांच्या मातोश्रीजवळ आर्थिक अनुकूलता नव्हती. म्हणून त्या परीक्षेचा नाद सोडून व घरची मयकर आर्थिक स्थिति ध्यानात घेऊन दामूअण्णांनी नोकरीची खटपट सुरू केली व लवकरच त्यांना पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटमध्ये सन १८७७ मध्ये नोकरी मिळालीहि. तथापि आजारीपणामुळे ही नोकरी त्यांस लवकरच सोडावी लागली. मग त्यांनी खटपट करून थोड्याच दिवसांत पोस्ट-खात्यात नोकरी मिळविली व त्यांची पहिली नेमणूक त्या वेळी सातारा जिल्ह्यातील कोल्हापूर रत्नागिरी रस्त्यावरील मलकापूर या ठिकाणी शाखे

या वेळी त्यास दरमहा १०-१२ रुपये पगार मिळत असे व त्यातीलच दोन-चार रुपये स्वतच्या प्रपचखर्चासाठी ठेवून उरलेले सर्व पैसे ते न चुकता प्रत्येक महिन्यास पोस्ट खात्याच्या नोकरवर्गामार्फत (त्या वेळी मनीआर्डरीने पैसे पाठविण्याची सोय नव्हती) सातारला आपल्या मातोश्रीकडे पाठवीत असत भास्कर-शास्त्री वारल्यानतर विशेषत पहिली बारा वर्षे रघुनाथशास्त्री व वासुदेवशास्त्री याचे व्याकरणाचे अध्ययन पूर्ण होईपर्यंत दामूअण्णाच्या पैशाचा त्याच्या मातोश्रीस खरा मुख्य आधार होता त्यानतर मग विशेषत रघुनाथशास्त्री भिक्षुकी करून प्रपचास थोडाबहुत हातभार लावू लागले तरीसुद्धा त्यानतर आणखी सुमारे सात वर्षे आपले सर्व शिक्षण पूर्ण करून सन १८९० मध्ये वासुदेवशास्त्री पुण्यास जाऊन आपल्या पगारातील काही रक्कम दरमहा सातारला पाठवू लागेपर्यंत सातारच्या सर्व कुटुबास दामूअण्णाचाच मुख्य आर्थिक आधार होता! स्वत चे शिक्षण अपुरे ठेवून, आपल्या ऐन उमेदीतील सुमारे वीस वर्षे दामूअण्णानी कुटुबासाठी जो त्याग केला, तो खरोखरच अपूर्व आहे! म्हणूनच त्याच्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत घराण्यातील सर्वांत वडील माणूस म्हणून त्यास सर्वजण विशेष मान देत असत.

भास्करशास्त्री वारल्यानतर दामूअण्णाचा पहिला विवाह सन १८७२ मध्ये त्याच्या वयाच्या सोळाव्या वर्षी त्याचे मामा श्री गणपतराव गद्रे यानी जुळवून आणला, परतु सुमारे दीड वर्षातच ही पत्नी वारली व त्यानतर सुमारे एक वर्षाने त्याचा दुसरा विवाह सातारचे श्री नारायणभट आगाशे याची कन्या मथूताई याच्याशी झाला त्या वेळी मथूताईंचे वय सुमारे नऊ वर्षाचे असून, वासुदेवशास्त्री याच्यापेक्षा त्या एकच वर्षाने मोठ्या असल्यामुळे लहानपणी दोघेहि एकत्र खेळत असत हा त्याच्यामधील स्नेहभाव अखेरपर्यंत कायम राहिला होता

नोकरीत असताना मोर, लोणद, कोल्हापूर, महाबळेश्वर रहिमतपूर, तासगाव, सागली, इत्यादि सातारा जिल्ह्यातील अनेक ठिकाणी दामूअण्णाची बदली झाली होती नोकरीमध्ये अत्यत सचोटीने काम करणारे म्हणून त्याचा लौकिक होता. दर वर्षी उन्हाळ्यात सर्व सरकारी खात्यातील प्रमुख अधिकारी महाबळेश्वरला जात असल्यामुळे तेथे सीझनपुरते पोस्टात काही अधिक लोक मदतनीस म्हणून पाठविण्यात येत असत अशा लोकामध्ये दामूअण्णाहि तेथे जात काही वर्षानतर दामूअण्णा महाबळेश्वरला सबपोस्टमास्तर झाले विशेषत सीझनमध्ये तेथील पोस्ट-मास्तरास पुष्कळ जबाबदारीचे काम करावे लागे दामूअण्णानी महाबळेश्वरला पोस्टमास्तर म्हणून अनेक वर्षे काम केले आहे यावरून त्याचा प्रामाणिकपणा व कामातील वाकबगारी, याविषयी कोणाचीहि खात्री पटण्यासारखी आहे १९१३ साली दामूअण्णा सेवानिवृत्त झाले, त्या वेळी त्यास अवघा साठ रुपये मासिक पगार

होना, म्हणून त्याना तीस रुपये पेन्शन मिळू लागले सेवानिवृत्तीनतर सागलीस ते राहू लागले

दामूअण्णा धार्मिक प्रवृत्तीचे हाते वयाच्या सुमारे ४५ व्या वर्षापासून सप्तशतीचा पाठ ते दररोज करू लागले व अत्तरपर्यंत त्यामध्ये कधी खड पडला नाही. ते थोडेसे तापट स्वभावाचे असल्यामुळ घरातील सर्व मडळी त्यास नेहमी वचकून असत त्याना फक्त एक अपत्य झाले व ते म्हणजे त्याचे एकुलत एक चिरजीव श्री. नीलकठराव तथा राजाभाऊ हे होत आपल्या बदल्यामुळे राजाभाऊच्या शिक्षणाची आबाळ होऊ नय म्हणून ते मराठी तिसऱ्या इयत्तेत असतानाच दामूअण्णानी त्यास पुणे येथे वासुदेवशास्त्र्याच्या घरी आणून ठेवले व मॅट्रिक होईपर्यंत राजाभाऊ तेथेच राहिले शास्त्रीबुवाच्या घरात ते इतके समरस झाले होते की, 'शास्त्रीबुवास तीन मुलगे आहेत' असेच कित्येकास वाटे त्यानतर मात्र दामूअण्णानी राजाभाऊस फर्ग्युसन कॉलेजच्या वसतिगृहात ठेवून त्याच्या शिक्षणाचा सर्व खर्च स्वत केला –दामूअण्णाचा हा सर्व जीवनक्रम ध्यानात घेतल्यानतर शास्त्रीबुवाच्या ७५ व्या वाढदिवसाच्या सत्कारसमारभ–प्रसगी दामूअण्णास अतिशय गहिवरून आले, या गोष्टीतील मर्म आपल्या ध्यानात येईल

## नीलकठराव तथा राजाभाऊ

हे दामुअण्णाचे एकुलते एक चिरजीव (जन्म १८९० साली) याच्या वयाच्या पाचव्या वर्षी वडिलानी मोठ्या हौसेने सातारा येथ त्याची मुज केली शास्त्र विषय घेऊन ते सन १९१२ मध्ये बी ए परीक्षा उत्तीर्ण झाले त्यानतर १४ वर्षे कराची येथील सरकारी हायस्कूलमध्ये त्यानी शिक्षकाचे काम केले त्यानतर पुण्याच्या डिरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शनच्या ऑफिसमध्ये सन १९२७ ते १९४५ पर्यंत त्यानी मुख्यत सुपरिंटेंडट म्हणून काम केले १९४५ साली ते सेवानिवृत्त झाल्यानतर लगेच शिक्षणखात्यातच स्पेशल ऑफिसर म्हणून त्याची पुन्हा नेमणूक झाली १९४९ साली एस एस् सी परीक्षा बोर्डाचे सेक्रेटरी म्हणून ते सपूर्ण सेवानिवृत्त झाले त पुण्यास म प कॉलेजजवळ 'गगावतरण' या स्वत च्याच बगल्यात १९३५ पासून राहत आहेत १९०६ साली त्याचा प्रथम विवाह झाला त्या पत्नी वारल्यानतर १९३५ साली त्याचा दुसरा विवाह झाला या द्वितीय पत्नी सन १९६२ मध्य दिवगत झाल्या १९३७ व १९३८ साली त्यानी वडील व मातोश्रीसह काशी व रामेश्वरच्या यात्रा केल्या राजाभाऊस प्रथम पत्नीपासून एक कन्या व दोन मुलगे असून त्या सर्वांचे विवाह झाले आहेत द्वितीय पत्नीपासून त्यास तीन कन्या असून, त्यापैकी थोरलीचा विवाह झाला आहे

## (२) द्वितीय वडील बंधु रघुनाथशास्त्री तथा काका.

रघुनाथशास्त्री तथा काका (सन १८६१ ते १९४८) वासुदेवशास्त्र्यांपेक्षा दोनच वर्षांनी वडील असल्यामुळे ते व वासुदेवशास्त्री यांचे संपूर्ण शास्त्राध्ययन बरोबरच झाले. घरच्या पाठशाळेत रामशास्त्री यांच्याजवळ त्या दोघांनी संपूर्ण व्याकरणशास्त्राचे व इतरहि काही शास्त्रांचे अध्ययन एकाच वेळी पूर्ण केले. त्यामुळे वासुदेवशास्त्र्यांचा काकांशी अत्यंत जिव्हाळ्याचा घनिष्ठ संबंध आला. हे सांगणे नकोच. दामूअण्णांच्या वारंवार बदल्या होत असत व वासुदेवशास्त्री कित्येक वर्षे पुण्यास भाड्याने राहत होते, त्यामुळे साताऱ्याचे घर हेच अभ्यंकर-कुटुंबाचे मुख्य घर ठरले. वडिलोपार्जित देवहि तेथेच होते व अजूनहि आहेत. सर्व कुळधर्म अजूनहि साताऱ्यालाच होतात. त्यामुळे अनेक नित्यनैमित्तिक कार्यांस वासुदेवशास्त्र्यांचे साताऱ्याला पुष्कळ वेळा जाणे येणे घडत असे. अर्थातच मोठेपणीहि वासुदेवशास्त्र्यांचा काकांशी घनिष्ठ संबंध शेवटपर्यंत कायम राहिला. काकांचा पहिला विवाह त्यांच्या वयाच्या सोळाव्या वर्षी झाला होता. ती पत्नी वारल्यानंतर, थोड्याच दिवसांनी काकांचा दुसरा विवाह झाला. या पत्नीचे नाव सौ. सीताबाई असे होते. वाईचे प्रसिद्ध पंडित, धर्ममार्तंड भाऊशास्त्री केळे हे सौ. सीताबाईंचे चुलतभाऊ होत. पितामह भास्करशास्त्री यांचेनंतर महर्षि रामशास्त्री यांनी चालविलेल्या विद्यादानाला मदत करावी व पुढेहि ते व्रत आजन्म चालवावे असा मनःसंकल्प — नव्हे निश्चय — करून काकांनी दुसरीकडे योगक्षेमाची अधिक चांगली व्यवस्था होत असताहि सातारा शहर सोडले नाही. गुरुवर्य रामशास्त्री यांच्याप्रमाणे धर्मानुष्ठान सांभाळून राहिलेला सर्व काळ त्यांनी घरीच अध्यापन-कार्यात घालविला. काही वर्षे सातारा येथील पाठशाळेतहि ते मुख्याध्यापक होते. रोजचे आन्हिक, होम-हवन, जप इत्यादि नित्यनैमित्तिक धार्मिक आचरण ते मोठ्या कटाक्षाने पाळीत असत. रोज सायंकाळी घरच्या देवळातील ओंकारेश्वरास त्यांची एकादशिनी कधी चुकली नाही. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांचे थोरले चिरंजीव गोविंद-शास्त्री यांनी हे रोजचे शिवएकादशिनी व्रत चालू ठेवले आहे. रोज सप्तशतीचा पाठ काका करीत असत, तसेच, मधून मधून सप्तशतीचे अनुष्ठानहि त्यांचे चालू असे. तीन चार वेळा त्यांनी रुद्रस्वाहाकार केला होता. मृत्यूपूर्वी दोनच महिने त्यांनी महारुद्र-स्वाहाकार व शतचंडीचे हवन केले होते.[1] विद्वत्ता, अध्यापननिष्ठा, नैष्टिक धर्माचरण, शांत स्वभाव, त्यागवृत्ति इत्यादि गुणांमुळे केवळ त्यांच्या शिष्यांस नव्हे, तर साताऱ्यातील सर्वच लोकांस त्यांच्याविषयी अत्यंत पूज्यभाव वाटे. या वंदनीय व्यक्ति-मत्त्वामुळेच, काकांचा भिक्षुकी पेशा असून व प्रपंचाचा पसारा मोठा असूनहि प्रपंच-खर्चाची तोंड मिळवणी करताना त्यास कधी अडचण पडली नाही. काकांनी सातान्यास अनेक शिष्य तयार केले, त्यांपैकी दत्तुशास्त्री वैद्य व गोपाळशास्त्री करवेळकर हे साताऱ्यास येथे वे. म. गणेशशास्त्री जोशी व सदाशिवशास्त्री काशीकर हे पुणे येथे

आणि सखारामशास्त्री गळमार्मी हे पेन्शनर्स अध्यापन-कार्य करीत आहेत. शहरातील अनेक विद्याप्रेमी गृहस्थानीहि त्याच्या विद्वत्तेचा लाभ घेतला लहानपणा-पासून एकत्र पढलेले आपले धाकटे बंधु वासुदेवशास्त्री १९४२ साली निवर्तल्यामुळे त्याच्या मनाला अतिशय धक्का बसला पुढे १९४८ साली (भाद्रपद कृष्ण द्वितीया, तारीख १८७० रोजी) सत्तरीनोजप मुखाने करीत असतानाच त्याच देहावसान झाल।

**गोविंदशास्त्री तथा भाऊसाहेब** हे धावाचे वडील चिरजीव (जन्म १८९६ साली) यानी फलज्योतिषशास्त्राचा उत्तम अभ्यास केला असून, वडिलाच्या व पूर्वजाच्या तप सामर्थ्याने त्याना वाक्सिद्धिहि प्राप्त झाली आहे, कारण त्यानी मागितल्याप्रमाणे व्रतानुष्ठान केले असता कार्यसिद्धि होते, असा लोकाचा अनुभव आहे १९१३ साली गोविंदशास्त्र्याचा विवाह झाला पत्नीचे नाव सौ सावित्रीबाई असे आहे गोविंदशास्त्र्यास तीन मुलगे व पाच कन्या आहेत त्यापैकी दोघे चिरजीव व चार कन्या याचे विवाह झाले आहेत

**दिगबरपत तथा अप्पासाहेब :** हे काकाचे द्वितीय चिरजीव (जन्म १९०८ साली) हे बी ए बी टी झालेले आहेत हे काही वर्षे बसमतनगर येथील ट्रेनिंग कॉलेजचे प्राचार्य होते त्यापूर्वी अनेक वर्षे त्यानी कराची येथील सरकारी हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून काम केलें होत १९४८ साली पाकिस्तान झाल्यानतर ते इकडे भारतात आले. नुकतीच त्याची बदली रत्नागिरीस डेप्युटी इन्स्पेक्टर म्हणून झाली आहे १९२९ साली दिगबरपताचा विवाह झाला पत्नीचे नाव सौ मनोरमाबाई असे आहे त्याना तीन मुलगे व दोन कन्या आहेत त्यापैकी थोरले चिरजीव व थोरली कन्या याच विवाह झाले झाले आहेत

## (३) थोरले चिरजीव प्रा काशीनाथपत तथा बापूसाहेब

प्रा काशीनाथपत (जन्म सन १८९० मध्ये) हे शास्त्रीबुवाचे थोरले चिरजीव होत. आतापर्यंत त्याचा अनेकदा उल्लेख केला आहे, त्यावरून शास्त्रीबुवाच्या चरित्राशी त्याचा कितो घनिष्ठ सबध होता याची सहज कल्पना करता येईल याचा जन्म झाल्या-नतर थोड्याच महिन्यानी शास्त्रीबुवा पुण्यास कायमचे राहण्यासाठी आल्यामुळे याचे सर्व शिक्षण पुण्यास झालें उपनयनापूर्वीच रूपावली, अमरकोश व काव्यें याचे शिक्षण त्यानी शास्त्रीबुवाच्या शिष्यवर्गाकडून घेतले उपनयनानतर त्यास व्याकरणशास्त्राचा पहिला धडा महर्षि रामशास्त्री यानी तोडीच सिद्धान्तकौमुदीतील काही भाग पढवून दिला त्यानतर सस्कृत पाठशाळेत सन १९०६ पर्यंत सपूर्ण सिद्धान्तकौमुदी, मनोरमा-शब्दरत्नाचा थोडा भाग व काव्यें याचे अध्ययन त्यानी उपगुरुजीजवळ केले तसेच, शास्त्रीबुवाजवळहि त्यानी परिभाषेन्दुशेखर, कुवलयानन्द, तर्कसग्रह व माघ काव्याचा

काही भाग यांचे अध्ययन पाठशाळेतच केले त्यांचे मॅट्रिक्युलेशनपर्यंत इंग्रजी अध्ययन पुण्याच्या नव्या वाड्यात न्यू इंग्लिश स्कूलमध्ये झाले. १९०७ साली मॅट्रिक परीक्षेमध्ये पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळवून त्यांनी मोठा बहुमान संपादन केला त्यानंतर एम् ए पदवीपरीक्षेपर्यंतचे त्यांचे सर्व शिक्षण फर्ग्युसन कॉलेजमध्ये झाले युनिव्हर्सिटीच्या सर्व परीक्षांमध्ये त्यांनी संस्कृत विषयात प्रथम क्रमांक मिळवून संस्कृत विषयाकरिता असलेल्या सर्व शिष्यवृत्त्या व पारितोषिके मिळविण्याचे अद्वितीय यश संपादन केले हे कॉलेजचे शिक्षण चालू असताना त्यांनी शास्त्रीबुवांजवळ व्याकरण, न्याय, पूर्वमीमांसा, वेदान्त इत्यादि शास्त्रांतील उच्च प्रतीचे अध्ययन केले

१९०६ साली काशीनाथपंतांचा प्रथम विवाह झाला या पत्नी १९१२ साली वारल्यानंतर १९१३ साली काशीनाथपंतांचा द्वितीय विवाह सासवडातील श्री लाटे वकील यांच्या कन्येशी झाला या पत्नीचे सासरचे नाव सौ इंदिराबाई असे आहे १९१३ साली एम् ए परीक्षेला बसण्यापूर्वीच गुजरात कॉलेज, अहमदाबाद येथे संस्कृतचे उपप्राध्यापक म्हणून काशीनाथपंतांची नेमणूक झाली १९१९ साली त्याच कॉलेजमध्ये संस्कृत विषयाचे मुख्य प्राध्यापक म्हणून त्यांची नेमणूक झाली त्या जागी सतत २६ वर्षे अध्यापन करून, १९४५ साली ते सेवानिवृत्त झाले त्या नंतर गुजरात विद्यासभेच्या अध्यापन-संस्थेत सन्मान्य संस्कृत प्राध्यापक म्हणून संस्कृत विषयामध्ये एम् ए व पीएच् डी या उच्च पदव्यांकरिता अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांना मार्गदर्शन करण्याचे काम त्यांनी अनेक वर्षे केले व हल्ली भांडारकर प्राच्यविद्या संशोधन-मंदिरात हेच मार्गदर्शनाचे काम ते करीत आहेत व्याकरणशास्त्राच्या अभ्यासामुळे प्रा काशीनाथपंतांस प्राप्त झालेल्या बुद्धीच्या सूक्ष्मतेचे कौतुक करताना गुजरात कॉलेजचे इंग्रज प्राचार्य त्यांस 'पॅणिनि' असे म्हणत असत १९५३ साली गोवर्धनपीठाचे श्रीमच्छंकराचार्य (योगेश्वरानंद) यांनी प्रा काशीनाथपंतांस महामहोपाध्याय' ही पदवी अर्पण केली १९२३ साली मुंबई विद्यापीठाने अर्धमागधी विषयात प्रथमच एम् ए ची परीक्षा चालू केली, तेव्हा प्रा काशीनाथपंतांस परीक्षक म्हणून नेमण्यात आले होते त्यानंतर गुजरात कॉलेजमध्ये अर्धमागधी विषयाचे अध्यापन करण्याचे कामहि त्यांनी अंगावर घेऊन तदंगभूत जैनदर्शन व वाङ्मय यातील प्रगत अध्ययन त्यांनी शास्त्रीबुवांजवळ केले व बौद्धदर्शनावरील काही ग्रंथांचे अध्ययन त्यांनी विद्वद्वर धर्मानंद कोसंबी यांच्याजवळ केले

कॉलेजमध्ये अध्यापनाचे काम करीत असताना काशीनाथपंतांनी उत्तररामचरित, मुद्राराक्षस व स्वप्नवासवदत्ता या तीन नाटकांचे टिप्पणीसहित प्रकाशन केले, कुम्मापुत्तचरिय दसवेआलियसुत्त व विंशतिविंशिका ह्या तीन अर्धमागधी पुस्तकं दुर्मिळ असल्यामुळे त्यांचे संपादन करून प्रकाशन केले व [illegible] [illegible] ५ पुस्तकांचे संशोधन करून सटीक संपादन केले जैमिनीच्या उपदेशसूत्र

नावाच्या पाग्ज्योतिष ग्रंथावर संस्कृत टीका लिहून व त्याला प्रस्तावना जोडून काशी-नाथपंतानी त्याचेहि संपादन केले; शास्त्रीबुवांनी संपादित केलेल्या सिद्धान्तबिन्दु व श्रीमाष्य या ग्रंथास प्रस्तावना लिहिल्या व सर्वदर्शनसंग्रहाच्या सूची तयार केल्या

सेवानिवृत्तीनंतर प्रा काशीनाथपंतानी केलेले वाङ्मयीन कार्य तर फारच मोलाचे आहे —

व्याकरण महाभाष्याच्या मराठी अनुवादाचे पहिले दोनच भाग शास्त्रीबुवांच्या हयातीत प्रसिद्ध झाले होते, परंतु १९४५ साली सेवानिवृत्त होऊन पुण्यास आल्यानंतर प्रा काशीनाथपंतानी उरलेल्या ३ ते ६ या भागांचे संपादन केले व व्याकरणमहाभाष्यास पाचशें पृष्ठांच्या अत्यंत मौलिक प्रस्तावनाखंडाची[1] जोड दिली। याशिवाय काशीनाथ-पंतानी शास्त्रीबुवांच्या व्याकरणमहाभाष्याच्या मराठी भाषांतराच्या पुनर्मुद्रणाचे संपादन तर केलेच, पण पण त्यासाठी जरूर ते आर्थिक साहाय्यहि डे ए सोसायटीला दिले डॉ कीलहॉर्न यांच्या परिभाषेन्दुशेखराच्या पुनर्मुद्रणाचे संपादन करताना मूळ सहितबरोबर शास्त्रीबुवांची अप्रकाशित तत्त्वादर्श टीका त्यांनी प्रसिद्ध केली व या आवृत्तीस सर्वांगपूर्वक विद्वत्तापूर्ण (सुमार ४० पृष्ठांच्या) प्रस्तावनेचीहि जोड दिली शास्त्रीबुवांच्या व्याकरण – महाभाष्याच्या मराठी अनुवादावर आधारलेल्या त्याच ग्रंथाच्या हिंदी अनुवादाचेहि मुद्रण त्यांच्या संपादकत्वाखाली चालू आहे संस्कृत व्याकरणकोश ( Dictionary of Sanskrit Grammar') या त्यांच्या चारशें पृष्ठांच्या स्वतंत्र ग्रंथाने संस्कृत शास्त्रीय वाङ्मयात फारच महत्त्वाची भर पडली आहे[2] कोणत्याहि विद्यापीठाने प्रा काशीनाथपंतास या ग्रंथावर डी लिट् पदवी द्यावी, इतक्या अद्वितीय स्वरूपाचा हा ग्रंथ आहे म्हणून संस्कृत व्याकरणकोशकार ' ही अद्वितीय पदवी प्रा काशीनाथपंतासच देता येईल त्यांनी संपादिलेल्या 'परिभाषा-संग्रह' या प्रचंड ग्रंथामध्ये संस्कृत व्याकरण-परिभाषावरील दुर्मिळ स्वतंत्र ग्रंथ मिळवून, एकत्रित केले आहेत त्यांपैकी जैनेन्द्र व्याकरण-परिभाषावर स्वतंत्र ग्रंथ नसल्यामुळे त्यांनी स्वत च परिभाषा– वृत्ति लिहिली तसेच कील्हॉर्न-मुद्रित व्याकरण-महाभाष्याच्या पुनर्मुद्रणाचे संपादन-कार्यहि ते करीत आहेत ' वाक्यपदीयम् ' व 'व्याकरण-महाभाष्यदीपिका या दोन ग्रंथांच्या सटीप संपादनाचे काम आचार्य वि प्र लिमये यांच्या सहकार्याने त्यांनी पूर्ण केले असून अनुक्रमें पुणे विद्यापीठ व भांडारकर प्राच्यविद्या संशोधन-मंदिर या संस्थातर्फे त्या ग्रंथाचे मुद्रण चालू झाले

---

१ या प्रस्तावना खंडाचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथात अनेकदा आला आहे

२ आठ-दहा वैयाकरणांनी मिळून करावयाचा हा ग्रंथ प्रा काशीनाथपंतानी एकट्याने तयार केला, हे त्यास अत्यंत भूषणास्पद आहे

बी एसृसी झाले असून,पुण्यासच ऑर्डनन्स फॅक्टरीमध्ये चार्जमन आहेत तिसरे चिरंजीव माधवराव (जन्म – १९४३) हे पदवी पूर्व कॉमर्स परीक्षा उत्तीर्ण झाले आहेत कन्या सुशीलाबाई बी ए होऊन बी टी चा अभ्यास करीत आहेत

शास्त्रीबुवांच्या पौत्र-मंडळींसहि परस्परांविषयी आपलेपणा वाटत असल्यामुळे अभ्यंकर कुटुंबात नेहमी खेळीमेळीचे वातावरण पसरलेले आढळते, ही त्यांच्या पूर्वजांची पुण्याईच नव्हे काय ?

* * *

# १२ : अखेरचें पर्व

१९४२ साल उजाडलें अन् शास्त्रीबुवाच्या आयुष्यातील जणू अखेरचें पर्व सुरु झालें ! कारण या वर्षाचा जानेवारी महिना अर्धाअधिक सपला नाही तोच एकदा शास्त्रीबुवा अतिशय आजारी पडले ! एकें दिवशी तर ताप फार वाढल्यामुळे मधून मधून ते गैरशुद्धीतच होते ! डॉक्टर यऊन त्याना औषध देत असता, स्वभावत स्पष्टवक्त्या असलेल्या सौ उमाबाईंनी (शास्त्रीबुवाच्या पत्नी) डॉक्टराम विचारलें, "हे मला नेहमी आदवामन देतात की माझा मृत्यु याचे अगोदर आहे, पण आजचा प्रकार काय ?" यावर शास्त्रीबुवानी 'माझें बोलणे खरे झाल्याशिवाय राहणार नाही !" एवढें एकच वाक्य स्पष्टपणे उच्चारलें व डॉक्टराना सौ उमाबाईची प्रकृति पाहण्यास सांगितलें त्याप्रमाणे डॉक्टरानी सौ उमाबाईना तपासून 'घराबाहेर फारसे पडू नका, जिन्याची चढउतार करु नका,' अशी त्यास सूचनाहि दिली आश्चर्याची गोष्ट अशी की, यानतर चारच दिवसानी दि २६ जानेवारी १९४२ रोजी पहाटे पाच वाजता सौ उमाबाई अथरुणावर उठून उभ्या राहिल्या असता एकदम खाली पडल्या, व त्याचें प्राणोत्क्रमण झालें ! – यानतर शास्त्रीबुवाच्या प्रकृतीला आराम पडू लागला, परन्तु आपलाहि काळ आता जवळ आला, हे त्यानी जाणले असावे !

साठ वर्षे एकनिष्ठपणें आपली सेवा करणाऱ्या आपल्या दिवगत पत्नीची शास्त्रीबुवास वारवार आठवण होई ! पत्नी वारली त्या वेळी पतिव्रतेच्या मन स्थितीचें चित्रण करणारा पुढील श्लोकार्ध शास्त्रीबुवाच्या तोडून ऐकण्यात आला –

पदन्यासो गेहाद् बहिरहिफणारोपणसम
पुमानन्य कान्ताद विधुरिव चतुर्थीसमुदित ।

(पतिव्रतेनें घराच्या बाहेर पाऊल टाकणे म्हणजे सापाच्या डोक्यावर पाऊल ठेवण्यासारखें आहे आणि पतीशिवाय दुसरा मनुष्य म्हणजे गणेशचतुर्थीच्या चद्राप्रमाणे पाहण्यास निषिद्ध असा तिला वाटतो ) आपल्याहि प्रकृतीचा फारसा भरवसा नाही हें ध्यानात घेउन शास्त्रीबुवानी स्वत होऊन प्रा काशीनाथपतास, त्याचे वडील चिरजीव श्री गजाननराव तथा दादा याचा विवाह उरकून घेण्याची त्वरा करण्यास सांगितलें शास्त्रीबुवाच्या म्हणण्याप्रमाणे दादाचा विवाह उरकून घेण्यात आला त्यानतर शास्त्रीबुवा अवघे सहा महिने हयात होते ! सौ उमाबाई वारल्यानतर सहा महिने शास्त्रीबुवाच्या शुश्रुषेसाठी त्याच्या थोरल्या सूनबाई सौ इदिराबाई (प्रा काशीनाथपताच्या पत्नी) पुण्यासच राहिल्या होत्या सौ इदिराबाईंनी अहमदाबादच्या आपल्या स्वयपाकीणबाईंना या वेळी पुण्यास आणले त्यामुळे शास्त्रीबुवाच्या शुश्रूषेकडे त्याना विशेष लक्ष देता आलें सहा महिन्यानतर शास्त्रीबुवाचे दुसरे चिरजीव श्री गगाधरपत यानी शास्त्रीबुवाच्या शुश्रूषेसाठी

मुक्काम पुण्यास आपली बदली करून घेतली आणि ते व त्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई शास्त्रीबुवांच्या प्रकृतीची काळजी घेऊ लागले. श्री. गंगाधरपंत पुण्यास आल्यानंतर अर्थातच सौ. इंदिराबाई अहमदाबादला परत गेल्या. अशा प्रकारें वृद्धापकाळातील शरीरमनाच्या विकल अवस्थेंत शास्त्रीबुवांच्या शुश्रूषेचें कार्य त्यांच्या दोघा चिरंजीवांनी व सूनबाईंनी अतिशय मनापासून केले, हे सर्वांसच भूषणावह आहे. असे प्रेमळ व कर्तव्यदक्ष पुत्र-स्नुषा लाभणे थोर भाग्याचे आहे यात काय संशय? —अथवा शास्त्रीबुवांच्या ठिकाणी असलेल्या कर्तव्यदक्षता, सौजन्य, विनय इत्यादि आदर्श सद्गुणांचा त्यांच्या कुटुंबीयांवर प्रभाव पडला नसता, तरच ते नवल ठरलें असते!

या अखेरच्या काळातहि शास्त्रीबुवांचे ग्रंथलेखन अल्प प्रमाणात का होईना, पण चालूच होतें. व्याकरण–महाभाष्याच्या मराठी अनुवादाची प्रस्तावना[1] त्यांनी पूर्ण केली. त्या प्रस्तावनेच्या शेवटी ते म्हणतात—

" भाष्यस्यार्थंबुभुत्सूनां सौलभ्येनार्थबुद्धये।
यदो भाषान्तरं श्रीशो मया समुदपादयत् ॥"

["महाभाष्याचा अर्थ जाणू इच्छिणाऱ्या लोकांना तो अर्थ सहज समजावा, यासाठी हें भाषांतर परमेश्वराने माझ्याकडून लिहवून घेतलें "]—उतारवयात अनंत अडचणींना तोंड देऊन प्रयत्नांची पराकाष्ठा करून शास्त्रीबुवांनी हें भाषांतर पूर्ण केले असल्यामुळे,[2] त्याचा कर्ता-करविता परमेश्वर आहे, अशा अर्थाचे हे त्यांचे उद्गार अधिकच यथार्थ ठरतात. त्यांचा कायपरिशुद्धि ग्रंथ १९३९ सालीच प्रसिद्ध झाला असल्यामुळे आता त्यांनी साधनपरिशुद्धि व मोक्षपरिशुद्धि या आपल्या संकल्पित ग्रंथांची विभावना सुरू केली, परंतु तें काम आपल्या हातून पूर्ण होणे शक्य नाही असे वाटल्यावरूनच की काय, त्यांनी आपण लिहिलेल्या व संपादन केलेल्या अशा सर्व ग्रंथांची यादी[3] करून व त्यांपैकी तेरा ग्रंथांना 'आमोद' असे नाव दिले, वगैरे कथाभाग मागे दिला आहेच, [याच ग्रंथातील पृ. ५० पाहा] या सर्वांवरून हेंच सिद्ध होते की, तेरा आमोद–ग्रंथ लिहून झाल्यामुळे आपल्या जन्माचें सार्थक झालें असे वाटून समाधानयुक्त अंतःकरणाने शास्त्रीबुवा कालक्रमण करू लागले.

आश्विन महिन्याच्या कृष्णचतुर्थीच्या दिवशी रात्रीपर्यंत सर्व दैनिक व्यवहार नियमाप्रमाणे उरकून, एवढेंच नव्हे तर जेवणानंतर रात्री पुरुषोत्तमशास्त्री रानडे

---

१ या प्रस्तावनेचा उल्लेख मागे पृ. ७७ वर आलाच आहे.
२ शास्त्रीबुवांच्या या प्रकाशन महत्त्व मागे (पृ. ७५ ते ८० वर) वर्णिले आहेच.
३ ही संपूर्ण यादी प्र. ग. पृ. ४८ वर दिली आहे.

कुटुंबीय मंडळी इ स (१९१३)



उभ्या डावीकडून — १) सौ गंगाबाई नीळकंठ २) सौ सत्यभामाबाई दामोदर ३) सौ उमाबाई वासुदेव ४) सौ इंदिराबाई काशीनाथ खुर्चीवर डावीकडून — १) नीळकंठ दामोदर २) दामोदर महादेव ३) श्रीमती दुर्गाबाई (मातुश्री) ४) प वासुदेवशास्त्री महादेव ५) काशीनाथ वासुदेव खाली बसलेले – गंगाधर वासुदेव

कुटुंबीय मंडळी (इ. स. १९४२)



खुर्चीवर १) सौ. इंदिराबाई काशीनाथ २) श्री. गजानन काशीनाथ ३) म. म. वासुदेवशास्त्री ४) सौ. हिराबाई गजानन
५) सौ कमलाबाई गंगाधर

त्याच्याबरोबर वेदान्तविषयक चर्चा करून ते झोपी गेले पहाटे (बुधवार, दि १४ ऑक्टोबर १९४२ रोजी ) चारच्या सुमारास जाग आल्यावर थोरला आला म्हणून त्यानी नहमीप्रमाणे खडीसाखर खाल्ली व थोडेसे पाणीहि प्यालें त्यानतर सूर्योदयापूर्वीच त्याच्या इच्छेप्रमाणे शरीराला काही एक पीडा न होता अत्यत शात व समाधानवृत्तीने त्याचा आत्मा शिवस्वरूपी विलीन झाला !

— गुरुवार, दि १६–१०–१९४२ च्या 'केसरी'च्या अकात संपादक श्री ज. स. करदीकर यानी 'महाराष्ट्रातील विद्वन्मणि हरपला !' असे शीर्षक देऊन शास्त्रीबुवाच्या मृत्यूसबधी एक ल्हानसे स्फुट दिले आहे व त्यामध्ये शास्त्रीबुवाचें व्यक्तिमत्त्व व वाङ्मयीन कार्य याची थोडक्यात ओळख करून दिली आहे त्यामध्ये "कोणत्याहि शास्त्रार्थासबधाचा त्याचा (वासुदेवशास्त्र्याचा) सल्ला अनेकास मिळे व तो साहजिकच प्रमाण मानला जाई ' असे शास्त्रीबुवाचें जें एक वैशिष्ट्य सपादकानी सागितलें आहे, तें ध्यानात ठेवण्यासारखें आहे

'पूना ओरिएटॅलिस्ट' या मासिकात शास्त्रीबुवाचा मृत्युलेख लिहिताना प्रा चि रा देवधर यानी शास्त्रीबुवाच्या वाङ्मयीन कार्याची ओळख करून देताना व्याकरण-महाभाष्याच्या मराठी अनुवादाचें[१] अद्वितीयत्व वर्णन करून शास्त्रीबुवाना 'महाराष्ट्राचे पतजलि' हीच पदवी शोभून दिसेल असे म्हटलें आहे श्री श्रीधर व्यकटेश केतकर यानी ज्ञानकोशाचें मराठीत रूपातर केल्यामुळें 'ज्ञानकोशकार' ही पदवी त्यास ज्याप्रमाणे सार्थ ठरते त्याचप्रमाणे शास्त्रीबुवानी भगवान् पतजलीच्या व्याकरण-महाभाष्याचें मराठीत उत्कृष्ट रूपातर केल्यामुळें त्यासहि 'महाराष्ट्राचे पतजलि' ही पदवी अगदी सार्थ ठरते म्हणून आम्हासहि महाराष्ट्राचे पतजलि असाच शास्त्रीबुवाचा उल्लेख करावासा वाटतो या बाबतीत अतिशयोक्तीचा दोष आमच्या पदरी येतो, असे आम्हास मुळीच वाटत नाही, तथापि या प्रसगी आम्हास श्रीहर्षाच्या नैषधीयचरितामधील पुढील उक्तीची आठवण होते —

" वाग्जन्मवैफल्यमसह्यशल्य गुणाद्भुते वस्तुनि मौनिता चेत् ।
खलत्वमल्पीयसि जल्पिते ऽपि तदस्तु बन्दिभ्रममूमिकैव ॥"

[ "लोकोत्तर गुणानी चकित करून सोडणाऱ्या व्यक्तीच्या बाबतीत मौन धारण करणे म्हणजे आपणास मिळालेली वाणीची देणगी फुकट दवडण्यासारखें असून, त्या अपराधाचे शल्य खरोखर असह्य आहे ! त्या गुणाद्भुत व्यक्तीचे वर्णन अगदी अल्प अथवा ऊनोक्तीने केले असताहि दुष्टपणाचा दोष पदरी येतो, म्हणून खोटाम भासणारी स्तुतिपाठकाची भूमिका पतकरणेंच बरे ! " ] गुणाद्भुत लोकोत्तर

व्यक्तीच्या बाबतीत मौन पाळण्याचा अथवा ऊक्तीचा दोष पत्करण्यापेक्षा अतिशयोक्तीचा दोष बरा, असे वरील उक्तीचे तात्पर्य आहे म्हणून आम्ही शास्त्रीबुवास 'महाराष्ट्राचे पतञ्जलि' असे म्हणणेच पसंत करतो

आमरण ज्ञानमय तपश्चर्या करणाऱ्या शास्त्रीबुवांच्या उदाहरणावरून सर्वांस ज्ञानोपासनेची प्रेरणा मिळो, हीच सदिच्छा ! त्या महर्षींच्या या जन्मशताब्दीप्रसंगी त्यास शतशः प्रणाम असोत ! !

* * *

# परिशिष्टें

परिशिष्ट १ लें :

# म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर

### यांच्या

## आठवणी

### (१)

### पं. गणेशशास्त्री शेण्डये

[ मुख्याध्यापक, संस्कृत पाठशाळा, पुणें २ ]

अयि श्रेष्ठाः प्रियवाचकाः श्रीमतां पुरस्तात् कानिचित् मे गुरुचरणानां श्रीवासुदेवशास्त्रिणां पुण्यस्मरणानि स्थापयामि ।

पूर्वं वेदम् अधीत्य अहं पुण्यपत्तनस्थसंस्कृतपाठशालाम् आगतवान् । तदानीं पाठशालायां गुरुत्रयम् आसीत्—(१) कै. अभ्यंकरवासुदेवशास्त्रिणः (२) कै. गोडबोलेगणेशशास्त्रिणः (३) कै. गोडबोलेकृष्णशास्त्रिणः । प्राथमिकं काव्यं स्त्रीप्रत्ययान्तां कौमुदीं च अध्यापयन्ति स्म कृष्णशास्त्रिणः । ततः संपूर्णां कौमुदीं गणेशशास्त्रिणः अध्यापयन्ति स्म । कौमुद्याः पाठं श्राव्यं तर्हि गणेशशास्त्रिभ्य एव ईश्यासीत् तेषाम् अध्यापनपद्धतिः । एवमेव उच्चैः स्वरेण समस्तं दिनम् अध्यापनम् । मया साकं परिभाषेन्दुशेखरस्य आवृत्तिरपि प्रतिदिनं तेनैव स्वरेण ।

कौमुद्युत्तरं मनोरमायाः पाठनं सर्वेषामपि म. म. वासुदेवशास्त्रिण एव अकुर्वन् । एतत् अध्यापनं प्रातःकाले सप्तवादनादारभ्य सार्धहोरां यावत् । प्रायः प्रथमतः वेदान्तग्रन्थानाम् अध्यापनं परन्तु तत् विद्यार्थिनां कृते किन्तु ये शास्त्रिणः गणेशशास्त्रिणः, तथा शङ्करशास्त्रिणः, काशीकरादयः तेषां कृते एव । तदुत्तरं व्याकरणपाठः । व्याकरणपाठेऽपि गणेशशास्त्रिणः विहाय उपरिनिर्दिष्टं शास्त्रिद्वयं श्रोतुं तत्र अवर्तत । सार्धहोरात्मकं पाठनं व्याकरणसदृशोऽपि रूक्षो विषयः अनया रीत्या पाठ्यते स्म यत् विद्यार्थी गतं कालं न जानाति । इयं मनोरमा प्रौढानामेव मनः रमयति व्यवहारेऽपि मनोरमा प्रौढानामेव मनः रमयति न बालानां नाम मूर्खाणाम् । यस्य कण्ठे 'मुक्तावलिः' तस्यैव वश्या मनोरमा, एतादृग् विनोदोऽपि तत्र आसीत् । पाठसमये विद्यार्थिना पठ्यमाना पठनीया हि अर्थो विधन्तीय । कस्यापि शास्त्रस्य पाठसमये तेषां हस्ते पुस्तकं नासीत् । अथानन्तरं विद्यार्थिना यदि किमपि पृष्टं तर्हि बोधनम् अपूर्वमेव सुस्पष्टं निवेदनीयम् ।

ते शुद्धा इति कदापि नास्माभिर्दृष्टा । मासद्वय मनोरमाया पाठ सवृत्त । एकदिन ते अपृच्छन् 'अये पाठस्य चिन्तनिका क्व करोषि' यत मया साकम अध्येता नासीत् कोऽपि । अहमुक्तवान् 'स्वयमेव क्व क्व करोमि ।' तत्क्षणमेव ते प शङ्करशास्त्रिण अब्रुवन्, शास्त्रिन, भवन्त एव अमु चिन्तनिका पाठय तु इति । *तद्दिनादारभ्य शङ्करशास्त्रिण चिन्तनिकाम् अपाठयन् । तेन अह सर्वम् अध्ययन* आरमशात् कृतवान् । शास्त्राध्ययने चिन्तनिकाया अतीव महत्वम् । चिन्तनिका नाम अधीतस्य तद्दिने एव पुनरध्ययन । तत् विद्यार्थिना अन्येन विद्यार्थिना साक करणीयम । तेन तदानीमव अध्यापनस्यापि शिक्षण भवति । अस्या पाठशालाया म म वासुदेवशास्त्रिण, प. शङ्करशास्त्रिण प गणेशशास्त्रिणश्च इमे व्याकरणस्य मुनित्रयमव आसीत् ।

गुरुचरणा वासुदेवशास्त्रिण मतभेदेन वेदशास्त्रोत्तेजकसभाम् अमुञ्चन् । तस्मिन्नेव वर्षे मम तृतीय परीक्षणम् आसीत सभायाम् । केचन तत्पक्षपातिनो जना माम् आगत्य अब्रुवन् यत् त्वम् अस्या सभाया परीक्षार्थं मा गच्छेति । मत्पुरत प्रश्न समागत किं कर्तव्य मया । तदाहीं गुरुचरणाना समीप गतवान् । असमये ममागमनम् अवलोक्य तैं पृष्ट 'किमद्य ?' । अहम उत्तरितवान् परीक्षाविषये किं करणीय यत केचन श्रीमद्भि सभा परित्यक्ता अत त्वमपि मा गच्छ परीक्षार्थम् इति कथयन्ति । तत्क्षणे एव तैरुक्तम एव मा कुरु मन मतभेदो यद्यपि मम वर्तते तदर्थं सभामपि अह त्यक्तवान् तथापि तत्र विद्यार्थिना क सबन्ध । त्वम अवश्यमेव गच्छ परीक्षायम् । एवम् आज्ञा गृहीत्वा परीक्षार्थं गतवान् परीक्षाऽपि उत्तीर्णा । अनन्तर गच्छता कालेन तैरुक्त स्व वेदशास्त्रोत्तजक सभया साक निरन्तर सबन्ध स्थापयेति । अत एतावत्कालपर्यन्त तया सभया साक मम घनिष्ठ सबन्धो वर्तते ।

गुरुचरणानाम् एतादृश मतमासीत यत अध्यापनस्य अध्ययनस्य च अनध्यायदिन मुक्त्वा विरामो न ग्राह्य । यदि समयो न स्यात् तर्हि पङ्क्तिद्वय पठनीय परन्तु अद्य अध्ययन नास्ति एव न हि । वैदिका यथा ब्रह्मयज्ञार्थं प्रतिदिन सहितादि पठन्ति तथा ते ब्रह्मयज्ञार्थम अष्टाध्यायी कौस्तुभ च पठन्ति स्म ।

स्वगुरुविषये तेषा कियती भक्ति श्रद्धा च आसीत इति द्रष्टव्यम् । एकदा न्यायालये धर्मशास्त्रविषये कमपि विषय निर्णेतुम् इमे नियुक्ता । एभि सा नियुक्ति स्वीकृता परन्तु एकस्मिन दिने रात्रौ ते एव स्वप्न दृष्टवन्त यत् कं पू रामचन्द्रशास्त्रिण आगत्य अकथयन् अये, एतादृशे विवादकमणि त्व प्रवृत्तो मा भवेति । *तत दृष्ट्वा अपरस्मिन दिने प शङ्करशास्त्रिण्य ते अकथयन यत अह* न गच्छामि न्यायालय श्रीमन्त एव तत्कार्यं कुर्वन्तु इति । तेषाम आज्ञा इति

शाङ्करशास्त्रिणः गत्वा तत् कार्यम् अकुर्वन्। अस्मिन् कर्मणि मुद्राणां पञ्चशतं लाभः आसीत्। इदानीं प्रत्यक्षतया गुरुणा उक्तोऽपि शिष्यः तद्वाक्यं न स्वीकुर्यादिव कुतः स्वप्नश्रुतम्।

संस्थानदरभङ्गात् आगच्छत् प्रतिवर्षं त्रिशतरूप्यकमितं द्रव्यं यदा अवरुद्धं तद्दिनादारभ्य पणकमपि अगृहीत्वा अपाठयन् गुरुचरणाः पाठशालायाम्। तत्राऽपि एकं दिनमपि अपरित्यज्य अध्यापनम्। द्रव्यं गृहीत्वापि बहुतरं पत्रिकां प्रेषयित्वा अनागच्छन्तः अध्यापकाः कुत्र इमे च कुत्र।

एकदा गुरुचरणैः साकं अहं सागलीनगरं गतवान् तत्रस्य पाठशालायाः परीक्षार्थम्। तदा मध्येमार्गं बहव्यः कथाः सम्भूताः भिन्नभिन्नविषयकाः। तत्र तैरुक्तम्। अहं शास्त्राध्ययनमकरवम्। परन्तु तत्र जीवनोपायः कोऽपि नासीत्। अतः सातारस्थैः वैदिकैरुक्तं त्वं वेदाध्ययनं कुरु। तदानीं वेदाध्ययनम् आरब्धम्। अष्टाभिः संख्याभिः मुखोद्गतं कृतवान् एकम् अध्यायम्। यः विशिष्टबुद्धियुतः स एव अष्टाभिः संख्याभिः अध्यायं कण्ठस्थं कर्तुं शक्नोति सामान्यबुद्धियुतः षोडशभिः संख्याभिः एवं वेदाध्ययनं विधाय स्मार्तयाज्ञिकं पठितम्। अनेन वेदाध्ययनेन तेषां कियती ग्रहणबुद्धिशक्तिः सा स्पष्टीभवति। बहुकालं कथाः संभूताः। मध्ये अहम् उक्तवान् अस्मत्प्रवासे एका न्यूनता वर्तते। तैरुक्तं का सा। अहम् उक्तवान् अस्मत्सविधे घटीयन्त्रं नास्ति। तदानीं ते कथयन्ति अये एवं पश्य घटीयन्त्रं प्रतिस्थानकं वर्तते। यत् गृहं वयं गच्छामः तत्र घटी वर्तते। तर्हि स्वसमीपे एव घटीस्थापनेन को वा अधिको लाभः। तत् श्रुत्वा अहं तूष्णीमेवाभवम्।

एकदा अध्ययनं दृढं परन्तु तत् कथं तिष्ठेत् इति अहं पृष्टवान्। तदानीं तैरुक्तम् अध्यापनं विना अध्ययनं स्थिरं न भवति। इदानीं कालो विरुद्धः यदि विद्यार्थिनं लभसे तर्ह्येव अध्ययनं स्यात् परन्तु दैनंदिनं पठनं मा मुञ्च। इदानीं स्वप्नेऽपि पठनं प्रचलति वा न वा इति ते पृच्छन्ति। भवतु एतावत् लिखित्वा विरमामि।

इति शम्।

* * *

# धर्मप्राण भगवानशास्त्री धारूरकर, पंढरपूर

म. म. विद्वद्रत्न गुरुवर्य वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या ठिकाणच्या अनेक सद्गुणसमुच्चयांच्या वेगवेगळ्या पैलूंचे विविध दर्शन त्यांच्या सांनिध्यात आलेल्या प्रत्येकास झाल्यावाचून राहत नसे. प्रत्येक वेळीं त्यांच्या वागण्याबोलण्यातून त्यांच्या गुणांच्या नवनवीन अगाधा प्रत्यय प्रकर्षानें येई. अशाच प्रसंगापैकी एक दोनच खाली वानगीदाखल देत आहें –

(१) हिवाळ्याचे दिवस पौष माघ महिन्यातील कडक थंडी सकाळीं सहाचा सुमार त्या वेळीं वासुदेवशास्त्री नियमितपणें शाळेंत येत असत. येताना अंगावर शाल असे, पण त्यावरून उपरणें पांघरून घेत असत. माझ्या मनात येई कीं पंडित लोक शाल वरून मुद्दाम पांघरतात व हे तर उपरणें वाहेरून जोडून शाल कां पांघरतात? ही शंका माझ्या मनात घोळत असे, पण हें कोडें परमगुरुवर्य पंडित रामशास्त्री गोडबोले कैलासवासी झाल्यानंतर उलगडलें, कारण नंतर लक्षात आले कीं ते गुरूचा मान राखण्यासाठी तसे करीत होते!

(२) मी धर्मशास्त्राच्या परीक्षेस बसणार होतों. परीक्षेस असलेल्या ग्रंथांपैकी धर्मसिंधु ग्रंथातील सापिण्ड्य प्रकरणात मातृपितृसापिण्ड्याच्या २१२१ मुली वर्ज्य होतात असें लिहिलें आहे. ती संख्या कशी होते असे विचारलें असता वगैरे ग्रंथातील प्रमाणे देत न बसतां, लागलीच जवळ असलेल्या टोपलींतून बेल घेऊन चटकन् त्यांनीं मांडून दाखवून थोडक्यात स्पष्टपणें समजावून दिले! कोणत्याहि शास्त्राचा दुर्बोध विषय सुबोध करून समजावून सांगण्यात त्यांचा हातखंडा असे.

* * *

## प्रा. य. र. आगाशे, एम्. ए.

फर्ग्युसन कॉलेजात असताना १९१४ ते १९१८ या अवधीत बी. ए आणि एम्. ए वर्गातील विद्यार्थी या नात्याने वासुदेवशास्त्र्यांच्या समृद्ध अध्यापनाचा लाभ प्रस्तुत लेखकाला मिळाला, हें भाग्य होय. मम्मटाचा काव्यप्रकाश, रामानुजाचार्यांचे श्रीभाष्य, श्रीशांकरभाष्य इत्यादि शास्त्रीय विषयांवरील त्यांच्या व्याख्यानांचा विशेष म्हणजे 'पूर्णता गौरवाय' या शब्दांनीच सांगितला पाहिजे. त्यांच्या अधिकारी वाणीचा अस्खलित ओघ सुरू झाला म्हणजे प्रतिपाद्य विषयाचें संपूर्ण विश्लेषण व्हावयाचें, आणि न्याय, व्याकरण, मीमांसा इत्यादि दर्शनांतील संदर्भ आणि परिभाषा यांची उत्तम प्रकारे स्पष्टता व्हावयाची. कारण साहित्यशास्त्र किंवा वेदान्त यावरील उपन्यास आणि चर्चा यांच्या अनुरोधानें इतर शास्त्रांचे उल्लेख अनेक वेळा येतात आणि त्यांची उकल होणें आवश्यक असतें. अशा सर्व शंकास्थलांचे निराकरण कै. शास्त्रीबोवांच्या व्याख्यानांत निःसंदिग्धपणें होत असे. पाठ्यग्रंथाच्या अध्यापनाचें माप जिज्ञासूंच्या पदरांत पुरेपूर पडत असे.

एकाच गोष्टीचा निर्देश करावयाचा, तर त्यांचे चारित्र्य आणि उदार व्यक्तिमत्त्व बोलण्याचालण्यामध्यें, विचार-आचारामध्यें त्यांच्या वृत्तीचें औदार्य आणि पावित्र्य अनुभवास येत असे त्यांचे उत्तम संस्कार त्यांच्या विद्यार्थ्यांवर झाल्याशिवाय कसे राहतील? त्यांच्या पुण्यस्मरणानें आम्ही नतमस्तक व्हावें. विद्याव्यासंगानें पुनीत झालेलें त्यांचे जीवन म्हणजे एक मोठा यज्ञ होता! त्यांतील निःस्वार्थी उज्ज्वळ परंपरा यज्ञार्थच होती.

* * *

## डॉ. के. ना. वाटवे, पीएच्. डी.

[ माजी प्राध्यापक, सर परशुरामभाऊ कॉलेज, पुणे. ]

गुरुवर्य म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या शिष्यत्वाची औपचारिक दीक्षा मी १९१५ साली घेतली तो प्रसंग सांगण्यासारखा आहे. शास्त्रीबुवांचे गुरुजी रामशास्त्री गोडबोले हे पुण्यास येण्यापूर्वी सातान्यात राहात असत व तेथे अध्यापन करीत असत. तेथील त्यांच्या शिष्यांपैकी रामशास्त्रीबुवांजवळ कौमुदी शिकणारे एक विद्यार्थी म्हणून माझे ज्येष्ठ बंधु सदाशिवशास्त्री वाटवे हे होते. तेव्हापासूनचाच माझ्या बंधूचा आणि वासुदेवशास्त्र्यांचा घनिष्ठ संबंध होता. माझे बंधु वासुदेवशास्त्र्यांबरोबर पुणे येथे शिकण्यास आले होते व वासुदेवशास्त्र्यांच्या अगाध विद्वत्तेची छाप माझ्या बंधूवर चांगलीच पडली होती. दोघेहि गुरुबंधूच, परंतु वासुदेवशास्त्री हे फार श्रेष्ठ दर्जाचे विद्वान असे माझे बंधु मला लहानपणापासूनच सांगत असत. मी १९१५ साली फर्ग्युसन कॉलेजमध्ये पी. ई. च्या वर्गात नाव दाखल केले. त्यानंतर तीन-चार महिन्यांनी माझे बंधु माझी आणि शास्त्रीबुवांचा परिचय करून देण्यासाठी मुद्दाम पुण्यास आले. त्या वेळीं शास्त्रीबुवा आज जेथे प्रभात टॉकीज आहे त्याच्या समोरच्या घरातील माडीवर राहत असत. त्यांच्याकडे जाण्यापूर्वी आमच्या बंधूंनी एक हार, गुच्छ, फळें व पेढे घेतले. आम्ही दोघे शास्त्रीबुवांच्याकडे माडीवर गेलों. शास्त्रीबुवांचा लेखन-व्यवसाय चालूच होता. भोवताली पुस्तके रचलेलीं होतीं. शास्त्रीबुवांची ती प्रशांत मूर्ति एखाद्या प्राचीन मुनीसारखी बसलेली मला दिसली. सदाशिवशास्त्री आणि वासुदेवशास्त्री यांचे औपचारिक बोलणं झाल्यावर माझे बंधु मला म्हणाले, " केशवा, ऊठ आणि हा हार शास्त्रीबुवांच्या गळ्यांत घालून त्यांना नमस्कार कर. ते तुझे आजपासून गुरु झाले आहेत " मी शास्त्रीबुवांना गुच्छ अर्पण केला, फळें व पेढे त्यांच्यापुढे ठेवली व त्यांना साष्टांग नमस्कार घातला. शास्त्रीबुवांनी माझी पाठ थोपटून मला बसावयास सांगितले व माझी चौकशी केली. नंतर ते मला म्हणाले, " तुला जें काहीं संस्कृत पाहिजे असेल तें शिकण्यासाठी तू नगरकर पाठशाळेत जा व त्यातूनहि मला काही विचारावयाचे असेल, तर माझ्याकडे सकाळी येत जा " अशा तऱ्हेने मी शास्त्रीबुवांचा औपचारिक शिष्य झालों.

काही व्याकरण व इतर वाङ्मयग्रंथ अभ्यासण्यासाठी मी काही दिवस नगरकर पाठशाळेत जात असे. पण शास्त्रीबुवांसारख्या महासागराकडे जाण्याची त्या वेळीं

माझी पात्रताच नव्हती. तो योग १९१८ साली आला. १९१८ व १९ साली मी बी. ए. मध्ये होतो. आम्हास त्या वेळी विशेष अभ्यासासाठी शांकरभाष्य व सामान्य अभ्यासासाठी काव्यप्रकाशाचे काही उल्लास लाविले होते. फर्ग्युसनमध्ये गुजराथी, कानडी, सिंधी वगैरे भाषा बोलणारे विद्यार्थीहि असत. म्हणून त्यांच्या सोयीसाठी इंग्रजीतून ते विषय शिकविण्याची व्यवस्था होतीच. त्याप्रमाणे काही प्राध्यापक आम्हास ते विषय शिकवीत असत, परंतु त्या विषयाचे साग्रोपांग आणि सखोल विवेचन आम्हास हवे असे विद्यार्थी म्हणू लागले. त्या वेळच्या संस्कृत प्राध्यापकांच्या संमतीनेच हे विषय शास्त्रीबुवांनी मराठीतून शिकवावे, अशी गोष्ट मुक्रर झाली. सर्व विद्यार्थ्यांना आनंद झाला. इतर वेळी विरळ दिसणारे वर्ग शास्त्रीबुवांच्या वेळीं गच्च भरून गेले! डोक्यावर पागोटें, अंगात काळाभोर पेशवाई पद्धतीचा अंगरखा व रेशीमकाठी उपरणे, अशा पोषाखात शास्त्रीबुवांची धीरगंभीर *मूर्ति वर्गात प्रवेश करती झाली. ते खुर्चीवरहि आसनमांडी घालून बसले व त्यांचा* वाग्गंगौघ सुरू झाला. तो तास काव्यप्रकाशाचा होता व विद्यार्थ्यांच्या विनंतीवरून अत्यंत क्लिष्ट समजला जाणारा दुसरा उल्लासच त्यांनीं विवेचनासाठी घेतला होता. काव्यप्रकाशाच्या दुसऱ्या उल्लासाचे विवेचन विद्यार्थ्यांनी त्या वेळी उपलब्ध असलेल्या प्रा. चांदोरकरांच्या इंग्रजी टिप्पणीवरून व वर्गातील व्याख्यानावरून वाचले व ऐकले होतें, परंतु कोणासहि विषय अजिबात समजलेला नव्हता. चांदोरकरांच्या विपुल टिप्पण्या विद्यार्थ्यांस घोटाळ्यात पाडीत! अशा परिस्थितीत मराठीतून सुरू झालेला तो वाक्प्रवाह विद्यार्थ्यांच्या अंतःकरणात झिरपू लागला! एक साधीच गोष्ट सांगतों —

लक्षणेचे उदाहरण म्हणून काव्यप्रकाशात ‘ गङ्गायां घोषः ’ हें वाक्य आहे. सामान्य विद्यार्थ्याला तो बी. ए. त असला तरी ‘घोष’ म्हणजे काय ते कळत नाही. बरें नोटस्‌मध्ये त्याचे भाषांतर पहावे तर तें ‘ hamlet ’ या शब्दानें केलेले असावे. विद्यार्थ्याला शेक्सपियरचे हॅम्लेटच तेवढें माहीत असतें. त्यामुळें ‘ लुठ् to wallow ’ आणि ‘ to wallow लुठ् ’ या न्यायानें ‘ घोष म्हणजे हॅम्लेट ’ व ‘ हॅम्लेट म्हणजे घोष ’ व ‘ दोन्ही म्हणजे कांहीं नाहीं ! ’ अशी विद्यार्थ्यांची स्थिति होती. शास्त्रीबुवांनी धाराप्रवाही विवेचनात सहज जाता जाता वरील वाक्याचे ‘ गंगेवर गौळवाडा आहे ’ असे भाषांतर सांगितले. ‘ गौळवाडा ’ हा शब्द ऐकताच अनेक विद्यार्थ्यांच्या चेहऱ्यावर समज प्रसन्नपणानें मोहरलेली दिसू लागली. वर्ग निःस्तब्ध होता; भरपूर आवाजात शास्त्रीबुवांचे प्रवचन चालू होतें आणि प्रवचनांत ‘ भिद्यते हृदयग्रन्थिः छिद्यन्ते सर्वसंशयाः ’ याप्रमाणे विद्यार्थ्यांच्या मनांत प्रकाश पडत होता. अभिहितान्वयवादी, अन्विताभिधानवादी, वाक्यपदीय, ‘ गौः शुक्लश्चलो डित्थः ’ इत्यादि अनेक अडेलतट्टू आणि खोडसाळ प्रकरणें स्वच्छ आणि

प्रसन्न दिसू लागलीं शास्त्रीबुवांनी या सर्वांचे संदर्भ स्पष्ट केले त्या वेळेला जवळ-जवळ मृतवत् वाटणारें हें काव्यप्रकाशाचे प्रकरण आम्हांस चैतन्यानें स्फुरलेले दिसू लागलें

शास्त्रीबुवांच्या विवेचनात इतकी स्वच्छता असे की कोणाहि विद्यार्थ्यास कधींहि शंका विचारावी लागत नसे. वाक्यार्थ, उदाहरणे, स्पष्टीकरण इतके विपुल असे कीं विषय कमालीचा विशद होई शास्त्रीबुवांना वर्गांत शिस्त ठेवण्यासाठी स्वतंत्र प्रयत्न कधींहि करावा लागत नसे जो गोष्ट काव्यप्रकाशाची, तीच त्याच्या शाबरभाष्याचीहि होती विशेषत तर्कपाद हा अवघड विषय समजला जातो, परंतु शास्त्रीबुवांचे वदा तवाचन इतके विस्तृत व सखोल होत की तोहि विषय त्यांनी आरशासारखा स्वच्छ करून आमच्यापुढे मांडला कोणतेंहि प्राचीन शास्त्र शिकविताना त्यात मीमांसा, न्याय, धर्मशास्त्र इत्यादि शास्त्राचे संदर्भ येतात. शास्त्रीबुवा ते सर्व संदर्भ स्पष्ट करून सांगत आम्ही असं ऐकून होतो की शास्त्री-बुवांचे व्याकरणविषयावर प्रभुत्व आहे, परतु त्यांच्या शिकविण्यात आम्हाला असं आढळून आलं कीं त्यांचे सर्वच शास्त्रावर प्रभुत्व होतें ' न कश्चिद् धीमताम् अविषयो नाम ' ही उक्ति शास्त्रीबुवांच्या संदर्भांत साथ होती

शास्त्रीबुवांचा व्यासंग, त्यांचे विद्येवरील प्रेम व त्यांचा आत्मविश्वास किती जबर होता, याची एकच आठवण सांगतों १९४० सालीं मी शास्त्रीबुवांना माझ्या बन्धेच्या विवाहाचे निमंत्रण करण्यासाठी गेलों होतों त्या वेळीं शास्त्री-बुवांची प्रकृति बरीच बिघडलेली असून, मी गेलों त्या वेळी ते अस्वस्थच होते औपचारिक बोलणे झाल्यावर, ' हल्लीं तुम्ही काय करता ?' असे त्यांनी मला विचारलें मीं सांगितलें, " मी ' रस ' विषयाचा अभ्यास करीत असून, हल्लीं अभिनवगुप्ताची नाट्यशास्त्रावरील टीका वाचीत आहे पण ती मला अनेक ठिकाणीं समजत नाहीं आपल्याकडे यावे म्हटलें, तर आपली प्रकृति नादुरुस्त दिसते " यावर शास्त्रीबुवा ताडदिशीं म्हणाले, " काय तुमच्या अडचणी असतील, त्यावर खुणा करून तें पुस्तक मजकडे आणून द्या माझी प्रकृति नादुरुस्त असली तरी माझें हें (डोके) अजून शाबूत आहे " असे म्हणून मोठ्या अभिमानानें त्यांनी आपल्या मस्तकास स्पर्श केला. आता शास्त्रीबुवांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल दोन शब्द लिहितों—

शास्त्रीबुवांचा स्वभाव एकंदरींत बोलका कमीच ते नेहमी विचारमग्न व विद्येच्या धुंदींत असत उत्तर आयुष्यांत त्यांना सर्व प्रकारचे वैभव प्राप्त झाले असूनहि त्यांनी वर्तनाची आपली प्राचीन वैदिक पद्धति अणुमात्रहि सोडली नाहीं पोषाख, आहारविहार व इतर व्यवहार ते प्राचीन पद्धतीस अनुसरूनच करीत,

त्यामुळे मला तरी ते नेहमी एक प्राचीन काळचे अत्यंत विद्वान् आणि आचारसंपन्न मुनिच वाटत. १९२६ साली माझ्या थोरल्या बंधूंनी त्यांचे गुरु रामशास्त्री गोडबोले व चिंतामणशास्त्री दातार यांच्या पादुका निपाणीजवळ मुरगूड मठात बसविल्या. त्या वेळी वासुदेवशास्त्री अभ्यंकर, गणेशशास्त्री गोडबोले व शंकरशास्त्री मारुलकर असे तिघे त्या समारंभास वैशाख महिन्यात आले होते. त्या वेळी तेथे त्या प्रांतातील अनेक मंडळी एकत्र झाली होती. तेथे शास्त्रीबुवांचे मधुर आणि उदात्त व्यक्तिमत्त्व मला पाहावयास मिळाले. विद्वान् म्हणून शास्त्रीबुवांचा लौकिक सर्व महाराष्ट्रात गाजत असूनहि व त्या प्रांतात त्यांना पाहावयास लोक दूर मुद्दाम आलेले असूनहि, शास्त्रीबुवांनी आपल्या मोठेपणाचे आणि विद्वत्तेचे अवास्तव प्रदर्शन कधीहि केले नाही.

अशा पावित्र्याच्या एका अत्यंत थोर ऋषि मुनीशी माझा इतका घनिष्ठ संबंध यावा हे माझे थोर भाग्य होय.

* * *

( ६ )

# प्रा. माधव वासुदेव पटवर्धन एम्. ए.

[ सीनियर प्रोफेसर ऑफ संस्कृत, फर्ग्युसन कॉलेज, पुणे. ]

मला वाटते ते दिवस १९२८-२९ च्या फेब्रुवारी मार्च महिन्यातील होते मी डिसेंबर १९२८ पासून एम् ए च्या परीक्षेचा अभ्यास करण्यासाठी सांगलीहून पुण्यास येऊन फर्ग्युसन कॉलेजजवळ लेले क्वॉर्टर्समध्ये राहिलो होतो एम् ए च्या परीक्षेसाठी संस्कृत व अर्धमागधी विषय मी घेतले होते व संस्कृत विषयान्तर्गत अलकार शास्त्र हा वैकल्पिक विषय निवडला होता अलकारशास्त्रावरील दोन पेपरांपैकी एका पेपरासाठी रसगगाधर हा ग्रथ अभ्यासावयाचा होता त्या काळात पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी सध्याच्याप्रमाणे विद्यार्थ्यांना व्यवस्थित मार्गदर्शन मिळण्याची सोय नसे विद्यार्थीच बहुतांशी आपल्या स्वत च्या प्रयत्नानी पाठ्यपुस्तकाचा अभ्यास करीत. रसगगाधर हा ग्रथ जितका सुदर व मनोवेधक, तितकाच त्यातील शब्ददोषचर्चा व इतर दृष्टिकोनातून ठिकठिकाणी आलेली परमतखडनात्मक व स्वमतमडनात्मक चर्चा, यामुळे क्लिष्ट आणि दुर्बोध आहे या ग्रथाचा अभ्यास स्वत च्या प्रयत्नानी करणे मला कठीण वाटू लागले तेव्हा माझे मातुल कै प्रा परशुराम महादेव लिमये याच्या सूचनेवरून मी म म वासुदेवशास्त्री अभ्यकर यांच्याकडे जाऊन त्यांच्यापाशी रसगगाधरामधील कठीण भाग वाचण्याचे ठरविले प्रा लिमये यानी वासुदेवशास्त्री अभ्यकराना एक पत्र पाठवून मला शक्य तैं साहाय्य करण्याविषयी विनती केली मी दर आठवड्यातून तीन वेळा वासुदेव शास्त्रींच्या घरी दुपारी दोन ते तीन वाजेपर्यंत जाऊ लागलो लेले क्वॉर्टर्सपासून वासुदेवशास्त्र्यांच्या घरापर्यंत दुपारच्या रखरखीत उन्हातून जवळजवळ मैल दीड मैल चालून जावे लागे. याप्रमाणे मी जवळजवळ दोन महिनेपर्यंत रसगगाधरातील अलकारप्रकरणांतील बहुतेक सर्व महत्त्वाचे व कठीण भाग वाचून काढले

वासुदेवशास्त्री अभ्यकर मराठीतून विवरण करीत असत त्यांच्या बोलण्यांत पीरगभीर तर्कनिष्ठुरपणा असे कधी विनोद नाही, की हास्याची लकेर नाही, की आवाजात चढउतार नाही विषयाचो त्याची तयारी मात्र इतकी जबरदस्त असे की रसगगाधर हा ग्रथ जरी त्यानी स्वत पुढील डेस्कवर उघडून ठेवलेला असे तरी त्यामध्ये त्यांना क्वचित् पाहाव लागे ! सर्व ग्रथ जवळजवळ मुखोद्गतच होता मी त्यांच्यापाशी रसगगाधरांतील जे उतारे वाचले, ते सर्व शब्दबोध-विषयक व न्यायघटित असल्यामुळे त्यांच्या विवरणांत विनोदाला मुळीच वाव

मिळण्यासारखा नव्हता. शास्त्रीबोवांचे व्याकरण, न्याय, मीमांसा, वेदांत, अलंकार या विषयावरील प्रभुत्व इतके मोठें होतें की, त्यांनी विवरण केल्याबरोबर सर्व शंकाकुशंका नाहीशा होऊन विषयाची चांगली समज पटत असे. मी प्रत्येक दिवशी घरी परत आल्याबरोबर शास्त्रीबोवांनी सांगितलेल्या स्पष्टीकरणावरील विस्तृत टिप्पण्या इंग्लिशमध्ये लिहून काढीत असे. या इंग्लिश टिप्पण्यांची जवळजवळ दीडशें पानांची एक वही दोन महिन्यांत तयार झाली व परीक्षेच्या दृष्टीनें या टिप्पण्यांचा मला फार उपयोग झाला. ही वही अजून माझ्याजवळ आहे व त्यांतील मजकुराचा उपयोग माझ्यानंतर ४।५ विद्यार्थ्यांनी करून ते एम्. ए. च्या परीक्षेत उत्तीर्ण झाले आहेत. शास्त्रीबोवांनी जे हे परिश्रम माझ्यासाठी घेतले, ते मोबदल्याची यत्किंचितहि अपेक्षा न बाळगतां केवळ संस्कृत विद्येवरील प्रेमामुळें व ज्ञानदानाच्या हौसेमुळें, यांत मुळीच शंका नाही. त्यांनी मला जें साहाय्य दिलें त्याबद्दल मी त्यांच्या अत्यंत ऋणी आहें. माझें बी. ए. पर्यंतचे महाविद्यालयीन शिक्षण सांगली येथील विलिंग्डन कॉलेजमध्यें झाल्यामुळे शास्त्रीबोवांच्या अध्यापनाचा लाभ मला झाला नव्हता. पण एम्. ए. परीक्षेच्या पूर्वी दोन महिने त्यांच्यापाशी अध्ययन करण्याची संधि मिळाली त्याबद्दल स्वतःला मी धन्य मानतों.

* * *

# म. म. वासुदेवशास्त्र्यांचें भाषण

[ १९३८ साली शास्त्रीबुवांच्या वयाला पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाल्याबद्दल त्यांचा भव्य सत्कार करण्यात आला त्या वेळी शास्त्रीबुवांनी उत्तरादाखल जें भाषण केलें तें पुढें दिलें आहे ]

अयि भो सभापतय, राजकार्यधुरीणा, राष्ट्रकार्यधुरीणा, तत्तत्सभा-व्यवस्थापका सभ्याश्च,

अद्य सुप्रभातम्, प्रमोदायमानो दिवस यतश्चाग्रभवता आयुष्मता भूयसीभिश्चेतोवृत्तिभिरेकीभूय सवलितमिवाध्यास्यते, किन्तु तत्र काचित् न्यूनता समारूढ्यते यतो मां व्यक्तिं समुद्दिश्य श्रीमतां प्रवृत्तिस्तस्यां व्यक्तौ तादृशी पात्रता नास्ति इति संदिह्यते चेतसा। तथापि धाष्टर्येन समुपस्थितोऽहम्।

जनता यदभिप्रैति तद्वीप्सति जनार्दन ।
इति धाष्टर्यात्प्रवृत्तोऽहं क्षम्यतां भो सभासद ॥
यैश्च याभिश्च तस्याभि साहाय्यकमनुष्ठितम् ।
सर्वैरेव च युष्माभिर्बहूपकृतमिति मे मति ॥
ततो भवद्भिरद्येद प्रेम्णा यत्प्रकटीकृतम् ।
जन्मान्तरेणाप्यानृण्यं संपादयितुमक्षम ॥
सुकृतेन ऋणीव स्याद्विधाता कर्मयन्त्रित ।
यावत्तदानुगुण्येन भोगं संप्रतियच्छति ॥
प्रेम्णो हि मूल्यं नास्त्येव अमूल्यं कथ्यते य ॥
महार्घस्त्रं मानपत्रं मत्समर्पितमादरात् ॥
मन्ये परिणतिर्ह्येषा स्नेहसीनपयोर्ष्णवम् ।
पुत्रप्रणीत स्वदते मर्कटोऽपि यथा पितु ।
नैव गणेशप्रतिमाप्यरिसंपादिता यत ॥
अमूल्यं मन्यते कश्चित् कश्चिच्चैककपर्दिकाम् ।
तदेव वस्तु, वैचित्र्यं स्वस्वापेक्षानुसारत ॥
ग्रासा प्रेम्णा मातृदत्ता पञ्च कुक्षिंभरा स्मृता ।
वृकोदरस्य नान्यस्य खारी पूरयितुं क्षमा ॥
हृदयस्था गुरो पादा सन्निधन्तेऽत्र मृग्यत ।
उत्साहमूर्तिर्विनेया केवलं मत्तनुस्त्वियम् ॥

आचार्यपादुका धत्ते शिरसा भक्तसंहतिः ।
बीजं तु तत्र विज्ञेयं भक्तिरेव हि केवला ।।
उपानत्सर्वसामान्या सेव्या नैव स्वरूपतः ।
किन्तु सपादितो नून महतामाश्रयो यतः ।।
ईशाधीनं जगत्सर्वं यथानियति वर्तते ।
मयात्र शक्यते कर्तुं किमन्यच्छुभचिन्तनात् ।।
स्नेहः सुजनता चेति द्वयोर्यदि समागमः ।
तत्रापत्यस्य जन्म स्याद्दीर्घायुष्ट्वस्य निश्चितम् ।।
ईश्वरः प्राच्यविद्यानां समुत्तेजककर्मणि ।
सप्रेरयतु सर्वाणि मानसान्यधिकारिणाम् ।।
उत्तमोच्छ्वासपर्यन्तं विद्यादेव्या उपासना ।
स्यादप्रतिहता केनाप्येवमर्थयते मनः ।।

आस्तामेतत् । प्रतिपत्तिसौकर्याय सप्रति जन्मभाषा समाश्रये :-

*आपण आज मोठा समारंभ करून माझा जो गौरव केला, त्याबद्दल मी* आपला सर्वांचा फार आभारी आहे. आजचा समारंभ ज्या संस्थेच्या इमारतींत होत आहे त्या संस्थेत पूर्ण ३६ वर्षे काम करून सेवानिवृत्त झाल्यावर आज १० वर्षे झालीं मी संस्थेत काम करीत असताना जो स्नेहसंबंध व आपुलकीची भावना संस्थेतील मडळींनी माझ्याशीं ठेविली होती, त्यापेक्षां काकणभर जास्तच स्नेहसंबंध व भावना या दहा वर्षांचे अवधींत त्यांनी ठेविली व माझ्या अपेक्षेच्या व कल्पनेच्या बाहेर आजचा हा असा अपूर्व समारंभ केला हे त्या भावनेचे निदर्शकच होय.

मी चार तपें म्हणजे ४८ वर्षांपूर्वी या पुण्यनगरीत आलो हे माझ्या पुण्याईचें फलच मी समजतों. मी पुण्यात पाऊल ठेविलें त्याच दिवशीं न्यायमूर्ति रानडे यानी माझ्या योगक्षेमची व्यवस्था केली व ती अशा रीतीनें चालू केली की, ज्याप्रमाणें एखादा वृक्ष योग्य ठिकाणी लावला व त्याची योग्य ती काळजी घेतली म्हणजे तो फोफावतो, *त्याप्रमाणें त्या दिवसापासून आजपावेतों माझा योगक्षेम अत्यंत उत्तम रीतीनें व सुखानें चालत आला आहे या बाबतीत मला अनेक वेळा* न्यायमूर्ति रावसाहेब रानडे व नामदार गोपाळराव गोखले यांची आठवण होते व त्याबद्दल मी त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत या दोन विभूतींच्या सान्निध्यात असता ईश्वरी प्रेरणेनें व पूर्वजांच्या आशीर्वादानें माझ्या हातून सरस्वतीची जी थोडीबहुत आराधना झाली तिचा आपण बऱ्याच अतिशयोक्तिपूर्ण गौरवानें उल्लेख केला आहे.

जुन्या शास्त्रीय परंपरागत पद्धतीनें शिकलेल्या शास्त्रपारंगत आचार्यांची व

त्याच पद्धतीने अध्ययन करु इच्छिणाऱ्या विद्यार्थी परंपरा दिवसेंदिवस लुप्त होत चाललेली पाहून, जे काही आपण गुरुमुखातून पढलों व जें काही आपणास पाठरूपानें तोंडपाठ असलेले ते सर्व ग्रंथरूपानें संगृहीत करून ठेवावें या बुद्धीनें मी टीकात्मक व भाषांतरात्मक ग्रंथ लिहिण्यास सुरुवात केली व अशा रीतीने जें काही व्याकरण, वेदान्त, धर्मशास्त्र, मीमांसाशास्त्र वगैरे शास्त्रांतील ग्रंथसंपादनाचे व नवीन ग्रंथ व प्रबंध लिहिण्याचे काम केले, तें करण्यात मी माझे कुळात परंपरागत आलेले अध्यापनाचे कर्तव्यच बजावलें असे मी मानतों व त्यात माझे हातून काही थोडेंफार कृत्य झालें असे मला वाटत नाही

कुलक्रमागत आलेली व्याकरणविद्या जागृत व्हावी या हेतूने मी व्याकरण-भाष्याचें भाषांतर करण्याचा उपक्रम केला व जो वेळ मला मिळाला, तो त्या कामीं खर्च करून नुकतेच तें भाषांतर मीं पुरें केलें या कामीं मीं माझ्या भाषांतराचे जें वाचण केलें तें पूर्णपणे आकलन करून लिहून काढावयाचे काम वे. शा. सं. शंकरशास्त्री मारुलकर यांनी उत्तम रीतीनें बजावलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें तसेच भाषांतराच्या कामास सुरुवात करते वेळींच श्रीमंत बाबासाहेब, संस्थान इचलकरंजी, यांनी मला बोलावून माझा गौरव करून मला रु २५० अर्पण केले ते मीं या कामीं खर्च करण्याचें ठरविलें, तसेच डेक्कन एज्युकेशन सोसायटीनेंहि मला या बाबतींत जें द्रव्यसाहाय्य केलें तेंहि सर्व या कामाकडे खर्च केलें याशिवाय आणखी या कामीं जो खर्च आला तो मीं स्वत केला व आज डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या साहाय्यानें आरंभिलेलें हें भाषांतर अत्यंत कृतज्ञतापूर्वक सोसायटीला अर्पण करून, मी आज आणलेली हस्तलिखित प्रत आपल्या स्वाधीन करीत आहें व त्यामुळें मला आज ' जातो ममाय विशद प्रकाम प्रत्यर्पितन्यास इवान्तरात्मा ' या कालिदासोक्तीची उत्कट स्मृति होत आहे

*आजचा माझा आपण केलेला गौरव हा सरस्वती देवीचाच गौरव आहे हा* माझा व्यक्तिगत गौरव नाही, असें माझी मनोदेवता मला सांगत आहे. ही सरस्वती देवीबद्दलची भक्ति आपल्या मनात अशीच कायम राहो !

आजच्या प्रसंगीं आपण सर्व मंडळींनी व निरनिराळ्या अनेक संस्थांनी माझा जो आज गौरव केला व शुभेच्छा व्यक्त केली त्याबद्दल पुन एकदा आपणां सर्वांचे व सर्व संस्थांचे मन पूर्वक आभार मानून मी आपली रजा घेतों

* * *

परिशिष्ट ३ रें

## १९३८ सालीं शास्त्रीबुवांस अर्पण केलेलें मानपत्र

महामहोपाध्यायविद्वद्रत्न बिरुद-समलङ्कृता पुण्यपुरीशिरोभूषणायमाना अभ्यंकरकुलावतंस वासुदेवशास्त्रिचरणा ,

वय खलु सुमङ्गलेऽस्मिन्नवसरे तत्तन्महाराष्ट्रदेशनिवासिन निखिलविद्या-सर्वेतस्थानभूतान् पुरुषायुषस्य सु-जीवितस्य त्रीन् पादान् परिसमाप्य षट्सप्ततितमे संवत्सरे पदं कुर्वाणान् अत्रभवत सभाजयितु संमिलिता स्म ।

भवद्गुणगणेन सुदूर समाकृष्टै अस्माभि वक्ष्यमाण किञ्चिदिव विनीत वच कर्णगोचरीकृत्य, समर्प्यमाणा च अल्पीयसी समानता प्रतिगृह्य, मान्यमाननया प्राप्तामोदानस्माननुगृह्णन्तु अत्रभवन्त इति साञ्जलिबन्ध प्रार्थयामहे ।

अपि शास्त्रिवरेण्या , किं नाम पुरुषाणामैहिक जीवित, कथ वा तदन्वर्थता प्रयाति इत्येनमुपन्यास विमर्शयन् आह कश्चन सुभाषितकार —

जीवित तदपि जीवितमध्ये गण्यते सुकृतिभि खलु पुंसाम् ।
ज्ञान–विक्रम–कला–कुललज्जा–त्याग–भोग–सहित सुफल यत् ॥

अयि मान्यवरा , भवज्जीवितसरणिमालोचयन्तो वय प्रमोदपुर सर साभिमान च उद्घोषयाम एतत्सुभाषितानुरोधान्नून समासादितपूर्व भवद्भि सुजीवित-गणनायामस्मामाद्य स्थानमिति ।

' जायमानो वै ब्राह्मण त्रिभिर्ऋणवा जायते" इत्येता श्रुतिमनुरुध्य पारित भवद्भि सुगृहीतनामधेयाना श्रीगोखलेरामशास्त्रिपादाना सनिधौ सप्ततारपुरे अध्ययनम् । तेन च विधिवत्स्वाध्यायेन अर्चिता प्रथम तावत् पाणिनि–कात्यायन–पतञ्जलिप्रभृतय महामुनय तथा च पश्चाद बादरायण–कणाद–जैमिनिप्रमुखा महर्षय । तदनु कृतसमावर्तनै भवद्भि अस्मद्भाग्यवशादेव स्वीयागमनेन इमा पुण्यपुरीं नाम महाराष्ट्रराजधानीं पावयद्भि अत्रत्यसंस्कृतपाठशालाया ' फर्ग्युसन ' महाविद्यालये च आचार्यत्वमङ्गीकृत्य त्यागपूर्वकमध्यापिता परसहस्रा सुचिर छात्रप्रवरा । अन्येषां च संस्कृतविद्यारसिक भवजिगाहिषूणां कृते विनिर्मिता खलु प्रमोदप्रग्रन्थात्मिका तीर्थ–सोपान–पङ्क्ति । प्रदर्शित खलु धर्ममार्गविमूढेभ्य पन्था । परिपालिता प्राचीनमुनिसमता आचारपद्धति । संरक्षिता कुलपरंपरा । किं बहुना । नित्य सत्पदवीमनुसरद्भि भवद्भि प्रकटीकृत कलिकालदमने महान् विक्रम । स्वयं विदत शिष्यवरैश्च विद्यामिव अस्यां महाराष्ट्रभुवि महान् ज्ञान-

परिशिष्ट ४ थें :

# म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांची कुंडली

जन्मसमय–अधिक श्रावण कृष्ण षष्ठी, रात्रीं ८ वाजून ८ मि

ग्रहस्थिति

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| रवि– | सिंह | ५ अंश | | शुक्र | कन्या | २६ अंश |
| चंद्र | मेष | १८ अंश | | शनि | तुला | ६ अंश |
| मंगळ | कन्या | १ अंश | | राहु | धनुस | ४ अंश |
| बुध | सिंह | ९ अंश | | केतु | मिथुन | ४ अंश |
| गुरु | तुला | २४ अंश | | लग्न | मीन | २ अंश |

(जैमिनिमताप्रमाणें) कारककुण्डली




जन्मलग्न कुंडली




निरयन २३ अयनांश

| | | | |
|---|---|---|---|
| लग्न मीन २५° | रवि सिंह २८° | चंद्र वृषभ ११° | मंगळ कन्या २४° |
| बुध कन्या २° | गुरु वृश्चिक १७° | शुक्र तुला १९° | शनि तुला २९° |
| राहु धनु २७° | केतु मिथुन २७° | | |

कारककुण्डलींत शुक्र हा कारकग्रह आहे त्या योगानें राज्यकर्ते व वरिष्ठ अधिकारी यांच्याबद्दल आदर व निष्ठा दाखविली जाते ('राजकीया कामिन शतेन्द्रियाश्च शुक्रे' १ जै सू १–२–१९). त्याप्रमाणेच शुक्र प्रथमगृहीं असल्यामुळें अनेक विषयांत आलोडन करणारी बुद्धि, समाधानी वृत्ति, व विद्याभ्यास व ज्ञानार्जन यांमुळें उपजीविका या दाखविल्या जातात ('पूर्ण-दुशुक्रयोर्भोगी विद्याजीवी च' (जै सु १–२–१५). गुरु द्वितीयगृहीं असल्यामुळें व्याकरणशास्त्राभ्यास, वेदशास्त्रग्रंथाचें ज्ञान, व नानाविद्याप्राप्ति व ग्रन्थकर्तृत्व हीं दाखविलीं जातात ('गुरुणा सर्वविद् ग्रान्थिकश्च' 'विशिष्य वैयाकरणो वेदवेदान्तविच्च' (जै. सु १-२-१०६, १-२-१०८) त्याप्रमाणेच परंपरागत आचारपालन दाखविलें जातें.

('गुरुसंबन्धेन सम्प्रदायसिद्धिः' जै. सू. १-२-११५) सूर्य व बुध बाराव्या गृही असल्यामुळे शिवभक्ति, विष्णुभक्ति व धार्मिकता या दाखविल्या जातात ('रविकेतुभ्यां शिवे भक्तिः बुधशनिभ्यां विष्णौ' (जै. सू १-२-७२-१-२-७६).

जन्मलग्नकुण्डलीत रवि, व शुक्र हे स्वगृही आहेत, चद्र, शनि हे उच्चस्थ आहेत व बुध स्वगृही असून उच्चस्थ आहे अर्थात् ५ ग्रह कल्याणकारक असल्यामुळे विद्या, ऐश्वर्य, धन व सुख याचा उत्तम लाभ दाखविला जातो जन्मलग्न मीन असल्यामुळे धार्मिक जीवन व मोक्षेच्छा दाखविली जातात. नवव्या स्थानी गुरु असल्यामुळे धार्मिक प्रवृत्ति व सदाचारसंपन्नता दाखविल्या जातात दोष म्हणजे जायास्थानी मगळ आहे व तो उच्चीचा किंवा स्वगृही नाही, परंतु त्याच स्थानी उच्चीचा व स्वगृहीचा बुध असल्यामुळे तो दोष नाहीसा होतो

* * *

परिशिष्ट ५ वे

# शास्त्रीबुवांच्या आयुष्यांतील ठळक घटनांची काल-सूची

| | | |
|---|---|---|
| सन १८६३ | ऑगस्ट ४ | सातारा येथे वासुदेवशास्त्र्यांचा जन्म |
| ( शके १७८५ | श्रावण कृष्ण ६) | |
| सन १८६४ | | वडील महादेवभट्ट यांचा मृत्यु |
| ,, १८७१ | जानेवारी १३ | पितामह भास्करशास्त्री यांचा मृत्यु, रामशास्त्री गोडबोले यांच्याजवळ शास्त्राध्ययनास प्रारंभ |
| ,, १८८३ | | व्याकरणशास्त्राचे अध्ययन संपूर्ण |
| ,, १८८४ | | सौ उमाबाई यांच्याशी विवाह |
| ,, १८८७ | | काव्यवेदान्तादि इतर शास्त्रांचे अध्ययन संपूर्ण |
| ,, १८९० | | पुण्यास आगमन व संस्कृत पाठशाळेंत अध्यापनास प्रारंभ |
| ,, १८९२ | | फर्ग्युसन कॉलेजमध्ये शास्त्री म्हणून नेमणूक |
| , १८९८ | | मुंबई विद्यापीठाकडून 'भाला वेदान्त प्राइझ पेपरचे परीक्षक म्हणून नेमणूक |
| ,, १९०२ | | ब्रह्मसूत्र-शांकरभाष्याच्या मराठी अनुवादास प्रारंभ |
| , १९१२ | | मातोश्री व कुटुंबीय यांसह त्रिस्थली- यात्रा |
| ,, १९१८ | | 'अद्वैतामोद या स्वतंत्र ग्रंथाचे लेखन, मातुश्रींच्या इच्छेनुसार सातान्यास सहस्रभोजन घातले |
| ,, १९१९ | | पुण्यास स्वतःचें घर घेतले |
| , १९२१ | | ब्रिटिश सरकारकडून महामहोपाध्याय पदवीचा लाभ |
| ,, १९२४ | | स्वकृत उपोद्घात व टीका यांसह सर्वदर्शन संग्रह ग्रंथाचें संपादन |

| | |
|---|---|
| ,, १९२८ | फर्गुसन कॉलेजमधून सेवानिवृत्ति व व्याकरण महाभाष्याच्या मराठी अनुवादास प्रारभ |
| ,, १९३८ | वयाची ७५ वर्षे पूर्ण झाल्याबद्दल महाराष्ट्रीय जनतेकडून सत्कार, याच प्रसगी शास्त्रीबुवानी आपला व्याकरणमहाभाष्य–मराठी अनुवाद हा ग्रथ पूर्ण करून डे ए सोसायटीस अर्पण केला |
| ,, १९३९ | धायपरिशुद्धि या स्वतत्र ग्रथाचें लेखन |
| ,, १९४२ जानेवारी २६ | पत्नी सौ उमाबाई याचा मृत्यु |
| ,, १९४२ ऑक्टोबर १४ | शास्त्रीबुवाचें देहावसान |

( शके १८६४ अश्विन शुक्ल ४ )

* * *

# श्रीमतां महामहोपाध्यायानां वासुदेवशास्त्रिणां प्रशस्तिः

(प्राध्यापक अनूपराम गो भट्ट, एस् एल डा आर्ट्स कॉलेज अहमदाबाद)

वन्दारुभक्तजनमन्दारतुल्यमरविन्दाक्षमार्तिहरण
पाण्मातुरानुजमपर्णातनूजमतुलानन्तशान्तिवरणम्।
नत्वा पुनामि मम वाणीसरि नूतनवोन्मेषिनीरचनया
श्रीवासुदेव इति विद्यानिधि प्रथितनाम्न स्तावस्य सुधिय ॥१॥

अद्यापि येषा शशिशुभ्रकीर्ति
प्रभास्वरूपेण दिगङ्गनानाम्।
मुखान्यहो मण्डयतीति चित्र
नागेशनाम्ना विदुषा चरित्रम् ॥२॥

तस्यामभूच्छिष्यपरम्परायां
सरस्वतीप्राणसमानमान ।
श्रीनीलकण्ठो ननु नीलकण्ठ
शिव स्वय भूमितलेऽवतीर्ण ॥३॥

तस्य स्वय भास्कर एव साक्षाद
वभूव शिष्यो वसुधातलेऽस्मिन।
अभ्यक्रोपाह्न उपात्तविद्य
ख्याति गतो भास्करशास्त्रिनाम्ना ॥४॥

तस्माद्गुरोर्भास्करशास्त्रिवर्यात्
श्रीरामशास्त्री समवाप्य विद्याम्।
अध्यापयामास कुशाग्रबुद्धि
श्रीवासुदेव स्वगुरो सुपौत्रम् ॥५॥

सपदि लिखितुमेषा लेखनी मे प्रवृत्ता
शशिनि चरमयामे व्योम्नि दूरोदितेऽस्मिन्।
गुणगणगणनाया वासुदेवप्रसादात
प्रभवतु विदुषां सा वासुदेवाभिधानाम् ॥६॥

सद्वर्णा सकलकलाकलापपूर्णा
सद्भावामृतरसवर्षिणी प्रसन्ना।

किं रामा, नहि नहि सा सरस्वतीयं
नित्यं या विलसति वासुदेवकण्ठे ॥७॥

सातारापत्तने यैः परिचितसकलाधीतिबोधप्रचारैः
पुण्यः कर्तव्ययज्ञः परहितनिरतैः पुण्यपुर्यां वितेने।
तेषां वाणीविनोदः प्रभवति विदुषां हृद्विकासाय शीघ्रं
मन्ये चेतःप्रसादं पुनरपि तनुते शांकरो वाग्विलासः ॥८॥

सर्वदर्शनसमूहमन्दिरं
दुर्निरीक्ष्यमपि दुर्गमं च यत्।
सर्वदर्शनसुखं विधाय तत् –
तैरकारि जनसुप्रवेशनम् ॥९॥

फणिभाषितभाष्यविस्तरे
कृतयत्ना निजमातृभाषया।
विलसन्ति पतञ्जलिप्रभा
ननु वैयाकरणाग्रयायिनः ॥१०॥

द्रव्यं तडिद्विलसितप्रतिमं विबुध्य
कीर्तिं च मत्तकरिकर्णचलां विलोक्य
शान्ताः स्वकर्मनिरता निजलाभपूर्णा
दान्ता भवं भवभिदं स्तुवते प्रसन्नाः ॥११॥

किं वर्ण्यतेऽप्रतिमदार्शनिकप्रभावः
संचिन्त्य यं गलति मानुषदेहभावः।
किं वक्ष्यते विमलबोधकृतोपकारः
संस्मृत्य यं स्रवति संसृतिभीतिभारः ॥१२॥

न स्यादलं कमलजोऽपि विशुद्धकीर्तेः
सत्पण्डितस्य चरितामृतवर्णनाय।
कोऽहं भवामि निपुणस्तमसि प्रलीनः
श्रीवासुदेवमतिवैभवदर्शनाय ॥१३॥

एषा प्रसन्नहृदयेन मया प्रणीता
श्रीवासुदेवगुणगौरववर्णनाय।
कापि स्तुतिः प्रणतिभावभरेण सा स्यात्
स्वान्तःसुखाय नरसंसृतिनाशनाय ॥१४॥

* * *

परिशिष्ट ७ वें :

# शास्त्रीबुवांच्या ग्रंथांची सूची

| ग्रंथाचें नांव | विषय | मिळण्याचें ठिकाण |
|---|---|---|
| १ तत्त्वादर्श ( परिभाषेन्दुशेखर-टीका) | व्याकरण | भांडारकर इन्स्टिटयूट, पुणें ४ |
| २ गूढार्थप्रकाश (लघुशब्देन्दुशेखर-टीका) | " | अमुद्रित व अपूर्ण |
| ३ ब्रह्मसूत्र-शांकरभाष्याचा मराठी अनुवाद-खंड १ ते ३ | अद्वैतवेदान्त | डी. ई. सोसायटी, पुणे ४ |
| ४ श्रीभाष्य-चतु:सूत्री (स्वकृत टीकेसह) | विशिष्टाद्वैत वेदान्त | संस्कृत-पाठशाला, पुणे २ |
| ५ यतीन्द्रमतदीपिका | " | आनंदाश्रम, पुणे २ |
| ६ श्रीभाष्य (स्वकृत टिप्पणी-सहित) | " | भांडारकर इन्स्टिटयूट, पुणे ४ |
| ७ श्रीभाष्य प्रथमसूत्र, (स्वकृत टिप्पणीसह) | " | प्रती शिल्लक नाहीत. |
| ८ विशिष्टाद्वैत ( मराठी निबंध ) | " | संस्कृत पाठशाला, पुणें २ |
| ९ पातंजलयोगसूत्रें (भाष्य व टीका यासहित) | योगशास्त्र | भांडारकर इन्स्टिटयूट, पुणें ४ |
| १० अद्वैतामोद (स्वकृत प्रबंध) | अद्वैतवेदान्त | आनंदाश्रम, पुणे २ |
| ११ काव्यप्रकाश ( प्रदीपोद्योतांसहित ) | अलंकार | " |
| १२ काव्यप्रकाश, (संकेत टीकेसहि ) | अलंकार | " |
| १३ सूत्रान्तरपरिग्रहविचार; ( स्वकृत निबन्ध ) | धर्मशास्त्र | " |
| १४ सर्वदर्शनसंग्रह ( स्वकृत टीकेसह ) | दर्शने | भांडारकर इन्स्टिटयूट, पुणें ४ |
| १५ न्यायकोश मुधारून वाढविलेली आवृत्ति | न्यायशास्त्र | " |

| | | |
|---|---|---|
| १६ संस्कारपद्धति (संपादित) | धर्मशास्त्र | आनंदाश्रम, पुणे २ |
| १७ धर्मतत्वनिर्णय (स्वकृत) | धर्मशास्त्र | ,, |
| १८ कुण्डार्क ( स्वकृतटीकेसह ) | धर्मशास्त्र | ,, |
| १९ ब्रह्मसूत्र-शांकरभाष्य- (मराठी अनुवाद, व टिपा-यासहित अध्याय २ पाद २) | अद्वैतवेदान्त | संस्कृत पाठशाला, पुणे २ |
| २० मीमांसान्यायप्रकाश ( स्वकृत टीकेसह ) | मीमांसाशास्त्र | भांडारकर इन्स्टिट्यूट, पुणे |
| २१ श्रीमद्भगवद्गीता (अध्याय १ व २, स्वकृतटीकेसह) | वेदान्त | आनंदाश्रम, पुणे २ |
| २२ व्याकरण महाभाष्य (मराठी अनुवाद व टिपा यासहित भाग १ ते ७) | व्याकरण | डी ई सोसायटी, पुणे ४ |
| २३ कायपरिशुद्धि ( स्वकृत प्रबंध ) | वेदान्त | आनंदाश्रम, पुणे २ |
| २४ सिद्धान्तबिंदु ( स्वकृतटीकेसह ) | वेदान्त | भांडारकर इन्स्टिट्यूट, पुणे २ |
| २५ व्याकरण महाभाष्य नवाह्निकी, हिन्दी अनुवाद व टिपा यासहित | व्याकरण | डी ई सोसायटी, पुणे ४ |

* * *

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ९ | १३ | त्यानीच गुरुजीच्या | त्यानीच गुरुजीच्या |
| ११ | २५ | श्रष्ठ | श्रेष्ठ |
| १३ | १० | प्रतबधमासाठीच | प्रतबधासाठीच |
| १८ | २६ | सप्तशतीचर | सप्तशतीचा |
| १९ | २२ | नित्याप्रणाम | नित्याप्रमाणे |
| २१ | २७ | सया | सया |
| २४ | ७ | पाडित्यास | पाडित्यास |
| २४ | १८ | परमलघुमजूषा | परमलघुमजूषा |
| २७ | १७ | वादविवाद | वादविवादा- |
| २९ | ५ | पाहृत | पाहृत. |
| ३२ | २६ | प्राध्यापकाची | प्राध्यापकाची |
| ४० | २० | पराकाष्टा | पराकाष्ठा |
| ४५ | ६, १० | विवृत्ति | विवृति |
| ४४ | ३१ | तत्तत्प्रसडगयातो | तत्तत्प्रसङ्गवशातो |
| ४६ | ८ | राजरामशास्त्री | राजारामशास्त्री |
| ५६ | २४ | रघुवश | रघुवश |
| ५७ | ९ | वारवार | वारवार |
| ५९ | २८ | पातमितु | पानमितु |
| ६३ | २९ | अमलेश्वर | ममलेश्वर |
| ६९ | ४ | शात निश्चित | शाल व निश्चित |
| ६९ | २१ | निश्चित | निश्चित |
| ७१ | ५ | टीराग्रय | टीकाग्रथ |
| ७४ | ६ | प्रहृसविह् | प्रहृसमिव |
| ७४ | १६ | बदलणे | बदलले |
| ७५ | ८ | शास्त्रीबवाच्या | शास्त्रीबुवाच्या |
| ७५ | ११ | अनवार | अनुवाद |
| ७५ | ३१ | छापली | छापलेली |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८३ | २१ | शाकरमहाभाष्याचे | शाकरब्रह्मसूत्रभाष्याचे |
| ९५ | ३ | पत्नी उमाबाई | पत्नी सौ उमाबाई |
| ९७ | ९ | अध्यायन | अध्ययन |
| ९८ | ६ | " | " |
| १०० | ३२ | गेगशास्त्री | गोपाळशास्त्री |
| १०१ | १ | गळमाशी | घळमाशी |
| १०२ | १४ | बी ए, बी टी | बी एस्सी, बी टी. |
| १०२ | १६ | अध्यापनसस्थेत | अध्यापनशाळेत |
| १०३ | ३० | स्वप्नवासवदत्ता | स्वप्नवासवदत्त |
| १०४ | १ | Grammer | Grammar |
| १०५ | १ | मोरेश्वरपत तथा बळवतराव | मोरेश्वरपत |
| १०७ | २९ | स्वयपाकीणबाई | स्वयपाकीणबाईना |
| १०७ | ३० | लक्ष न देता आले | लक्ष देता आले |
| १०८ | १३ | समुदपातमत | समुदपादयत् |
| | | परिशिष्ट | |
| २२ | १४ | नीलकण्ठो | श्रीनीलकण्ठो |
| २३ | १४ | वयाकणाग्र | वैयाकरणाग्र |
| २४ | १२ | ) स्वस्कृत | ( स्वकृत |
| २५ | २२ | 'या सवधीचे ' या शब्दामागे | '' उतारे किंवा अनुवाद '' हे शब्द आहेत |
| परिशिष्ट ८ वे | | श्री दिगवर रघुनाथ याचा जन्मदिन ( ३०-३-८ ) | (१९०८) आहे |

